

TH

# PERSIAN TALES

OR

E THOUSA... अद्भुत ...

NSLATED INTO M ARATH.

BY

HARI KRISHNA I AMLE.

PART 1

axman Bhaoo K kate's Hanuman Press

POONA.

1918.

*Price 12 Annas.*

# अजब-ऐने-महाल

अथवा

## पर्शियन् भाषेंतील

एक हजार एक दिवसांच्या अद्भुत व

## मनोरंजक गोष्टी.



ह्या,

इंग्रजींतील 'दि पर्शियन् टेल्स् ऑर दि थावजंड् ऍंड् वन् डेज्'

या ग्रंथावरून

**हरि कृष्ण दामले**

यांनीं मराठींत उतरिल्या.

---

खंड पहिलें.

---

पुणें येथें

लक्ष्मण भाऊ कोकाटे यांच्या सदाशिव ७२१ 'हनुमान' छापखान्यांत छापिलें.

श० १८४०.—इ० स० १९१८.

किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.



प्रस्तुतसारख्या ग्रंथांची अभिवृद्धि भाषेंत झाल्यानें कोणकोणते लाभ होतात. ते येथें नव्यानें सांगण्याची गरज नाहीं; कां कीं, अशा ग्रंथांपासून मनास करमणूक होऊन वाचनाची गोडी लागते, व त्या योगानें पुढें मोठमोठे विशेष महत्त्वाचे ग्रंथ अवलोकन करणें मनुष्यास सोपें जाऊन, त्यांपासून त्यास फायदा करून घेतां येतो; तसेंच, मनुष्यस्वभावाचें ज्ञान होऊन चातुर्य व बोध हीं प्राप्त होतात; इत्यादि गोष्टी, 'अरेबियन् नाइट्स्' वगैरे ग्रंथांचीं जीं भाषांतरें आपल्या भाषेंत आजपर्यंत झालेलीं आहेत. त्यांवरून पूर्णपणें सिद्ध झाल्या आहेत.

'अजब-ऐने-महाल' अथवा 'पर्शीयन् भाषेंतील एक हजार एक दिवसांच्या अद्भुत व मनोरंजक गोष्टी' हा ग्रंथ प्रख्यात 'अरेबियन् नाइट्स्' या ग्रंथाच्या जोडीचा असून दोहोंचें संविधानक सारखेंच आहे असें ह्मटलें तरी चालेल. फरक इतकाच कीं, 'अरेबियन् नाइट्स्' मध्यें, एका राजाचें, स्त्रिया तेवढ्या वाईट असें मत झालें होतें तें फिरविण्याकरितां त्याच्या राणीनें अनेक सुरस व चमत्कारिक गोष्टी त्यास सांगितल्या आहेत; व प्रस्तुत ग्रंथांत असें आहे कीं, एका राजकन्येचा पुरुषजातीविषयीं असाच अत्यंत प्रतिकूळ ग्रह झालेला होता तो दूर करण्याकरितां, सद्गुणी, ममताळू, व एकपत्नीव्रत अशा पुरुषांच्या अद्भुत व मनोरंजक गोष्टी तिच्या दाईनें तिला सांगितल्या आहेत.

हा ग्रंथ 'पर्शियन् टेल्स्' ह्या इंग्रजी ग्रंथावरून उतरला असल्यामुळें यास 'पर्शियन् भाषेंतील गोष्टी' एवढेंच नांव बस होतें; पण वर सांगितल्याप्रमाणें दाईनें राजकन्येच्या मनाचा झालेला व्यर्थ ग्रह नाहींसा करण्यासाठीं तिला सांगितलेली प्रत्येक गोष्ट हाच एक ऐना (आरसा), व अर्थात् त्या गोष्टींचा जो समुदाय तो जणूं काय ऐने-महाल (आरसे-महाल) तिच्या दृष्टीस पडल्यामुळें, ती अज्ञानरूपी अंध-

कारांतून उजेडांत आली, व तिच्या भ्रमाचा निरास झाला, असें कल्पून प्रस्तुत ग्रंथास 'अजब-ऐने-महाल' (अद्भुत आरसे-महाल) हें नांव दिलें असतां ज्यास्त शोभेल असें वाटल्यावरून यास हें नांव दिलें आहे.

हा ग्रंथ एकदम छापिला असतां मोठा होईल ह्मणून त्याचीं याप्रमाणें लहान लहान खंडें करून तीं स्वल्प किमतीस लोकांस घेतां येतील अशाप्रकारें प्रसिद्ध करण्याचा विचार केला आहे. अशीं हीं या ग्रंथाचीं एकंदर खंडें पांच होणार आहेत; व प्रथम फ्रेंच् भाषेंत जेव्हां हा ग्रंथ प्रसिद्ध झाला तेव्हां तोही असाच पांच भागांत प्रसिद्ध झालेला होता, हें दुसरीकडे दिलेल्या हकीकतीवरून लक्षांत येईल. असो; हा ग्रंथ मराठींत उतरतांना मराठी भाषेच्या पद्धतीस गोड दिसण्याकरितां व कित्येक ठिकाणीं मागल्या पुढल्या गोष्टींचा संबंध ज्यास्त स्पष्ट रीतीनें लक्षांत येण्याकरितां यांत अनेक फेरफार करावे लागले आहेत.

हा ग्रंथ लिहून तयार झाल्यावर तो संगतवार वाचून, छापत असतां प्रूफें वगैरे पाहण्याची तसदी मित्रवर्य रा० रा० काशिनाथ पांडुरंग परब यांनीं घेतली याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा फार आभारी आहे. तसेंच मित्र रा० रा० शंकर तुकाराम शाळिग्राम यांनीं हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचे कामीं मदत केली तिजबद्दल तो त्यांचाही उपकारी आहे.

'पर्शियन् टेल्स्' या ग्रंथांतील कित्येक गोष्टी घेऊन 'अरबी गोष्टी' या नांवाचें एक पुस्तक बहुत वर्षांपूर्वी रा० भास्कर सखाराम या नांवाच्या गृहस्थांनीं केलें होतें. पण त्याच्या प्रती हल्लीं कोठें मिळत नाहींत, व सांप्रत विद्येचें पाऊल पुष्कळच पुढें गेलें असल्यामुळें अनेक नवीन ग्रंथ व पूर्वींच्या ग्रंथांचीं रूपांतरें होत आहेत, तेव्हां अशा समयास नवीन पद्धतीनें तयार केलेला व छापलेला असा हा समग्र ग्रंथ आपल्या भाषेंत व्हावा असें इष्ट वाटल्यावरून तो लोकांपुढें आणिला आहे त्यापासून त्यांचें रंजन होऊन इच्छित हेतु परमेश्वरकृपेनें सिद्धीस गेल्यास ग्रंथकर्ता आपल्या श्रमांचें सार्थक्य झालें असें मानील.

पुणें, ता० १ जानेवारी, १८९३. हरि कृष्ण दामले.

# या ग्रंथाची हकीकत.

हा ग्रंथ मूळचा पर्शियन् भाषेंतला असून याचें प्रथम फ्रेंच् भाषेंत भाषांतर झालें, व नंतर इंग्लिशमध्यें होऊन त्यावरून मराठींत केलें आहे. इंग्लिश् भाषांतराची पहिली आवृत्ति इ० स० १७८९ सालीं निघाली. तेव्हांपासून आजपर्यंत त्याच्या अनेक आवृत्ति निघाल्या आहेत. मूळ इंग्लिश भाषांतर डॉ० किंग् व मि० फिलिप्स् या नांवाच्या दोघां इंग्रजांनीं एम्. पेटिस् नामक फ्रेंच् गृहस्थानें आपल्या भाषेंत केलेल्या तर्जुम्यावरून केलें. हा ग्रंथकार फ्रान्सचा प्रख्यात राजा चौदावा लुई याचा चिटणीस असून अनेक प्राच्य भाषांत पारंगत होता. त्याजकडे दरबारचें वर सांगितलेलें काम असून खेरीज या भाषांच्या संबंधानें दुभाषीपणाचेंही काम होतें. हा गृहस्थ जसा विद्वान् तसाच मोठा सत्वधीर होता असा लौकिक आहे. त्यानें आपल्या धन्याच्या आज्ञेवरून दरबारचे कामानिमित्त एशिया व आफ्रिका या खंडांत अनेक सफरी केल्या, यामुळें तिकडील भाषांचें त्यास फारच उत्तम ज्ञान होऊन त्याची एवढी ख्याति झाली कीं, इ० स० १६९२ मध्यें पारिस येथील रॉयल् कॉलेजांत आरबी भाषेच्या प्रोफेसरच्या जागीं त्याची नेमणूक झाली. खेरीज, राजानें त्याच्या कामगिरीबद्दल त्यास आणखी वेगळें इनामही दिलें. हा ग्रंथकार इ० स० १७१३ त मरण पावला.

एम्. पेटिस् यानें याखेरीज आणखी कित्येक ऐतिहासिक ग्रंथही लिहिले; पण त्यांपैकीं एकही ग्रंथ त्यानें आपल्या हयातींत प्रसिद्ध केला नाहीं. तेव्हां अर्थातच प्रस्तुत ग्रंथही त्याच्या मरणकाळपर्यंत तसाच राहिला. पुढें तो इ० स० १७२२ मध्यें पांच भागांत प्रसिद्ध झाला. एम्. पेटिस् यानें असें लिहिलें आहे कीं, यांतील गोष्टी

ह्या मूळ हिंद ह्मणजे हिंदुस्थान येथील नाटकांवरून दरवेशी मोक्लीस यानें पर्शियन् भाषेंत रचल्या, व त्यानेंच आपल्याला त्या फ्रेंच् भाषेंत उतरण्यास परवानगी दिली. अशाप्रकारें शेवटीं या ग्रंथाच्या उत्पत्तीचें श्रेय आपल्या देशाकडे येत आहे हें पाहून कोणास आनंद वाटणार नाहीं? असो; याप्रमाणें या ग्रंथाची थोडक्यांत हकीकत आहे.

# अनुक्रमणिका.

—:०:—


उपोद्घात. .... .... .... .... .... .... १

बसरा शहरचा रहिवासी अबुल कासीम याची गोष्ट. .... ६

दार्दानी हिची हकीकत. .... .... .... .... २६

अबुल कासीम याची गोष्ट ( पुढें चालू ) .... .... ३२

जिवंत पुरलेल्या राजकन्येची गोष्ट. .... .... .... ३९

अबुल कासीम याची गोष्ट ( पुढें चालू ).... .... .... ४४

झवानशाह पातशाह आणि शेहरिस्तानी राजकन्या यांची गोष्ट. ८७

तिबेटचा तरुण राजा व नैमण लोकांच्या राजाची कन्या यांची गोष्ट. .... .... .... .... .... ९७

(कुवरशाह वजीर ह्याची गोष्ट). .... .... .... १०८

तिबेटचा तरुण राजा व नैमण लोकांच्या राजाची कन्या ह्यांची गोष्ट (पुढें चालू). .... .... .... १११

(माकबेल आणि दिलनवाज यांची हकीकत). .... ११६

तिबेटचा तरुण राजा व नैमण लोकांच्या राजाची कन्या ह्यांची गोष्ट (पुढें चालू). .... .... .... १२५

झवानशाह पातशाह आणि शेहरिस्तानी राजकन्या यांची गोष्ट (पुढें चालू). .... .... .... .... .... १२९

हमास शहरच्या व्यापाऱ्याचा मुलगा कोलूफ व दिलारा या नांवाची स्त्री ह्यांची गोष्ट. .... .... .... १४५

# अजब-ऐने-महाल,

अथवा

# पर्शियन् भाषेंतील
## एक हजार एक दिवसांच्या अद्भुत व मनोरंजक गोष्टी.

---

### उपोद्घात.

प्राचीन काळीं काश्मीर देशांत तोग्रल्बी या नांवाचा कोणी पराक्रमी पातशाह राज्य करीत होता. त्यास एक पुत्र व एकच कन्या होती. तीं दोघेंही स्वरूपानें व गुणांनीं अशा प्रकारचीं होतीं कीं, त्यांना त्या देशांतील लोक केवळ देवांप्रमाणें मानीत. त्या पुत्राचें नांव फरुख्रोज् व कन्येचें नांव फरुख्नाज् असें होतें.

ती राजकन्या जेव्हां जेव्हां राजवाड्याबाहेर शिकार वगैरे करावयास जाई, तेव्हां ती आपल्या तोंडावरचा बुरखा काढीत असे. त्या वेळीं लोकांच्या झुंडीच्याझुंडी, तिचें लावण्य पाहून आपल्या नेत्रांचें पारणें फेडण्याकरितां, तिच्या मागें जात, आणि मोठ्या आनंदानें तिच्या नांवाचा जयघोष करीत. ती एका उत्कृष्ट तार्तरी घोड्यावर बसत असे. त्या घोड्याचा रंग पांढरा असून त्याच्या अंगावर मधून मधून लाल ठिपके होते, त्यामुळें तो फारच सुरेख दिसे. राजकन्येच्या दोन्ही बाजूंस शंभर दासी घोड्यांवर बसून चाललेल्या असत. त्यांचे पोषाख मोठे मोलवान् असून त्यांचे घोडे काळ्या रंगाचे असत. या दासीही यावेळीं आपल्या तोंडावरचे बुरखे काढीत; व त्या प्रत्येकीचें लावण्य जरी कांहीं सामान्य नव्हतें, तरी त्यांची धनीण ही केवळ स्वर्गींची अप्सरा असल्यामुळें तिच्याकडेच सर्व

लोकांचे डोळे लागत. तिच्या दासींच्या हातांत नागव्या तरवारी असून लोकांस वारंवार पैस पैस ह्मणून त्या ललकारीत; तथापि लोक इतके वेडावून गेले असत कीं, ते कांहीं केल्या लगट केल्यावांचून रहात नसत. तेव्हां अर्थातच अशी गर्दी झाली ह्मणजे त्या दासींच्या तरवारींच्या योगानें कित्येकांस जखमा लागत, व कित्येकांचे प्राणही जात. इतकें होत असे तथापि राजकन्येस पाहण्याचा आपला छंद पुरविण्याचें लोकांना इतकें कांहीं वेड लागून गेलें होतें कीं, पुनः पुनः त्यांचे थव्यांचेथवे त्या दासींच्या तरवारींच्या माऱ्याखालीं येतच असत;—जणूं काय, राजकन्येच्या दृष्टीसमोर मरणें हें आपल्या जन्माचें सार्थक्य आहे असें त्यांस वाटत असे !

वर सांगितल्याप्रमाणें वारंवार अनर्थ घडूं लागल्या कारणानें पातशाहाच्या मनाला मोठा चरका बसून गेला. व कन्येस लोकांच्या दृष्टीसच पडूं द्यावयाची नाहीं असा त्यानें निश्चय करून तिला 'वाड्यावाहेर बिलकूल जाऊं नको' अशी निक्षून ताकीद केली. तेव्हां अर्थातच वरील दुःखकारक गोष्टींचें कारण समूळ नाहींसें झालें. तथापि तिच्या लावण्याची कीर्ति सर्व आशियाखंडभर पसरली होती, यामुळें शेंकडों राजांचें मन तिच्या प्राप्तीविषयीं अत्यंत उत्कंठित झालें; व थोडक्याच दिवसांत काश्मीरच्या दरबारीं अशी बातमी आली कीं, अनेक देशच्या मोठमोठ्या राजांचे वकील आपआपल्या धन्यांच्या तर्फेनें राजकन्येस मागणी घालण्याकरितां यावयास निघाले आहेत. परंतु हे वकील तेथें येण्यापूर्वीं एके रात्रीं राजकन्येस स्वप्न पडलें, त्याच्या योगानें सर्व पुरुषजातीविषयीं तिच्या मनास अत्यंत तिटकारा आला. तिनें स्वप्नांत असें पाहिलें कीं, एक हरिण पारध्याच्या जाळ्यांत सांपडला असतां त्याला एका हरिणीनें सोडविलें. परंतु तीच हरिणी पुनः त्याच जाळ्यांत सांपडली असतां हरणानें तिला सोडविण्याचा यत्न केला नाहीं, व तसाच तो निघून गेला.

राजकन्या जागी झाल्यावर या स्वप्नाचा तिच्या मनावर मोठा विलक्षण परिणाम झाला. तो असा कीं, हें स्वप्न इतर साधारण स्वप्नांसारखें नसून यांत कांहीं विशेष अर्थ आहे असें तिला वाटूं लागलें.

तिला वाटलें कीं, सर्वांस अत्यंत पूज्य जो केसया[1] त्यास आपली पराकाष्ठेची काळजी असल्यामुळें या स्वप्नाच्या योगानें आपणास असें सुचविण्याचा त्याचा हेतु असावा कीं, पृथ्वींतील सर्व पुरुष कृतघ्न असून ज्या बिचाऱ्या अबला दुर्दैवानें त्यांच्या हातीं पडतात, त्याचा ते अशा प्रकारें घात करितात.

राजकन्येच्या मनाचा असा विलक्षण ग्रह होऊन गेल्यामुळें, मागें सांगितलेले ठिकठिकाणचे वकील आपल्या बापाच्या दरबारीं आज उद्यां येऊन थडकणार ही बातमी तिच्या कानीं गेल्याबरोबर, बाप कोणा एकाद्या राजाचें बोलणें मान्य करून आपला त्याशीं लौकरच विवाह करून देईल, व त्या योगानें त्या स्वप्नांतील हरिणीप्रमाणें आपली दुःखप्रद स्थिति होईल अशी तिला भीति पडली. तेव्हां तिनें बापाची एकांतीं गांठ घेऊन पुरुषजातीविषयीं आपला प्रतिकूल ग्रह झाला आहे असें बिलकूल न दाखवितां पराकाष्ठेचा गळ्हिंवर आणून त्यास अशी विनंति केली कीं, ‘ माझा विवाह माझ्या संमतीखेरीज कोणाशींही करूं नका. ’ हें ऐकून पातशाह अत्यंत सद्गदित होऊन म्हणतो, ‘बेटा, येवढेंचना! तुला त्याविषयीं कांहीं एक काळजी करायास नको. मी तुझ्या इच्छेविरुद्ध कधींही जाणार नाहीं. मुलीचें लग्न करतांना तिच्या संमतीची कांहीं जरूर नाहीं, अशी जरी पूर्वापार रीत आहे, तरी मीं केसयाची शपथ वाहून सांगतों कीं, कोणी कसाही बलाढ्य व संपत्तिमान् राजा असो,-तो खुद्द हिंदचा पराक्रमी पातशाह जरी असला तरी,—तुझ्या संमतीखेरीज त्याच्याशीं मी तुझा विवाह करणार नाहीं.’ याप्रमाणें मोठ्या कळवळ्यानें व येवढी मोठी शपथ वाहून कन्येस पातशाहानें अभिवचन दिल्यामुळें तिच्या अंतःकरणांतील सर्व भीति जाऊन तिला समाधान वाटलें व आपणास वरण्याविषयीं कोणाही राजाची मागणी आली तरी आपण ती बिलकूल कबूल करावयाची नाहीं असा तिनें निश्चय केला.

नंतर कांहीं दिवसांनीं पूर्वी सांगितलेले अनेक देशच्या राजांचे

---

१. केसया या नांवाचा काश्मीर देशांत त्यावेळीं प्रख्यात देव असून त्याला तेथील सर्व लोक मोठ्या निष्ठेनें भजत असत.

वकील काश्मीरच्या दरबारीं आले, व प्रत्येकानें आपापल्या धन्याच्या वतीनें पातशाहाजवळ त्याच्या कन्येकरितां मागणी केली. प्रत्येकास आपल्या धन्याच्या थोरवीचा मोठा अभिमान असून आपल्या धन्यासारखा गुणवान् व रूपवान् पुरुष विरळा असें वाटत होतें, यामुळें आपली विनंति मान्य होईल असें अर्थातच जो तो आपल्या मनांत मांडे खात होता. पातशाहानें त्या सर्व वकिलांचा योग्य मानमरातब ठेविला, परंतु त्यानें त्यांस स्वच्छ सांगितलें कीं, 'मीं केसयाची शपथ वाहून मुलीला असें अभिवचन दिलें आहे कीं, तुझ्या संमतीशिवाय मी तुझा विवाह कोणाशींही करणार नाहीं. यास्तव ही गोष्ट मान्य किंवा अमान्य करणें हें सर्व तिच्या इच्छेवर आहे.' आणि राजकन्येनें मागें सांगितल्याप्रमाणें निश्चय केला असल्याकारणानें ज्या ज्या मागण्या आल्या होत्या त्यांपैकीं एकही तिनें कबूल न केल्यामुळें ते सर्व वकील आपणास यश न आल्याबद्दल दिलगीर होऊन निघून गेले.

तोग्रल्बी हा पातशाह मोठा विचारी होता. त्याला त्या वकिलांचा अशा प्रकारें अपमान झाला हें पाहून फार वाईट वाटलें, व आपण त्यांचें म्हणणें कबूल न केल्याकारणानें सर्व राजे कदाचित् आपणांवर उठतील अशी त्याला भीति पडली. तेव्हां मुलगी आपला निश्चय फिरवील असा कांहीं उपाय होईल तर करून पहावा, या हेतूनें त्यानें तिच्या दाईस बोलावून आणून ह्मटलें कीं, 'मुलीचा हा हट्ट पाहून मला मोठें आश्चर्य व खेद वाटतो. तिच्या मनांत विवाहाविषयीं येवढा तिरस्कार कां यावा हें मला मुळींच समजत नाहीं! मला असा अंदेशा येतो कीं, हें वेड तूंच तिच्या डोक्यांत भरवून दिलें असावें. तर काय खरें असेल तें सांग.' दाईनें उत्तर केलें, 'नाहीं महाराज, अशी गोष्ट मुळींच नाहीं. मी काय पुरुषजातीची शत्रु आहे? महाराज, कन्येच्या मनाचा असा कल होण्यास कारण तिला एक स्वप्न पडलें तें होय.' पातशाह ह्मणतो, 'काय? स्वप्नाच्या योगानें तिच्या डोक्यांत हें वेड शिरलें?' मग अंमळ थांबून ह्मणतो "छी छी, तूं काय सांगतेस! असें कदापि होणार नाहीं. मला हें तुझें

ह्मणणें मुळींच खरें वाटत नाहीं. बरें, तिला असलें स्वप्न तरी कसलें पडलें, कीं ज्याच्या योगानें हा भलताच हट्ट ती घेऊन बसली?' तेव्हां दाईनें त्या स्वप्नाची हकीकत पातशहास सांगून ह्मटलें, 'या गोष्टीमुळें तिच्या मनाची अशी स्थिति झाली आहे. तिला सर्व पुरुष त्या हरणाप्रमाणें विश्वासघातकी व कृतघ्न आहेत असें वाटतें व या कारणामुळें ती कोणाशींही विवाह करण्यास कबूल नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें दाईचें भाषण ऐकून पातशाहास मोठें नवल वाटलें. तो मनांत ह्मणाला, 'त्या स्वप्नाचा येवढा परिणाम मुलीच्या मनावर व्हावा ही मोठी अचंब्याची गोष्ट आहे!' मग दाईस ह्मणतो, 'बरें, पुरुषजातीविषयीं मुलीच्या मनांत हे व्यर्थ आलेले कुविचार घालविण्यास आतां युक्ति तरी काय करावी? तिच्या मनाचा हा झालेला बळकट ग्रह नाहींसा होऊन तिचें मन फिरेल असें तुला वाटतें काय?' दाई उत्तर करिते, 'महाराज, आपण जर हें काम मजवर सोंपवाल, तर हजार हिश्शांनीं मला यश येईल असें माझी मनोदेवता मला सांगते.' पातशाह विचारतो, 'आणि तूं हें कोणत्य उपायानें करणार?' दाई ह्मणते, 'मला शेंकडों अत्यंत मनोवेधक गोष्टी ठाऊक आहेत. त्या सर्व गोष्टींचें पर्यवसान असें आहे कीं, त्या तिनें ऐकिल्या असतां तिच्या मनाचा हा पुरुषजातीविरुद्ध व्यर्थ ग्रह झाला आहे, तो नाहींसा व्हावा. त्या गोष्टींत, पुरुष हे स्त्रियांशीं किती ममतेनें व विश्वासानें वागलेले आहेत याचें मोठें मनोरंजक व हृदयद्रावक वर्णन आहे. तें तिनें ऐकिलें ह्मणजे तिच्या मनाची सहजच खात्री होईल कीं, असें पुरुष हल्लींही जगांत असतील यांत संशय नाहीं. सारांश तिच्या हृदयांत प्रकाश पाडण्याचें काम मजकडे जर आपण सोंपविलें तर तें खचीत मी पार पाडीन असें मला वाटतें.' पातशाहाला ही गोष्ट पसंत पडली, व त्यानें दाईला सांगितलें कीं, 'ठीक आहे, तूं या उद्योगाला लाग, आणि तुझ्या हातून ही कामगिरी शेवटास गेली तर तुला चांगलें बक्षीस मिळेल.'

याप्रमाणें दाईनें हें काम आपल्या अंगावर घेतलें. तेव्हां आतां राजकन्येला गोष्टी केव्हां सांगावयाच्या याचा ती विचार करूं ला-

गली. राजकन्येचा दोन प्रहरांनंतरचा वेळ तिला मोकळा सांपडण्या-सारखा नव्हता; कां कीं, तो बहुतेक वेळ पातशाह आपल्या जनानखान्यांत गाणेंबजावणें ऐकण्याकडे घालवी, व तेव्हां त्याच्या समागमांतच राजकन्या असे. यास्तव सकाळीं हमामखान्यांत (न्हाण्याधुण्याकडे) राजकन्येचा जो वेळ जात असे, त्या वेळांत हें काम करण्यास बरें फावेल असें तिला वाटलें. मग दुसरे दिवशीं राजकन्या नित्याप्रमाणें हमामखान्यांत गेली असतां दाई ह्मणाली, 'बाईसाहेब, मला एक फारच चमत्कारिक गोष्ट आपणास सांगावयाची आहे. आपण ती मला सांगावयास परवानगी द्याल तर आपल्याला घटकाभर मोठी करमणूक होईल अशी माझी खात्री आहे.' राजकन्या ह्मणाली, बरें, सांग बाई, माझें काय जातें ऐकायला? तूं येवढें मजकरितां श्रम घेण्यास तयार आहेस, तर तुझ्या सांगण्याकडे मला कान देण्यास काय कठिण आहे?'

[ दिवस पहिला ]

## बसरा शहरचा रहिवासी अबुल कासीम याची गोष्ट.

दाई म्हणते—बाईसाहेब, महाविख्यात कालीफ हरून् अल् रशीद हा अत्यंत पराक्रमी व गुणवान् पुरुष होऊन गेला. पण त्याच्यांत एकदोन गुण वाईट होते. तेवढे जर नसते, तर त्या पातशाहास सर्वगुणसंपन्न असें म्हणण्यास कांहीं हरकत नव्हती, असें सर्व अखबरनविसांचें ह्मणणें आहे. त्या गोष्टी ह्या कीं, एकतर तो अतिशय संतापी असे. त्याची तबियत अगदीं क्षुल्लक कारणावरूनहीं फारच गरम होत असे; व दुसरें असें कीं, त्याला गर्व पराकाष्ठेचा असे. हरएक प्रसंगीं तो असें बोलून दाखवी कीं, माझ्यासारखा थोर व उदार पुरुष साऱ्या भूमंडळावर नाहीं!

कालीफ याचा जाफर या नांवाचा मुख्य वजीर होता तो मोठा चतुर व निस्पृह असून त्यानें जगाचा बहुत दिवस अनुभव घेतलेला होता. त्याला आपल्या धन्याची ही बडेजावी मिरविण्याची रीत अगदीं गैर वाटे. तथापि तो कालिफाचा अर्थातच बंदा असून, कालीफ

मोठा संतापी असल्यामुळें, आपल्या मनांतील गोष्ट स्पष्ट बोलून दाखविण्यास त्यास धैर्य होत नसे. पण होतां होतां शेवटीं एके दिवशीं त्याला बोलल्यावांचून राहवेना. तेव्हां तो अत्यंत नम्रतेनें कालिफास ह्मणाला, 'सद्धर्मप्रतिपालक महाराज, हा दास आपल्या चरणांपाशीं एक गोष्ट स्पष्टपणें बोलणार आहे, तिजबद्दल त्याजवर खपा मर्जी होऊं नये. ती गोष्ट हीच कीं, आपण आपल्याच तोंडानें आपली स्तुति करीत असतां ही गोष्ट बरी दिसत नाहीं. आपले गुणानुवाद वर्णन करण्याचें काम आपली प्रजा व आपल्या दरबारीं जे अनेक ठिकाणचे लोक येतात त्यांनीं करावें, यांत आपणांस भूषण आहे. राजाधिराज, आपण अनेक गुणांचे केवळ सागर आहां, व आपली प्रजा आपले छायेखालीं आपणास ठेविल्याबद्दल परमेश्वराचे मोठे उपकार मानिते; तसेंच अन्य देशींचे लोकही आपले देश सोडून जे कोणी येथें येतात, तेही आपल्या राज्यांत परम सुख पावून आनंद करितात असें आहे, तथापि, आपले जे कांहीं अलौकिक गुण आहेत त्यांचें वर्णन आपण स्वमुखानें न करावें, तर ह्या इतर लोकांनींच तें करावें, यांत आपणांस विशेष थोरपणा आहे.'

वजिराचें हें अंमळ निस्पृहपणाचें बोलणें ऐकून कालिफाच्या तळव्याची आग मस्तकास गेली; त्याचे नेत्र आरक्त झाले व तो मोठ्या आवेशानें वजिरास ह्मणाला, 'तूं येवढा मोठ्या डौलानें मजपुढें हें पांडित्य करतोस, पण माझ्याप्रमाणें ज्याच्या अंगीं औदार्य आहे असा एक तरी माणूस मला दाखवून देशील काय ?' वजीर उत्तर करितो, 'महाराज, फार दूर कशाला ? असा एक मनुष्य आपल्याच राज्यांत रहात आहे. त्याचें नांव अबुल कासीम. तो बसरा शहरांत रहात असतो. तो अशा थाटानें असतो कीं, राजाही त्याच्या पुढें कांहीं नाहीं ! आणि औदार्याविषयीं ह्मणाल तर, त्या मनुष्याची बरोबरी करणारा कोणीच नसेल;—फार काय, पण आपल्याच्यानेंही त्याची बरोबरी होणार नाहीं !'

हें शेवटचें बोलणें ऐकून तर कालिफाचा क्रोधाग्नि फारच भडकला;—तो इतका कीं, कांहीं वेळ त्याच्या तोंडांतून शब्दही निघेना.

मग अंमळशानें तो जाफर याच्या अंगावर मोठ्यानें खेंकसून ह्मणाला, 'काय रे हें तूं ह्मणतोस? असली मिथ्या गोष्ट आपल्या धन्यासमोर बोलण्याचें धाडस करणारा जो तूं, त्या तुला देहान्त शिक्षेखेरीज दुसरी कोणतीही शिक्षा योग्य नाहीं!' वजीर नम्रतेनें ह्मणतो, 'मीं जी गोष्ट खरी आहे तीच सांगितली. मिथ्या कांहीं एक बोललों नाहीं. मी नुकताच कांहीं दिवसांपूर्वीं बसरा येथें गेलों असतां त्या अबुल कासिमाची व माझी भेट झाली. त्या वेळीं मीं त्याच्याच वाड्यांत उतरलों होतों. तेव्हांच्या स्वतःच्या अनुभवावरून मी सांगतों कीं, खावंदांच्या येथली येवढी अपार संपत्ति जरी मीं पाहिलेली आहे, तरी त्या अबुल कासिमाची संपत्ति पाहून मी अगदीं चकित होऊन गेलों! आणि त्याची उदारता पाहून तर, त्याला कोणाची उपमा द्यावी हें मला कळेना!' हें ऐकून तर कालिफाला आपला क्रोध अगदींच आवरून धरवेना. तो केवळ वेड लागून गेलेल्या एखाद्या मनुष्याप्रमाणें अतिशय मोठ्यानें ओरडून वजिरास ह्मणाला, 'अरे मूर्खा, अविचारी मनुष्या, तूं सार्वभौम राजाची आणि यःकश्चित् एखाद्या साधारण मनुष्याची बरोबरी करून माझी बेअदबी करतोस, तेव्हां तुझ्या जिभेला हाड नाहीं असें ह्मटलें पाहिजे. या बेअदबीबद्दल तुला मी शासन केल्यावांचून कदापि राहणार नाहीं!' असें ह्मणून त्यानें पहारेकऱ्यांवरील जमादारास पुढें येण्याविषयीं खूण केली, व तो येतांच वजिरास एकदम कैद करण्याचा त्यानें त्यास हुकूम केला. इतकें झाल्यावर तो आपली पट्टराणी जुबैदी हिच्या महालांत गेला. त्याची ती रागीट व कावरीबावरी मुद्रा पाहून जुबैदीच्या पोटांत धस्स झालें, व तिच्या तोंडचें पाणी पळालें.

राणी कालिफास ह्मणते, 'महाराज, येवढा आज आपणांस संताप येण्यास कारण तरी काय झालें?' तेव्हां त्यानें वरील सर्व वृत्तांत तीस सांगितला. तो त्यानें अशा रीतीनें सांगितला कीं, त्यावरून त्याची वजिरावर केवढी इतराजी झाली आहे हें तिच्या पूर्णपणें लक्षांत आलें. जुबैदी ही मोठी शहाणी व विचारी होती. तिनें पातशाहास विनयपूर्वक ह्मटलें, 'महाराज, आपण आपला क्रोध अंमळ

शांत करावा, व जाफर जें काय ह्मणतो त्याच्या खरेखोटेपणाची प्रतीति पहाण्यासाठीं बसरा येथें कोणी मनुष्य पाठवावा; आणि मग जाफर हा खोटा ठरल्यास त्यास शासन करावें. कारण, जर कदाचित् त्याचें बोलणें खरें ठरलेंच, तर त्याला शिक्षा देणें हें अन्यायाचें होईल.'

जुबैदीचें हें सयुक्तिक भाषण ऐकून कालीफ हा अंमळ शांत झाला. तो ह्मणाला, 'तूं ह्मणतेस तें मला कबूल आहे. जाफरासारख्या थोर व अनुभवी मनुष्याच्या संबंधानें असें करणें अगदीं योग्य आहे. परंतु ह्मणतेस इतकेंच करून मी राहणार नाहीं; तर बसरा येथें दुसरा कोणी मनुष्य पाठविला तर त्याचें कदाचित् वजिरापाशीं वांकडें असल्यास तो मला खरी हकीकत कळविणार नाहीं; यासाठीं मी स्वतःच बसरा शहरास जातों, आणि खरा प्रकार काय आहे तो स्वतः डोळ्यांनीं पहातों. ज्या अबुल कासिमाची प्रतिष्ठा जाफर यानें मजपुढें गाइली, त्याची मी ओळख पाडीन, आणि काय इंगित आहे तें समजून घेईन. जर जाफर ह्मणाला त्याप्रमाणें माझ्या नजरेस आलें, तर त्याच्या निस्पृहतेची मी तारीफ करून त्याचा मोठा सन्मान करीन; पण जर का उलट गोष्ट असली, तर मात्र मी शपथ वाहून सांगतों कीं, त्याला आपल्या अपराधाबद्दल डोकें द्यावें लागेल.'

कालीफ हरून् अल् रशीद हा जसा संतापी तसाच मोठा उतावळाही होता. त्यानें याप्रमाणें निश्चय केल्याबरोबर तो अमलांत आणण्याचीही लागलीच तयारी केली. मग रात्रीं तो आपल्या वाड्यांतून गुप्तपणें घोड्यावर बसून बसरा शहरास जावयास निघाला. त्या शहरास पोहोंचल्यावर प्रथमच जो भटारखाना त्यास आढळला, त्यांत तो उतरला. त्याचा मालक कोणी वृद्ध मनुष्य होता. त्यास पहिला प्रश्न कालिफानें हा केला कीं, 'काय हो, या शहरांत राजापेक्षांही संपत्तिमान् आणि उदार असा अबुल कासीम या नांवाचा कोणी मनुष्य राहतो ह्मणून ह्मणतात, ही गोष्ट खरी आहे काय?' त्या गृहस्थानें उत्तर केलें, 'होय. त्या मनुष्याचें वर्णन किती तरी

करावें! मला जरी शंभर तोंडें असतीं व त्या प्रत्येक तोंडांत शंभर जिव्हा असत्या, तरी तो अबुल कासीम जीं काय औदार्याचीं कृत्यें करतो त्याचें पुरतें वर्णन माझ्यानें झालें नसतें!' कालिफानें तेवढेंच ऐकून घेतलें, व तो प्रवासाच्या योगानें दमून गेला होता, सबब भोजन आटपून लागलाच निजावयास गेला.

दुसरे दिवशीं कालीफ मोठ्या पहांटेस उठला, व शहरांत रपेट करावयास निघाला. तो तसाच दिवस उगवेपर्यंत फिरत राहिला. नंतर त्याला एक शिंप्याचें दुकान आढळलें. त्या दुकानीं त्यानें अबुल कासीम याच्या घराची चौकशी केली. तेव्हां शिंपी कालिफास विचारतो, 'अहो, तुह्मी कोणीकडून आलां? तुह्मांला अबुल कासिमाचें घर ठाऊक नाहीं, यावरून या बसरा शहरची तुह्मांस अगदींच माहिती नाहींसें वाटतें. येथला थोरला राजवाडाही एकाद्यास माहित नसेल, पण अबुल कासीम याची हवेली ज्याला माहीत नाहीं असा मनुष्य सांपडणें विरळा!'

इतकी गोष्ट सांगून झाल्यावर राजकन्येकडे एक दासी आली, व 'दुपारची निमाज पढण्याची वेळ झाली,' अशी तिनें तिला वर्दी दिली. तेव्हां राजकन्या हमामखान्यांतून बाहेर आली, व लागलीच निघून गेली. मग दुसरे दिवशीं ती पुनः हमामखान्यांत आल्यावर दाईनें गोष्ट पुढें चालविली——

[ दिवस दुसरा. ]

कालीफ शिंप्यास ह्मणतो, 'मला या ठिकाणची अगदीं माहिती नाहीं, व येथें माझी कोणाची ओळख नाहीं, याकरितां अबुल कासीम या थोर गृहस्थाचें घर दाखविण्यास मजबरोबर कोणी मनुष्य द्याल तर मजवर तुमचे मोठे उपकार होतील.' त्यावरून त्या शिंप्यानें आपल्या एका नोकरास, कालिफाबरोबर जाऊन अबुल कासीम याचें घर त्यास दाखविण्यास सांगितलें. कालीफ त्याजबरोबर अबुल कासीम याच्या वाड्यांत गेला. ती इमारत मोठी प्रशस्त व भव्य असून चिरेबंदी होती, व तिचा दरवाजा हिरव्या संगमरवरी दगडांचा होता. कालीफ पहिल्या चौकांत शिरला, तों

तेथें कित्येक गुलाम व इतर नोकर आपापलीं कामें करीत असलेले त्याच्या नजरेस पडले. तो त्यांपैकीं एकास ह्मणाला, 'अरे बाबा, तूं आपले धनी अबुल कासीम साहेब यांस कळीव कीं, कोणी मुशाफर आपल्याकडे आला असून आपल्या मुलाखतीची इच्छा करीत आहे.'

हरून् अल् रशीद याच्या चर्येवरून त्या गुलामानें ताडलें कीं, हा कोणी मोठा मनुष्य असावा. मग तो आपल्या धन्याकडे गेला, व 'कोणी गृहस्थ आपणांकडे आला असून आपल्याशीं त्याला कांहीं बोलावयाचें आहे' असें त्यानें त्यास सांगितलें. तें ऐकून अबुल कासीम लागलाच चौकांत आला. व कालिफास सलाम करून त्यास हातीं धरून एका मोठ्या भव्य दिवाणखान्यांत घेऊन गेला. तेव्हां कालीफ त्यास ह्मणाला, 'तुमची अत्यंत थोर कीर्ती माझ्या कानीं आल्यावरून तुह्मांला मी केव्हां पाहीन असें मला झालें होतें; व त्यावरून मी तुमच्या भेटीकरितां आलों आहे.' अबुल कासीम यानें कालिफाचे आभार मानले, व त्यास मोठ्या आदरानें कोचावर बसवून, 'तुम्ही कोठचे रहाणार ? तुमचा धंदा काय ? व येथें कोठें उतरलां आहां ?' वगैरे हकीकत त्यास विचारली. कालीफ ह्मणाला, 'मी बगदादचा व्यापारी असून तेथूनच थेट आलों आहे; आणि शहरच्या वेशीच्या आंत शिरल्यावर नजीकच जो भटारखाना लागतो, तेथें मी उतरलों आहें.'

याप्रमाणें त्यांचें संभाषण चाललें आहे तों बारा हुजरे, ज्यांवर माणकें बसविलेलीं होतीं असे उत्तम प्रकारच्या मद्यानें भरलेले गोमेदाचे व बिलोरी सुरेख पेले घेऊन तेथें आले. नंतर त्यांच्या मागून फार सुंदर अशा बारा दासी आल्या. त्यांपैकीं कांहींनीं मोठमोठाल्या चिनी पात्रांत सुंदर फळें व पुष्पें आणिलीं होतीं, व कांहींनीं सोन्याच्या बरण्यांत निरनिराळ्या प्रकारचे स्वादिष्ट मुरंबे आणिले होते.

त्यांपैकीं एका हुजऱ्यानें एक पेला ह्या पाहुण्यापुढें केला. कालिफानें तो घेऊन त्यांतले मद्य प्राशन केलें. तेव्हां आजपर्यंत जरी त्यानें नानाप्रकारचीं उंची मद्यें प्राशन केलेलीं होतीं, तरी इतकें उ-

त्कृष्ट प्रकारचें रुचकर मद्य आपल्या पाहण्यांत कधींच आलें नाहीं, असें त्यानें स्पष्ट बोलून दाखविलें. नंतर त्या दासींनीं आणिलेलीं फळें वगैरे त्याच्यापुढें ठेविलीं. तीं थोडीशीं खाल्ल्यावर कांहीं वेळानें भोजनाची तयारी झाली. तेव्हां अबुल कासीम हा कालिफास दुसऱ्या एका दिवाणखान्यांत घेऊन गेला. त्या ठिकाणीं नानातऱ्हेच्या पक्वान्नांनीं भरलेलीं सोन्याचीं ताटें मांडून अगदीं लेश तयारी केलेली होती.

भोजन झाल्यावर अबुल कासीम यानें कालिफास हातीं धरून तिसऱ्या एका दिवाणखान्यांत नेलें. तो दिवाणखाना पहिल्या दोहोंपेक्षांही सुंदर होता. हे दोघे या दिवाणखान्यांत गेल्याबरोबर नोकरांनीं रत्नखचित अशा सुवर्णपात्रांत निरानिराळ्या प्रकारचें उत्तम मद्य, तशीच चिनी तबकांत मिठाई भरून आणून त्यांच्यापुढें ठेविली. मग हे दोघे मद्य पिऊन जरा मजेंत आल्यावर लागलेंच तेथें गाणेंबजावणें सुरू झालें. त्या योगानें तर कालीफ हरून् अल् रशीद याचें अंतःकरण फारच प्रसन्न झालें. तो मनांत म्हणाला, 'माझ्या येथें उत्तम प्रकारें तालसुरावर गाणारे वाजविणारे लोक पुष्कळ आहेत, पण यांच्याशीं त्यांची तुलना केली असतां यांच्यापुढें ते कांहींच नाहींत असें म्हटल्यावांचून मला राहवत नाहीं ! आणि मला विशेषतः हा मोठा चमत्कार वाटतो कीं, हा केवळ साधारण सुखवस्तु मनुष्य असून याला याप्रमाणें पातशाही थाटापेक्षांही ज्यास्त डामडौलानें कसें राहतां येतें कोण जाणे !'

असो, कालीफ हा त्या गाण्याबजावण्यांत अगदीं गुंग होऊन अशा प्रकारें विचार करीत स्तब्ध बसला असतां अबुल कासीम हा तेथून उठून गेला, आणि थोडक्याच वेळांत एका हातांत एक प्रकारची कांडी दुसऱ्या हातांत एक लहानसें झाड घेऊन आला. त्या झाडाचा बुंधा रुप्याचा होता, व त्याच्या फांद्या आणि पानें हीं पाचेचीं होतीं; आणि त्याचीं फळें माणकाचीं असून तीं त्या झाडाला खूपच लागलेलीं होतीं. त्या झाडाच्या शेंड्यावर एक सोन्याचा मोर होता, व त्याच्या पोटांत अंबर व दुसऱ्या प्रकारचीं फारच उंची अशीं

अत्तरें होतीं. अबुल कासीम यानें तें झाड कालिफाच्या पायांशीं ठेविलें. नंतर आपल्या हातांतील कांडीनें त्या मोरास त्यानें स्पर्श केल्याबरोबर त्यानें आपला पिसारा पसरला, आणि तो इतक्या जलदीनें गरगर फिरूं लागला कीं, त्याच्या गतीवर नजर देखील ठरेनाशी झाली! तो फिरत असतां त्याच्या अंगांतून अत्तराच्या ज्या बारीक चिरकांड्या उडत, त्यांच्या योगानें सर्व दिवाणखान्याभर जिकडेतिकडे घमघमाट सुटून गेला.

हा चमत्कार पाहून तर कालिफाचें सारें मन त्या झाडाकडे व त्यावरील मोराकडेच वेधलें. इतक्यांत अबुल कासीम हा चटकन् तें झाड उचलून दुसरीकडे घेऊन गेला. हरून् अल् रशीद यानें हें पहातांच त्याला मोठा चमत्कार वाटला, व थोडा रागही आला; आणि तो मनांत ह्मणाला, 'वाः, याचा अर्थ तरी काय? या गृहस्थास मला वाटत होतें तितका सभ्यपणाचा रिवाज माहीत नाहीं असें दिसतें. नाहीं तर, माझें मन त्या झाडाकडे व पक्ष्याकडे गर्क झालें असतां यानें तें झाड येथून उचलून नेलें नसतें. अथवा न जाणों, असेंही कदाचित् असेल कीं माझें मन त्यावर बसलें असें पाहून त्याजपाशीं मी तें मागेन अशी त्याला भीति पडली असावी; व यावरून माझ्या मनांत असें येतें कीं, जाफर यानें यास मोठा श्रीमान् व उदार असें जें ह्मटलें ही त्याची चूक आहे.'

हे विचार कालिफाच्या मनांत चालले असतां अबुल कासीम हा, एक लहानसा हुजऱ्या बरोबर घेऊन लागलाच दिवाणखान्यांत आला. तो हुजऱ्या केवळ मदनाचा पुतळाच होता. त्यानें जो भरगच्ची झगा अंगांत घातला होता, त्याजवर मोत्यें आणि हिरे यांचा कशिदा काढलेला होता. त्याच्या हातांत माणकाचा एकसंधी पेला असून त्यांत जांभळ्या रंगाचें मद्य भरलेलें होतें. तो हुजऱ्या कालिफाच्या जवळ येऊन त्यानें त्याजपुढें दंडवत घातलें, आणि तो पेला त्याजपुढें केला. कालिफानें तो घेऊन त्यांतील मद्य प्राशन केलें. नंतर त्यानें तो परत त्या हुजऱ्यापाशीं दिला, तेव्हां तो फिरून तसाच तसाच भरलेला कालिफाच्या दृष्टीस पडला. हें पाहून त्यास

जें आश्चर्य वाटलें तें सांगतां पुरवत नाहीं ! त्यानें लागलाच तो पेला हुजऱ्याच्या हातून परत घेतला, व फिरून त्यांतलें मद्य तो प्याला. नंतर पुनः त्यानें तो हुजऱ्याच्या हातीं दिला असतां पुनःही तो तसाचा तसाच भरलेला त्याला दिसला !

हा अलौकिक चमत्कार पाहून कालीफ केवळ आश्चर्यसागरांत निमग्न झाला, व त्यामुळें पूर्वी सांगितलेलें तें झाड व पक्षी यांचा त्यास विसर पडला. मग कालीफ अबुल कासीम यास ह्मणतो, 'हा चमत्कार कशाप्रकारें घडतो हें मेहेरबानी करून सांगाल काय ?' अबुल कासीम उत्तर करतो, ' महाराज, हा पेला एका अत्यंत प्राचीन अवलियानें केलेला आहे. त्याला सृष्टीचे अंतर्बाह्य सर्व व्यापार अवगत होते.' असें ह्मणून अबुल कासीम हा त्या हुजऱ्यास हातीं धरून लागलाच दिवाणखान्यांतून निघून गेला. तेव्हां कालिफास पहिल्याप्रमाणेंच पराकाष्ठेचें नवल वाटलें, व तसाच रागही आला. तो मनांत ह्मणाला, ' मला वाटतें, ह्या मनुष्याचें देहभान जाग्यावर नाहीं. हा ह्या अजब चिजा मी न सांगतां मला दाखवितो, आणि त्या पाहून मला त्याचें कौतुक वाटूं लागलें असें दिसतांच एकदम घेऊन जातो ! असला विक्षिप्तपणा व हलकटपणा मीं कोठें पाहिला नाहीं !' मग दांत ओंठ खाऊन ह्मणतो, 'जाफऱ्या, मनुष्याची योग्यता कशी जाणावी हें मी तुला लौकरच समजावून सांगतों ! असो; एकंदरीनें हा मनुष्य कांहीं अंशीं वेडसर तरी आहे यांत संशय नाहीं !' असें कालीफ आपल्या मनांत ह्मणत आहे तों अबुल कासीम हा फिरून लागलीच बरोबर एक सुंदर तरुण स्त्री घेऊन आला. ती नखशिखान्त मोत्यें व हिरेमाणकें यांच्या अलंकारांनीं भरून गेलेली होती, व तिच्या पोषाखाचें तर वर्णनही करतां येणार नाहीं, इतका तो मौल्यवान् व सुंदर होता. पण यापेक्षां, तिच्या आंगीं सौंदर्य जें होतें त्यापुढें हे बाह्योपचार अगदीं फिके दिसत होते ! अशी ती देवांगनेसही लाजविणारी स्त्री पाहून कालिफास आपण मृत्युलोकीं आहों कीं स्वर्गलोकीं आहों याचें भान राहिलें नाहीं ! त्या स्त्रीनें कालिफास लवून सलाम केला; व ती अमळ त्याच्याजवळ आली,

तेव्हां तर त्याच्या अंगावर केवळ रोमांच उभे राहिले! कालिफानें तिला खालीं बसविलें, इतक्यांत अबुल कासीम यानें एक विणा लावून आणावयास सांगितलेला होता तो आल्याबरोबर त्यानें तो त्या स्त्रीच्या हातीं दिला. तेव्हां तिनें तो वाजविण्यास व गाण्यास सुरुवात केली. तिनें उत्कृष्ट तालसुरावर गाऊन इतकी कांहीं बहार करून दिली कीं, कालीफ अगदीं तल्लीन होऊन गेला. मग तो अबुल कासीम यास ह्मणाला, 'अहो साहेब, तुह्मीं तर मला ह्या एकीपेक्षां एक अजब चिजा दाखवून अगदीं थक्क करून सोडिलें! तुमच्यासारखी स्थिति ज्याची आहे तो या पृथ्वीच्या पाठीवर केवळ धन्य होय! अशी स्थिति खरोखर या जगांत कोणाची असेल, असें मला वाटत नाहीं. फार काय सांगूं! पण सद्धर्मप्रतिपालक महापराक्रमी जो कालीफ, त्याचीही अशी स्थिति नसेल असें ह्मटल्यावांचून मला राहवत नाहीं!'

या स्त्रीला पाहून व तिचें गाणेंबजावणें ऐकून कालीफ पराकाष्ठेचा खुष झाला असें दिसल्याबरोबर अबुल कासीम हा लागलीच तिला हातीं धरून दिवाणखान्याच्या बाहेर घेऊन गेला.

[ दिवस[1] तिसरा. ]

त्या स्त्रीला अबुल कासीम चटकन् घेऊन गेला, या गोष्टीमुळें पुनः कालिफास राग आला, व तो तें बोलून दाखविण्याच्याही बेतांत होता. पण त्यानें आपलें मन आवरून धरिलें. इतक्यांत अबुल कासीम परत आला, व ते दोघेजण संध्याकाळपर्यंत मजेनें इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसले. नंतर कालीफ अबुल कासीम यास ह्मणाला, 'साहेब, तुह्मीं माझें जें आदरातिथ्य व पाहुणचार केला, त्याबद्दल तुमचे जितके आभार मानावे, व तुमच्या स्वभावाची जितकी तारीफ करावी तितकी थोडीच! हा वेळपर्यंत तुह्मांला मजकरितां पुष्कळ श्रम झाले, करितां आतां तुह्मीं स्वस्थ बसावें, व मला

---

१. येथून पुढें दाईची त्या त्या दिवशींची गोष्ट सांगण्याची वेळ संपून दुसरे दिवशीं ती गोष्ट पुढें सुरू करणार अशा अर्थाचा मजकूर पुनः पुनः घालून उगीच जागा अडविली नाहीं.

जाण्यास परवानगी द्यावी.' तेव्हां अबुल कासीम यानें, हा गृहस्थ येवढा वेळ बसला तर आतां याला आणखी बसण्याविषयीं आग्रह करणें हें बरोबर नाहीं असें जाणून, मोठ्या आदरानें त्यानें त्यास सलाम केला, व दरवाज्यापर्यंत तो त्यास पोहोंचवायास गेला. शेवटीं निरोप घेतांना त्यानें कालिफास दिलगिरी दर्शविली कीं, 'तुमच्या थोरवीप्रमाणें तुमचा मानमरातब मजकडून राखला गेला नाहीं, याबद्दल मला जरा वाईट वाटतें.' कालिफानें त्यास ह्मटलें, 'तसें मुळींच नाहीं. तुह्मीं जें काय मजकरितां केलें, त्याच्या योगानें मला किती संतोष झाला हें मीं पूर्वीं सांगितलेंच आहे. तुह्मी असें ह्मणतां हें तुमच्या अनुपम सौजन्याचें व निरभिमानीपणाचें लक्षण होय, असें मी अंतःकरणपूर्वक सांगतों.'

मग कालीफ परत भटारखान्याकडे चालला असतां रस्त्यानें अबुल कासीम याजविषयीं त्याच्या मनांत आणखी विचार चालले. तो ह्मणाला, 'ह्या गृहस्थाची संपत्ति व याच्या येथला थाटमाट हीं सार्वभौम राजाच्यापेक्षांही फार अधिक आहेत यांत संशय नाहीं. परंतु औदार्याच्या संबंधानें मात्र वजिरानें माझ्याशीं जी त्याची तुलना केली, तींत मुळींच अर्थ नाहीं. कारण, याच्या अंगीं औदार्य असतें तर त्यानें ज्या वस्तु मला दाखविल्या त्यापैकीं एकादी तो मला घ्या ह्मणून ह्मणताना का? मी तें झाड, तो पेला, तो हुजऱ्या व ती तरुण स्त्री यांच्याकडे एकसारखी नजर लावून बसलों होतों, तेव्हां तीं सर्व माझ्या मनांत अतिशय भरलीं हें त्याच्या लक्षांत अर्थात् आलेंच असेल; असें असून, तुह्मांला यांपैकीं कांहीं हवें का? असें तोंडानें देखील तो फुकाचें ह्मणाला नाहीं! यावरून हें खचीत कीं, या मनुष्याच्या मनांत लोकांत आपला उगीच डामडौल मिरवावा येवढीच कायती इच्छा आहे. लोकांना आपली संपत्ति दाखवावी व लोकांनीं त्याबद्दल आश्चर्य करावें, आणि तें पाहून आपण मनांत आनंद करावा, हीच याला मोठी हौस दिसते. तेव्हां वास्तविक विचार करून पाहिला असतां या मनुष्यांत एकंदरीनें कांहीं अर्थ नाहीं. हा आपला एक मोठा श्रीमान् परंतु पहिल्या प्रतीचा कृपण माणूस आहे. याकरितां, जाफर

यानें मला जी गोष्ट सांगितली ती मिथ्या असून तिजबद्दल त्याला प्रायश्चित्त मिळाल्यावांचून रहाणार नाहीं !'

याप्रमाणें जाफर वजिराविषयीं कालिफाच्या मनांत प्रथमपासून जो विपरीत भाव उत्पन्न झालेला होता तो अगदीं कायम होऊन बसला. पण इकडे असें झालें कीं, कालिफ हा भटारखान्यांत परत येऊन पोहोंचतो तों, तेथें नानाप्रकारच्या उंची बुटीदार कापडाचे कित्येक गठ्ठे, मोठमोठ्या अमिरउमरावांस राहण्याच्या योग्यतेचे तंबू, कित्येक दासदासी, तसेच सुंदर अरबी घोडे, खेंचरें व उंट, त्याचप्रमाणें त्यानें नुकतेंच अबुल कासीम याच्या येथें पाहिलेलें तें अत्यंत मौल्यवान् व अप्रतिम असें झाड व तो त्यावरचा मोर, तो पेला हातांत घेतलेला लहानसा सुरेख हुजऱ्या, आणि विणा घेतलेली ती लावण्याची केवळ खाण अशी तरुण स्त्री, असें लटांबरचें लटांबर त्या ठिकाणीं आलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून त्याला फारच नवल वाटलें.

त्या सर्व दासदासींनीं कालिफास साष्टांग नमस्कार घातले. नंतर त्या सुंदर स्त्रीनें एक रेशमी कागदाचा लखोटा मोठ्या नम्रतेनें त्याच्या हातीं दिला. तो त्यानें उघडला, तों त्यांत पुढील मजकूर होता:—

"दोस्तसाहेब,

"आजपर्यंत तुमची माझी ओळख नव्हती, व अद्यापिही तुम्ही कोण हें "मला पक्कें समजलें नाहीं. तथापि तुमच्या योग्यतेप्रमाणें मजकडून तुमचा "सन्मान झाला नाहीं हें खचीत. आतां तुम्ही मला या संबंधानें संतोष दा- "खविला, हा तुमचा चांगुलपणा होय. पण माझ्या मनाला झगाल तर मोठी "खुरखूर लागून राहिली आहे. याकरितां मजकडून जी चुकी झाली, तिची "माफी करून हा जो अल्प नजराणा आपणांस पाठविला आहे, त्याचा कृपा "करून स्वीकार करावा; अनमान करूं नये. हें पाठविलेलें झाड, मोर, हु- "जऱ्या, पेला आणि ही तरुण स्त्री, हीं तुम्हांला आवडलीं असें जेव्हां मला "दिसलें, तेव्हांच अर्थात् तीं तुमचीं झालीं; कारण माझा असा शिरस्ता आहे "कीं, माझ्या दोस्ताला जें कांहीं आवडलें तें मी माझें समजत नाहीं. त्या "वेळेपासून तें त्याचें झालें असें मी समजतों. कळावें. सुज्ञांस विशेष काय "लिहिणें, हे विनंति.

आपला निरंतर स्नेह इच्छिणारा,

अबुल कासीम,"

कालिफानें हें पत्र वाचल्यावर अबुल कासीम हा केवढा उदार मनुष्य आहे याविषयीं त्याची पूर्ण खात्री झाली. तो मनांत ह्मणतो, 'मी किती तरी उतावळा व अविचारी, कीं एकदम तो पहिल्या प्रतीचा कृपण ह्मणून मनांत गांठ बांधली ! माझा वजीर जाफर हा खरोखरच मोठा सुज्ञ आणि विचारी आहे. तो कधींही खोटें बोलावयाचा नाहीं. त्याची योग्यता अशी आहे कीं, माझी सर्व संपत्ति त्याजवरून ओंवाळून टाकावी ! कारण, त्यानें मला उघडपणें गोष्ट बोलून दाखविली नसती, तर मी असाच जन्मभर रिकामा डामडौल मिरवीत राहिलों असतों ! ' मग स्वतःलाच उद्देशून ह्मणतो, 'अरे हरून् अल् रशीद, सर्व जगांत मीच काय तो श्रीमंत आणि उदार अशी शेखी तूं आजपर्यंत मिरवीत होतास, पण तुला ठाऊक नव्हतें कीं तुझ्या प्रजेपैकीं यःकश्चित् अशा एका सामान्य मनुष्याची संपत्ति आणि औदार्य हीं तुझ्यापेक्षां ज्यास्त आहेत ! ' मग अंमळसा विचार करून ह्मणतो, 'पण अशा केवळ साधारण मनुष्यापाशीं येवढें द्रव्य कोठून आलें असावें बरें ? खरोखर, त्याचवेळेस त्याला मीं ही गोष्ट विचारावयास पाहिजे होती. ती मीं विचारली नाहीं हा माझाच दोष होय. बरें असो, कांहीं चिंता नाहीं. या गूढ गोष्टीचा मी छडा लावीपर्यंत बगदादेस परत जावयाचा नाहीं, हा माझा निश्चय झाला. वास्तविक ही मोठी अचंब्याची गोष्ट नाहीं काय, कीं ज्या येवढ्या अफाट देशाचें मी राज्य करतों, त्यांतील कोणीकडचा एक सामान्य मनुष्य माझ्यापेक्षांही अधिक संपत्तिमान् आहे ! हें गूढ मला समजणें अत्यंत महत्त्वाचें आहे. मी त्याला पुनः एकदां जाऊन भेटतों, व ही अपार संपत्ति तुला कोणत्या मार्गानें प्राप्त झाली, तो मार्ग आपल्याला सांगण्याविषयीं हरयुक्ति करून त्याचें मन वळवितों.'

असें ह्मणून एक क्षणभरही न थांबतां कालीफ हा, आपल्यास नजर आलेल्या त्या दासदासी वगैरेंस तसेंच बिऱ्हाडांत ठेवून अबुल कासीम याच्या घरीं आला, व तो एकटाच आहे असें पाहून त्यास ह्मणतो, 'साहेब. तुह्मीं मला जो येवढा मौल्यवान् नजराणा पाठविला, त्याचा मीं स्वीकार केला असतां तुमच्या औदार्याचा मीं दु-

रुपयोग केला असें होईल कीं काय अशी मला शंका येते. याक-रितां कृपा करून नजराणा परत पाठविण्याविषयीं मला परवानगी द्या. तुह्मीं माझी येथें जी बरदास्त ठेविली तिच्या योगानें मला पराकाष्ठेचा आनंद झाला यास्तव तुमची संपत्ति आणि औदार्य हीं केवढीं आहेत हें मी बगदादेस गेल्यावर सर्व लोकांत प्रसिद्ध करण्याविषयीं मला परवानगी द्या, येवढेंच माझें मागणें आहे.'

हें ऐकून अबुल कासीम खिन्न होऊन ह्मणतो, 'अहो साहेब, मज हतभाग्यावर अशी आपली अवकृपा होण्यास कांहीं तरी कारण झालें असावें असें दिसतें ! मला वाटतें कीं, माझ्या वागणुकींत कांहीं तरी चूक झाली ह्मणून तुह्मीं या नजराण्याचा स्वीकार करण्याचें नाकारलें, दुसरें कांहीं नाहीं. मजकडून तुमची तबियत जर चांगली संभाळली गेली असती, तर खचीत तुह्मीं मला हें शासन केलें नसतें !' कालीफ ह्मणतो. 'छे छे ! ही शंका तुमच्या मनांत व्यर्थ आली. ईश्वर साक्ष आहे; मी तुह्मांस खचीत सांगतों कीं, तुमच्या वर्तणुकींत तिळप्रायही मला वाईट वाटण्यासारखें नव्हतें. हेंच काय, पण तुमची थोरवी पाहून मी उलटा चकित होऊन गेलों ! आतां तुमचा नजराणा परत करण्याचें कारण इतकेंच कीं, तो अतिशय मौल्यवान् आहे. फार काय सांगावें ? पण राजाच्याही योग्यतेपेक्षां तो अधिक आहे. आणि खरें पुसाल तर मी तुह्मांला मित्रधर्मानें सांगतों कीं, तुह्मीं आपली संपत्ति अशी उधळेपणानें खर्च करावी हें मला वाजवी दिसत नाहीं, कां कीं ती सदोदित अशीच टिकेल ह्मणून काय नियम आहे ? तुह्मी असा अविचारानें खर्च करूं लागलां तर एकादे दिवशीं तुमचें दिवाळें वाजण्याचा संभव आहे !'

हे कालिफाचे शब्द ऐकून अबुल कासीम किंचित् हंसून ह्मणाला, 'दोस्तसाहेब, मला मोठा आनंद वाटतो कीं, माझ्या नजराण्याचा आपण स्वीकार करीत नाहीं याचें कारण माझ्या वागणुकींत आपल्याला कांहीं दोष आढळून आला हें नव्हे. आतां ज्याअर्थी तुह्मी मन मोकळें करून मजशीं बोलला, त्याअर्थी मीही तुह्मांला मन मोकळें करून सांगतों कीं, मी अशा प्रकारें दररोज जरी नजराणे

किंवा देणग्या देत गेलों, तरी माझ्या संपत्तींत उणेपणा ह्मणून मुळींच येणार नाहीं ! याकरितां माझा नजराणा स्वीकारण्याविषयीं आपण मनांत शंका आणूं नये. मीं हें जें काय म्हटलें, त्याचें तुह्मांला मोठें आश्चर्य वाटलें असेल. पण मी आपली एकंदर हकीकत जेव्हां तुह्मांला सांगेन, तेव्हां मी काय ह्मणतों याविषयीं तुमच्या मनाची खात्री होईल. ती हकीकत मी तुह्मांला सांगून, मी काय ह्मणतों याविषयींचा भरंवसा तुमच्या मनास पटेपर्यंत मला खचीत चैन पडणार नाहीं ! ' असें बोलून अबुल कासीम कालिफास हातीं धरून दुसऱ्या एका दिवाणखान्यांत घेऊन गेला. तो दिवाणखाना पूर्वींच्या दोहोंपेक्षांही शोभिवंत असून त्याच मानानें तेथला सर्व थाटमाटही विशेष होता. येथें जिकडेतिकडे सुगंधी द्रव्यांचा घमघमाट सुटला असून त्या सर्व जागेवर मोठी मौल्यवान् व अत्यंत सुरेख नक्षीची चादर पसरलेली होती, आणि दिवाणखान्याच्या अग्रभागीं एक मोठें रत्नखचित सोन्याचें सिंहासन ठेविलेलें होतें. हें सर्व पाहून कालीफ हरून् अल् रशीद यास आपल्या स्वतःच्या अतिशय श्रीमंतीथाटाच्या वाड्याची कल्पना करूनही पुरवेना ! त्याला वाटलें कीं आपण ज्याचे मांडलिक शोभूं अशा मोठ्या बलाढ्या व अत्यंत संपत्तिमान् राजाच्या वाड्यांत आहों ! असो. अबुल कासीम यानें कालिफास मोठ्या अदबीनें त्या सिंहासनावर बसविलें, व आपण त्याच्या शेजारीं आपली हकीकत त्यांस सांगूं लागला.

[ दिवस चौथा. ]

अबुल कासीम ह्मणतो—माझ्या बापाचें नांव अबदुल अजीज. तो कैरो येथील राहणारा असून जवाहिराचा व्यापार करीत असे. त्याची संपत्ति येवढी मोठी होती कीं, मिसरदेशच्या सुलतानास देखील त्याचा मत्सर उत्पन्न होऊन एकादे दिवशीं हा आपल्यावर घाला घालील असें माझ्या बापास भय पडलें. यास्तव तो देश सोडून तो बसरा येथें येऊन राहिला. या ठिकाणीं त्यानें एका मोठ्या धनाढ्य व्यापाऱ्याच्या एकुलत्या एका मुलीशीं लग्न केलें. तिला एकच मूल झालें, तेंच मी अबुल कासीम होय. माझ्या बापाची सं-

पत्ति अगोदरच विपुल होती, शिवाय माझ्या आईस तिच्या बापा-कडून आणखी पुष्कळ द्रव्य मिळालें होतें. तेव्हां त्या उभयतांच्या मरणानंतर तो सर्व पैसा मला मिळून माझी खूबच चंगळ झाली. त्या वेळीं मी ऐन उमेदींत असून पैसा ह्मणजे काय हें माझ्या खिस-गणतींतही नव्हतें. तो मीं हवा तसा उधळण्यास सुरवात केली. मीं लोकांच्या स्तुतीला भुलून आपला डौल मिरविण्यासाठीं जो जें मागेल तें त्याला देऊं लागलों. अशा प्रकारें पाण्यासारखा माझा पैसा चालला, तेव्हां तो किती दिवस टिकणार ? सुमारें दोन तीन वर्षां-तच माझें दिवाळें वाजण्याचा बेत आला ! तेव्हां मी शुद्धीवर आलों, व आपण आजपर्यंत केवढा मूर्खपणा केला हें मला पक्कें समजलें.

तेव्हां आतां पुढें कसें करावें याच्या मी विचारांत पडलों. ह्मण आहे कीं, "जेथें फुलें विकलीं, तेथें गोंवऱ्या विकूं नयेत." त्या-प्रमाणें जेथें मी अमीरउमरावांच्या थाटानें राहिलों, त्याच ठिकाणीं हालअपेष्टा भोगीत राहण्यापेक्षां दुसरीकडे कोठें तरी आपले आयु-ष्याचे दिवस घालवावे असें माझ्या मनांत आलें. मग, ज्यावर आतां माझी सत्ता राहिली होती असें काय तें माझें घर नाहीं ह्मणायला होतें तें मीं विकून टाकलें, व कांहीं व्यापारी लोक दूरदेशीं जावयास निघाले होते, त्यांबरोबर मीही निघालों. आह्मी प्रथम मोसल शहरास, व नंतर तेथून दमास्कास शहरास गेलों: व नंतर पुढें अरबस्थानचें अरण्य व फारन पर्वत ह्यांतून मार्ग काढीत केरो येथें येऊन पोहोंचलों.

केरो येथील मोठमोठ्या, सुंदर व भव्य हवेल्या आणि मशिदी व त्या शहराचें एकंदर वैभव पाहून मी अगदीं चकित होऊन गेलों, व माझा बाप अबदुल अजीज हा ज्या ठिकाणीं जन्मला तेंच हें शहर हें माझ्या मनांत येऊन मला दुःखाचा मोठा उमाळा आला, आणि माझ्या नेत्रांतून खळखळ अश्रुधारा चालल्या. मीं मनांत ह्म-टलें, 'बाबा, तुह्मी आज जर जिवंत असतां, तर ज्या ठिकाणीं तुह्मी राजालाही मत्सर उत्पन्न करणारी अशी रापद भोगीत होतां, त्याच

ठिकाणीं तुमचा हा हतभाग्य मुलगा अशा दीन अवस्थेंत पाहून तुम्हांला केवढें अमर्याद दुःख झालें असतें !'

हे विचार माझ्या मनांत चालले असतां मला फारच दुःख झालें व मी कोणीकडे जावयाचें हा कांहीं एक उद्देश मनांत न धरतां उगीच आपला भटक्या मारीत चाललों. याप्रमाणें जातां जातां मी नीलनदीच्या कांठीं जाऊन पोहोंचलों. तेथें नजीकच मिसरदेशच्या सुलतानचा वाडा असून त्याची मागील बाजू नदीच्या कांठाकडे होती. मी नदीच्या कांठीं उभा असतां माझी नजर वाड्याकडे सहज गेली, तों त्याच्या एका खिडकींत एक तरुण स्त्री माझ्या नजरेस पडली. तिचें सौंदर्य पाहून मी अगदीं वेडावून गेलों, व एकसारखा तिच्याकडे पाहत उभा राहिलों. तें पाहून ती आंत गेली व माझ्या दृष्टीआड झाली. त्यावेळीं संध्याकाळ झालेला होता, व मी तर अद्यापि बिऱ्हाडाची वगैरे सोय पाहिलेली नव्हती, सबब लागलाच मी जवळच्या मह्ल्यांतील एका मशिदींत गेलों, व तेथेंच रात्रभर राहिलों.

त्या रात्रीं माझा डोळा ह्मणून कसा तो लागला नाहीं. त्या स्त्रीची मूर्ति एकसारखी माझ्यापुढें उभी होती. हिनें आपणाला पूर्णपणें मोहित केलें हें मला समजून आलें, व देवा ! ती माझ्या नजरेस जरी पडली नसती तरी चांगलें झालें असतें, असें मला वाटूं लागलें. बरें, माझ्या ती नजरेस पडली तर पडली, पण मीं तिच्या दृष्टीस कां पडावें ! तिच्या जर मी दृष्टीस पडलों नसतों, तर ती माझ्या नजरेआड झाली नसती व तिजकडे आणखी पुष्कळ वेळ पाहून मी आपल्या नेत्रांचें समाधान तरी करून घेतलें असतें, असें मला वाटलें. मग दुसरे दिवशीं सकाळीं ती स्त्री फिरून दृष्टीस पडावी ह्मणून मी पुनः आदले दिवशींच्या ठिकाणीं नदीच्या कांठीं जाऊन मोठ्या उत्कंठेनें उभा राहिलों. पण ती माझी उत्कंठा व्यर्थ गेली. ती स्त्री मुळींच माझ्या दृष्टीस पडली नाहीं. या योगानें तर मला दुप्पट दुःख झालें; पण माझी उमेद ह्मणाल तर बिलकूल खचली नाहीं ! 'आज नाहीं तर उद्यां तरी ती दृष्टीस पडेल, परवां पडेल,'

असें मीं मनांत ह्मटलें. नंतर पुनः दुसरे दिवशीं त्याच ठिकाणीं मी गेलों, व त्यावेळीं माझ्या इच्छेप्रमाणें घडलें. ती स्त्री माझ्या दृष्टीस पडली, व तिच्याही मी दृष्टीस पडलों. तेव्हां माझे डोळे एकसारखे तिच्याकडे लागून राहिले आहेत असें तिनें पाहून रागानें मला ह्मटलें, 'अरे उमट मनुष्या, या वाड्याच्या खिडकीखालीं पुरुषांना येण्याची मनाई आहे हें तुला ठाऊक नाहीं काय? असो. आतां एका क्षणाचाही विलंब न करितां जीव घेऊन येथून पळून जा. वाड्यांतल्या एकाद्या माणसानें जर तुला येथें पाहिलें, तर तो तुला तावडतोब ठार करील!'

हे त्या स्त्रीचे शब्द ऐकून माझ्या मनांत भीतीचा लेशही उत्पन्न झाला नाहीं, मग मी पळून जाण्याची गोष्ट कशाला पाहिजे? मीं तेथूनच तिला साष्टांग नमस्कार घातला, व उठून ह्मटलें, 'बाईसाहेब, मी येथें अगदीं नवखा आहें. मला या तुमच्या शहरचे रीतरिवाज अगदींच माहीत नाहींत. आणि जरी कदाचित् ते माहीत असते, तरी तुमच्या अत्यंत मोहक रूपानें मला इतकें वेडें करून टाकलें आहे कीं, ते रिवाज मला माहीत असते तरी जाणून बुजूनच मीं त्यांची पर्वा केली नसती!' हें ऐकून ती फार संतापून ह्मणाली, 'अरे अविचारी मनुष्या,येथून एकदम काळें करतोस कीं नाहीं? का मी एकाद्या गुलामाला हांक मारून तुझी खोड काढण्याची तजवीज करूं?' असें ह्मणून ती तेथून नाहींशी झाली. तेव्हां मला वाटलें कीं, माझ्या लोचटपणाचा हिला राग येऊन ही मला शासन करण्याकरितां कोणाला तरी हांक मारण्याकरितां निघून गेली असावी. यावरून क्षणक्षणां मला असें वाटूं लागलें कीं, इतक्यांत आपल्याभोंवतीं शिपायांचा गराडा येऊन पडेल. तथापि तिनें मला जें भय घातलें त्याचें मला कांहींच वाटलें नाहीं; कां कीं, तिच्याकरितां मी कसलेंही संकट सोसण्यास तयार होतों; पण तिला राग आल्याचें पाहून मात्र मला अतिशय दुःख झालें. मग मी कांहीं शुद्धीवर, कांहीं भ्रमांत, असा हळू हळू आपल्या बिऱ्हाडाकडे निघून आलों. त्या रात्रीं माझी जी अवस्था झाली, तिचें वर्णन करणें कठिण आहे;—तिची क-

ल्पनाच केली पाहिजे! मला जो त्या स्त्रीविषयीं आषक उत्पन्न झाला, त्या योगानें मला मोठा जोराचा ताप आला, माझें मस्तक पराकाष्ठेचें चढून गेलें, व मला कांहीं एक सुचेनासें झालें. तथापि कांहीं वेळानें ती स्त्री पुनः आपल्या नजरेस पडेल व आपल्याकडे कृपादृष्टीनें पाहील, अशी मला आशा उत्पन्न होऊन माझें मन जरा स्थिरस्थावर झालें, व मला अंमळ बरें वाटूं लागलें.

नंतर दुसरे दिवशीं हेच विचार मनांत घोळत असतां मी पुनः नदीच्या कांठीं गेलों, आणि पूर्वींप्रमाणेंच खिडकीकडे पहात उभा राहिलों. त्या स्त्रीची व माझी लौकरच नजरानजर झाली. पण तिची मुद्रा इतकी क्रोधायमान दिसली कीं, ती पाहून मी थरथरां कांपूं लागलों! ती ह्मणाली, 'अरे मूर्खा, मी तुला इतकें निक्षून बोललें असतां अजून तूं या ठिकाणीं येण्याचें सोडीत नाहींसना! मला तुझी दया येऊन मी एकवार पुनः तुला सांगतें कीं, तूं येथून ताबडतोब निघून जा. जर का येथें क्षणभर राहिलास, तर तुझ्या डोक्यावर आकाशाची कुऱ्हाड पडलीच असे समज!' इतकें ती बोलली तरी मी हाललों नाहीं असें पाहून ती ह्मणते, 'कां, तूं अजून माझें ऐकत नाहींसना? हँ, पहा,—आतां एक क्षणांत तुझ्या डोक्याचा चुराडा उडून जाईल!'

इतकें ती स्त्री बोलल्यावर, माझ्याशिवाय दुसरा कोणीही तेथें असता तरी तो तेथून ताबडतोब पळ काढल्यावांचून राहताना; पण आषकाच्या योगानें मी अगदीं दिवाणा होऊन गेल्यामुळें, ती जरी इतकी रागानें बोलली तरी मला त्याचें कौतुकच वाटलें. मीं तिला ह्मटलें, 'हे मनमोहिनी, जो मी हतभाग्य मनुष्य तुजवर येवढा आसक्त झालों आहें, तो मी जिवाची पर्वा करीन असें तुला वाटतें काय? छी छी! तुझ्या प्राप्तीवांचून या जगांत राहण्यापेक्षां मला मरण हजार वाट्यांनीं पुरवलें!' हें ऐकून त्या स्त्रीनें लागलाच आपला स्वर बदलला, आणि हळूच ह्मणाली, 'बरें, जर तूं आपला हट्ट सोडीतच नाहींस, तर सध्यां येथून निघून शहरांत आपल्या बिऱ्हाडीं जा, आणि रात्र झाली ह्मणजे येथें ये.' इतकें बोलून लागलींच ती

आंत निघून गेली, व मी, आश्चर्य, तिच्याविषयीं अत्यंत प्रेम, आणि मनाचा पराकाष्ठेचा उल्हास, या त्रिवेणिसंगमांत आनंदानें पोहूं लागलों!

या वेळेच्या पूर्वी त्या स्त्रीनें मला जें काय करावयास सांगितलें, त्याकडे मीं बिलकूल लक्ष दिलें नव्हतें. पण या वेळीं अर्थातच तिची आज्ञा मीं मोठ्या आनंदानें शिरसा मान्य केली. व लागलाच बिन्हाडाकडे चालता झालों. मी भावी सुखाच्या आशेंत निमग्न झाल्याकारणानें माझ्या सर्व दुःखाचा मला विसर पडला. मला वाटलें कीं, आजपर्यंत मी जो आपल्या नशिबाला दोष लावित होतों. तो उगीच. त्याचा वचपा हल्लीं प्राप्त होणाऱ्या सुखाच्या योगानें लाखपटीनें भरून येणार आहे. असो, मग मी लागलाच तेथून चालता झालों, व बिन्हाडीं आल्यावर मजजवळ जें काय होतें नव्हतें तें खर्च करून चांगला झगझगीत पोषाख करण्याची व अंगाला उत्तम प्रकारची सुगंधी तेलें वगैरे लावण्याची तजवीज केली.

रात्र झाल्यावर संकेताच्या ठिकाणीं जाण्याची जेव्हां वेळ आली, तेव्हां माझा हर्ष त्रिभुवनांत माईनासा झाला. त्यावेळीं काळोख इतका पडला होता कीं, डोळ्यांत बोट घातलें तरी दिसावयाचें नाहीं! तथापि माझ्या हृदयांतील आषख हा मला वाट दाखवण्यास मोठ्या उत्कंठेनें तयार असल्यामुळें मी डोळे मिटून अगदीं बिनचूक अगदीं नेमलेल्या जागीं गेलों! खिडकीजवळ जातांच तेथून एक दोर खालीं सोडलेला माझ्या दृष्टीस पडला. त्याच्या साह्यानें चटदिशीं मी त्या रूपवती स्त्रीच्या महालांत गेलों. ती तेथें उभी होतीच. तिनें तेथून मला दुसऱ्या एका महालांत नेलें, व तो टाकून आणखी तिसऱ्यांत आह्मी गेलों. तेथली शोभा व थाटमाट याचें वर्णन मी करूं लागलों तर एक प्रहर लागेल, याकरितां तसें करीत नाहीं. शिवाय दुसरें असें कीं, तेथें ज्या कांहीं अपूर्व चिजा वगैरे होत्या, त्यांकडे माझें बिलकूल लक्ष गेलें नाहीं;–माझें सर्व लक्ष केवळ त्या प्राणवल्लभेकडे लागून राहिलें होतें. दोस्तसाहेब, काय सांगूं! असें अप्रतिम रूप कधींच कोणीं पाहिलें नसेल! मला खचीत वाटलें कीं,

मनुष्यसृष्टि ही आपली सर्वांत उत्तम करणी हें दाखविण्याकरितांच विधात्यानें तें अप्रतिम स्त्रीरत्न निर्माण केलें असावें !

असो; महालाच्या मध्यभागीं रुप्याचें सिंहासन होतें, त्यावर त्या स्त्रीनें मला नेऊन बसविलें, व आपण माझ्या शेजारीं बसून मी कोण, कोठला, वगैरे हकीकत मला विचारिली. मीं आपली सर्व हकीकत थोडक्यांत पण अगदीं खरी होती तशी तिला सांगितली. ती तिनें फार लक्षपूर्वक ऐकिली, व माझी दुःखद स्थिति पाहून तिला खरोखर वाईट वाटलें असें मला दिसलें, आणि या योगानें तर मजवर तिचें इतकें प्रेम बसून गेलें कीं, हिजवरून आपला देह ओंवाळून टाकावा असें मला वाटलें, मीं तिला ह्मटलें, 'बाईसाहेब, माझी स्थिति कशीही असो, पण ज्या अर्थीं मजविषयीं तुह्मांस दया उत्पन्न झाली आहे, त्या अर्थीं इतःपर मी आपल्याला दुःखी समजत नाहीं; इतकेंच नव्हे, तर सुखाच्या केवळ शिखरास जाऊन पोहोंचलों आहे असें समजतों !'

[ दिवस पांचवा. ]

अबुल कासीम ह्मणतो---याप्रमाणें आह्मां उभयतांचीं मनें एकमेकांवर बसून गेलीं, व उभयतांच्याही चेहऱ्यांवर एकमेकांविषयीं प्रेमाचे अंकुर दिसूं लागले. त्या स्त्रीनें मला बोलून दाखविलें कीं, ' मला पाहून तुमच्या मनाची जशी स्थिति झाली, त्याप्रमाणेंच तुह्मांला पाहूनही माझें अंतःकरण तुम्हांवर प्रसन्न झालें आहे. आणि ज्या अर्थीं तुह्मीं मोकळ्या मनानें आपला सर्व वृत्तांत मला निवेदन केला, त्या अर्थीं मीही आपला तुह्मांस सांगावा हें योग्य आहे. असें ह्मणून ती आपली हकीकत मला सांगूं लागली.

### दार्दानी हिची हकीकत.

ती ह्मणते—माझें नांव दार्दानी. माझा जन्म दामास नामक शहरीं झाला. माझा बाप, त्या ठिकाणीं हल्लीं जो सुलतान राज्य करीत आहे, त्याचा वजीर होता; त्याचें नांव बेहरूज. तो अत्यंत थोर मनाचा मनुष्य होता, म्हणजे आपल्या धन्याचें व त्याच्या प्रजेचे जेणेंकरून हित होईल अशा प्रकारचाच आपल्या कारभारांत सदोदित व-

तेनक्रम ठेवावयाचा असा त्याचा दृढ निश्चय होता. परंतु जगांत चांगल्यापेक्षां वाईट लोकांची संख्या अधिक आहे हें अनुभवासिद्धच आहे. त्याप्रमाणें, माझ्या बापाखेरीज दुसरे जे कोणी मंत्री होते. त्यांपैकीं बहुतेकांचीं मतें व कृति हीं माझ्या बापाच्या अगदीं उलट होतीं. तेव्हां अर्थातच माझ्या बापाशीं त्यांचें वांकडें पडलें. व त्याजविषयीं त्यांनीं सुलतानाच्या मनांत नाहीं नाहीं तसल्या गोष्टी भरवून देऊन त्याचें मन दूषित केलें. याचा परिणाम उवढच असा झाला कीं. बिचारा माझा बाप बेहरूज वजीर यानें बहुत वर्षे इमानेइतबारें आपलें काम केलें असतां त्याला सुलतानानें एकदम कामावरून दूर केलें ! तरी तो मोठा समाधानी पुरुष असल्यामुळें हा व्याप सुटला हें एकपरी बरें झालें असें मानून, स्वस्थ आपल्या घरीं. राहिलेले आयुष्याचे दिवस ईश्वरसेवेंत घालवीत राहिला. तथापि मनुष्याला कांहींना कांहीं तरी इतर व्यवसाय थोडा बहुत लागतोच. तो व्यवसाय. माझ्या बापानें, मला उत्तम प्रकारचें शिक्षण देणें हाच आपला करण्याचा निश्चय केला. यापरतें दुसरें कांहीं तो करीत नसे. पण सांगण्यास दुःख वाटतें कीं, त्यानें मजकरितां केलेल्या श्रमांचें चीज झालेलं पहाण्यास तो जगला नाहीं ! तो लौकरच कांहीं दिवसांनीं मरण पावला.

माझा बाप मरण पावल्यानंतर लागलीच माझ्या आईनें आपली सर्व चीजवस्त विकून तिचा पैसा उभा केला. त्या निर्दयेनें मलाही दासींचा व्यापार करणाऱ्या एका व्यापाऱ्यास विकून टाकिलें ! नंतर ज्या एका तरुण मनुष्यावर ती फिदा झालेली होती त्याच्याबरोबर ती हिंदुस्थानांत निघून गेली. माझ्या आईनें ज्या व्यापाऱ्यास मला विकिलें, तो माझ्यासारख्याच दुसऱ्या कित्येक विकत घेतलेल्या स्त्रियांसह मला कैरो येथें घेऊन आला. नंतर त्यानें आह्मां सर्वांस भारी किंमतीचे पोषाख घालून एथील सुलतानाच्या वाड्यांत आणिलें आणि ज्या मोठ्या दिवाणखान्यांत सुलतान तक्तावर बसलेला होता, त्या ठिकाणीं त्याच्या समोर आह्मांस उभें केलें.

सुलतानानें आह्मांपैकीं प्रत्येकीस नीट लक्षपूर्वक पाहिलें. पण मी सर्वांत त्याला फारच पसंत पडलें असें दिसलें. मग तो तक्तावरून

खालीं उतरला, आणि मजजवळ येऊन अत्यंत प्रसन्न मुद्रेनें व हास्यवदन करून माझ्या सौंदर्याची त्यानें ओतप्रोत स्तुति केली. नंतर त्या व्यापाऱ्याकडे वळून त्यास तो ह्मणाला, 'शेटजी, तुह्मी आजपर्यंत मजकडे पुष्कळ स्त्रिया घेऊन आलां, पण असलें मापुक पाखरूं कधींच तुह्मांला आणायाला सांपडलें नाहीं. हिची किंमत तुह्मांला जी वाटेल ती सांगा;—कितीही सांगितली तरी तिजवरून मी ती ओंवाळून टाकीन !' नंतर त्यानें खोजांच्या जमादारास बोलावून आणून त्यास ह्मटलें, 'ह्या हृदयंगमेस एका निराळ्याच महालांत घेऊन जा.' त्याप्रमाणें जमादार मला ह्या सुंदर महालांत घेऊन आला. या राजवाड्यांत अनेक महाल आहेत, पण त्या सर्वांत याच्या प्रतीचा एकही नाहीं. मी येथें आल्यावर पुष्कळ वयस्क व तरुण दासी मजकडे आल्या. कांहींनीं मजकरितां बहुमोल पोषाख आणिला होता, तो त्या मला चढवावयास लागल्या, व कांहींनीं नानाप्रकारची उंची फळफळावळ व मिठाई आणिली होती, ती मजपुढें ठेवून मला फराळ करावयास विनंति केली. माझा फराळ झाल्यावर आणखी कित्येक रूपवती व तरुण दासी आल्या, त्यांनीं मजपुढें गाणेंबजावणें सुरू केलें. त्या सर्वांनीं मला सांगितलें कीं, 'आह्मां सर्वजणींस सुलतान साहेबांनीं आपल्या बरदास्तीकरितां नेमिलें आहे. आपण आह्मांस वाटेल तो हुकूम करावा, आह्मी आपल्या सेवेस अगदीं तयार आहों.'

पुढें थोडक्याच वेळानें सुलतानाची स्वारी मजकडे आली. त्यानें मला अत्यंत प्रेमानें कुरवाळिलें, व मजवरचा आपला प्रेमातिशय नानाप्रकारच्या प्रीतियुक्त शब्दांनीं व्यक्त करून दाखविला. तेव्हां ज्या विषयाच्या संबंधानें मी अज्ञान होतें, त्याबद्दल त्यानें मला प्रश्न केले असतां, त्यांचीं उत्तरें मजकडून कांहीं अंशीं वेडगळपणाचीं व बेअदबीचीं त्यास मिळालीं. तथापि त्यामुळें तो नाखुष न होतां उलटी मजवर त्याची प्रीति अधिकच जडली. सारांश, याप्रमाणें होतां होतां थोडक्याच दिवसांत मी त्याची अत्यंत प्रियकर पट्टराणी झालें. हें पाहून मजसारख्याच दुसऱ्या ज्या स्त्रिया येथें आहेत, त्यांना मजविषयीं मत्सर उत्पन्न झाला, व आज तीन वर्षें कोणत्या ना को-

गत्या तरी त्न्हेनें माझा नाश करण्याविषयीं रात्रंदिवस त्यांचा यत्न एकसारखा चालू आहे. पण मी मोठ्या खबरदारीनें रहात आहें, यामुळें त्यांचा हेतु मुळींच सफळ झाला नाहीं. आतां वास्तविक ह्मटलें तर मी कांहीं या सांप्रतच्या स्थितींत सौख्य मानितें असें बिलकूल नाहीं. कारण, सुलतान जरी मोठा उदार मनाचा असून मजवर खरें प्रेम करणारा आहे असा आजपर्यंतचा माझा अनुभव आहे, तरी तसेंच उलट माझें त्याजवर प्रेम बसावें असा माझा जन्मकाळचा योग नाहीं असें मला दिसतें. आणि खरोखर पुसाल तर, तुह्मांला पाहून जसा माझ्या अंतःकरणांत प्रीतीचा पाझर सुटला, तसा आजपर्यंत कोणत्याही पुरुषाविषयीं सुटला नाहीं. यावरून तुमच्यावर माझें मन बसून तुमच्या सुखदुःखाची मी विभागी व्हावें असा ईश्वरी संकेत आहे कीं काय असा विचार माझ्या मनांत येतो.

इतकें बोलल्यावर त्या सुंदरीच्या मुखकमलास लज्जा व आनंद ह्या दोहोंच्या योगानें कांहीं अनुपमच शोभा आली, व प्रेमभरानें तिचा कंठ सद्गदित होऊन तिच्यानें पुढें बोलवेनासें झालें. तिचें याप्रमाणें निष्कपट व खऱ्या प्रेमाचें भाषण व वर्तन पाहून मी अल्लाची शपथ वाहून तिला सांगितलें कीं, 'हे थोर व उदार मनाचे स्त्रिये, पहिल्यापासूनच माझा प्रेमा तुझ्याविषयीं किती उत्कट आहे हें तूं जाणतच आहेस. "तुजकरितां माझा जीव गेला तरी पुरवला," हे माझ्या तोंडचे शब्दही तूं ऐकिलेच आहेस, आणि मी आतां तुला पुनः सांगतों कीं, सांप्रत तुझी हकीकत व तुझ्या तोंडचे शेवटचे शब्द ऐकून तर तुझ्याठायीं माझी इतकी आसक्ति बसली आहे कीं, तुझ्याप्राप्तीवांचून माझें जिणें व्यर्थ आहे असें मी समजतों! याजकरितां मज हीनभाग्यावर कृपा करून माझ्या जन्माचें सार्थक्य केल्यावांचून तूं राहणार नाहींस अशी मला फार आशा आहे.' या माझ्या बोलण्याचा जबाब त्या स्त्रीनें अनुकूल असा दिला, व मी तिला आलिंगन देऊन त्या सौख्यरूपी अमृताचें प्राशन करणार, इतक्यांत हाय हाय! माझ्या प्रतिकूळ ग्रहामुळें त्या सर्व सौख्याचा विघात होऊन आह्मां उभयतांच्याही प्राणांवर येऊन गुदरली! त्यासमयीं एकदम महालाच्या दारास कोणी

मोठ्यानें थाप मारिली. ती ऐकून आमची काय अवस्था झाली असेल तिचें शब्दांनीं वर्णन करणें कठिण आहे! ती स्त्री हळूच माझ्या कानाशीं लागून ह्मणाली, 'अहो, घात झाला हो घात झाला! तुमचा व माझा उभयतांचाही पुरता घात झाला! दाराशीं खुद्द सुलतानाची स्वारी आली आहे!'

मी ज्या दोराच्या योगानें वरती चढून आलों होतों तो दोर जर माझ्या हातीं लागण्यासारखा असता, तर मी सहज आपली सुटका करून घेतली असती. पण तो दोर ज्या महालाच्या खिडकींतून खालीं सोडला होता, त्याच महालांत सुलतान उभा होता. यास्तव त्या प्रसंगीं मला पलंगाखालीं जाऊन बसण्याखेरीज दुसरा सुरक्षितपणाचा कांहींच उपाय दिसला नाहीं. त्याप्रमाणें मी पलंगाखालीं जाऊन बसलों, आणि दार्दानी ही दार उघडण्याकरितां उठून गेली.

[दिवस सहावा.]

सुलतान हा बरोबर कित्येक खोजे घेऊन आलेला असून त्या खोजांच्या हातांत मशाली होत्या. त्यांसह तो मोठ्या आवेशानें महालांत शिरला. तो अत्यंत क्रोधयुक्त मुद्रेनें व राक्षसासारखा मोठ्यानें ओरडून दार्दानीस ह्मणाला, 'अगे हरामखोर बटकी, कोठचा मनुष्य तूं येथें आणला आहेस? कारण, दोराला धरून खिडकींतून कोणी वर चढून आला असें माझ्या माणसांनीं पाहिलें असून तो दोरही अद्यापि तेथें लोंबत आहे!' हें ऐकून दार्दानीची अगदीं पांचावर धारण बसून गेली, व कांहीं बतावणी करून आपला अपराध छपविणें हें केवळ अशक्य आहे असें पाहून ती अगदीं स्तब्ध राहिली. तिच्या तोंडांतून कांहीं उत्तर येत नाहीं असें पाहून तर सुलतान फारच खवळला, व तिच्या लबाडीविषयीं त्याची पक्की खात्री झाली. मग तो खोजास ह्मणाला, 'सोधा रे चोहोंकडे, कोण बेरड येथें आलेला आहे तो मला पाहूं द्या! असला पाजीपणा करणाऱ्या त्या चाडशी मनुष्याचा मला चांगला समाचार घेतला पाहिजे!' मग काय उशीर? त्या खोजांनीं मला तेव्हांच हुडकून काढिलें. त्यांनीं मला पलंगाखालून ओढीत ओढीतच सुलतानासमोर आणून टाकिलें.

तेव्हां सुलतान ह्मणतो, 'अरे नीचा, काळतोंड्या, तुला माझ्या ह्या वाड्यांत येऊन असें साहस करायाचें धारिष्ट तरी कसें झालें ? माझी भीति तुला मुळींच वाटली नाहीं काय ? तुला झक मारायाची होती तर ह्या केरो शहरांत आणखी दुसऱ्या शेंकडों बटकी नव्हत्या काय ? ह्याच ठिकाणीं कशाला मरायाला आलास ?' या वेळीं माझें देहभान मुळींच जाग्यावर राहिलें नव्हतें. आणि खरोखर, दोस्तसाहेब, घटकाभर समजा कीं, बगदाद येथें महापराक्रमी कालीफ हरून् अल् रशीद याच्या जनानखान्यांत तुह्मांसच असा प्रसंग आला असता तर त्या संकटसमयीं तुह्मांला तरी कांहीं शुद्धबुद्ध राहिली असती का, सांगा बरें ? असो; माझ्या तोंडाबाहेर एक शब्दही निघेना. मी गुडघे टेंकून सुलतानापुढें दीनदासाप्रमाणें अधोमुख उभा राहिलों, व आतां हा आपल्या हातांतील तरवारीनें एका क्षणांत आपलें धड आणि डोकें हीं वेगळीं करणार यांत संशय नाहीं असें मला वाटलें. त्याप्रमाणें करण्याकरितां त्यानें आपली तरवारही उपसली; आणि आतां तो मजवर वार करणार, इतक्यांत असें झालें कीं, एक ह्मातारी स्त्री तेथें आली, आणि त्याचा हात धरून ह्मणाली, 'महाराज, तुह्मी हें काय करतां ? ह्या अत्यंत पातकी व नीच माणसास आपण स्वतः मारून त्याच्या रक्तानें आपले हात विटाळूं नका. कां कीं, तेवढी देखील याची योग्यता नाहीं ! तसेंच ज्या ह्या कृत्येनें आपल्याशीं बेइमानीपणा केला, तिला देखील अशा प्रकारें मारून उपयोग नाहीं; कां कीं, ह्या दोघांचीं मढीं गाडून टाकिलीं तर पृथ्वीला देखील तीं सहन होणार नाहींत ! यासाठीं यांना नदींत लोटून देण्याविषयीं आज्ञा करा, ह्मणजे मासे, सुसरी वगैरे जलचर ह्यांना फाडून खातील, व मग ह्यांचा मागमूसही राहणार नाहीं.' सुलतानास त्या स्त्रीची गोष्ट पसंत पडली, व त्याच्या सांगण्यावरून नदीकांठच्या एका बुरुजावर आह्मांस नेलें, व तेथून खालीं डोह होता त्यांत लोटून दिलें !

---

१. हें अबुल कासीम यांचें कालिफाबरोबर भाषण चाललें आहे हा संबंध वाचणारांनीं ध्यानांत ठेवावा.

येवढ्या मोठ्या उंचीवरून पडल्यामुळें मला मोठा धक्का बसून मी अगदीं निचेष्ट झालों, पण लौकरच थोडा शुद्धीवर येऊन वांचण्याचा यत्न करूं लागलों. मला पोहतां चांगलें येत होतें, यामुळें थोडक्याच वेळांत मी कांठाला येऊन लागलों. याप्रमाणें मी तर वांचलों, पण केवळ मजकरितां जिच्यावर माझ्यासारखाच प्रसंग येऊन गुदरला, तिचें काय झालें असेल हें माझ्या मनांत येऊन, मला स्वतःचा जीव वांचल्याबद्दल यत्किंचित् ही आनंद न होतां तिची आठवण झाल्याबरोबर माझें काळीज चर्र झालें! तेव्हां मी जिवावर उदार होऊन नदींत उडी घातली, आणि ती स्त्री आतांपर्यंत जिवंत राहिलीच नसेल. पण तिचें प्रेत तरी सांपडेल तर पहावें ह्मणून चांदण्याच्या प्रकाशांत पुष्कळ शोध केला. पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं, व पहिल्या व ह्या श्रमांमुळें मी अतिशय दमून गेलों होतों, सबब तिची आशा सोडून मला कांठावर परत येणें भाग पडलें.

दार्दानीच्या मरणाचे विचार माझ्या मनांत येऊन मी स्वतःला पुष्कळ शिव्या शाप घेतले. मी एकसारखा रडत बसलों, व मनांत ह्मणालों, 'मी जर भलताच छंद घेऊन हें कृत्य करण्याच्या भरीस पडलों नसतों, तर ती लावण्याची केवळ खाण अशी दार्दानी यावेळीं जिवंत असून खुशाल आनंदांत नसती काय? केरो येथें येण्याची मला बुद्धि तरी कशाला झाली! मी ज्या कामाला हात घालतों त्या कामांत माझें पाऊल मागें, असा मी दैवाचा भोपळा असें मला माहीत असतां तिच्या प्रेमपाशांत मी कशास पडावयास गेलों! याप्रमाणें त्या बिचाऱ्या स्त्रीच्या मरणास आपण कारण झालों याबद्दल मला पराकाष्ठेचें दुःख होऊन, ज्या ठिकाणीं असा हा दारुण परिणाम झाला त्या केरो शहरांत आतां एक क्षणभरही रहावयाचें नाहीं असा निश्चय करून मीं लागलाच बगदादचा रस्ता धरला.

## अबुल कासीम याची गोष्ट. ( पुढें चालू. )

अबुल कासीम ह्मणतो—नंतर मी बरेच दिवस प्रवास केल्यावर एके दिवशीं संध्याकाळीं एका डोंगराच्या पायथ्याशीं आलों. तेथून

कांहीं अंतरावर एक बरेंच मोठें शहर होतें. डोंगराच्या पायथ्या-जवळून एक छानदार ओढा चालला होता, त्याच्या कांठावर मी विश्रांतीकरितां पडून राहिलों, व ती रात्र तेथेंच घालविण्याचा निश्चय केला. मला लौकरच इतकी गाढ झोंप लागली कीं, तशी बहुत दिवसांत लागली नव्हती. त्या योगानें मला बरीच हुशारी आली. सकाळीं मी उठून जों बसतों तों मला जवळच कोणी कण्हत आहेसें ऐकूं आलें. तें मी लक्षपूर्वक ऐकिलें, त्यावरून कोणा स्त्रीवर मोठा भयंकर प्रसंग गुदरला असून तिचीच ही दीन वाणी आहे असें मीं अनुमान केलें. मग मी लागलाच तेथून उठलों, व जिकडून तो आवाज ऐकूं आला तिकडे चाललों. तों एक मनुष्य कुदळ घेऊन खड्डा खणीत आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. हें पाहून मी पुढें न जातां एका झुडपाच्या आड उभा राहून, पुढें होणारा सर्व प्रकार पहात बसलों. त्या मनुष्यानें खड्डा खणल्यावर त्यांत कांहीं ठेविलें, व वर माती ढकलून जमीन साफ करून तो चालता झाला. या वेळीं सूर्योदय झाला असून जिकडे तिकडे स्वच्छ उजेड पडला होता. मग मी, हें प्रकरण आहे तरी काय याचा शोध करण्याकरितां त्या बुजविलेल्या खड्ड्यापाशीं गेलों. तो खड्डा मीं पुनः उकरला, आणि पहातों तों, एका मोठ्या तागाच्या कापडाच्या पोत्यांत एक तरुण स्त्री, पोत्याचें तोंड गच्च बांधून टाकलेली माझ्या नजरेस पडली. ती रक्तानें अगदीं न्हाली असून केवळ मरायाच्याच पंथांत होती. तिच्या कपड्यांवरून मीं जाणलें कीं, ही एखाद्या थोर घराण्यांतील असावी. असो; त्या स्त्रीची ती दशा पाहून माझ्या अंगावर कांटा उभा राहिला, व मला दुःखाचा मोठा उमाळा येऊन मीं ह्मटलें, 'कोणा चांडाळाचा ह्या बिचारी-वर असा हात वाहला असेल त्या क्रूराचें परमेश्वर पुरतें शासन करो!'

मला वाटलें होतें कीं, ही स्त्री अगदीं बेशुद्ध तर झालीच असावी. पण माझे हे शब्द ऐकून ती हळूच मला ह्मणाली, अरे सद्गृहस्था मज अबलेवर कृपा कर आणि मला सहाय हो. मी तुझी धर्माची बहीण आहे असें समज. तूं अगोदर मला ह्या बंदांतून मोकळी कर, आणि माझा घसा अगदीं कोरडा पडला आहे याकरितां थोडें पाणी

आणून माझ्या तोंडांत घाल.' तेव्हां मी लागलाच ओढ्याकडे गेलों, आणि भांडें वगैरे गांठोड्यांतून काढण्यांत वेळ न घालवितां पागोट्यांतच थोडें पाणी घेऊन आलों, व त्या स्त्रीच्या तें तोंडांत घातलें. तें तिच्या पोटांत गेल्याबरोबर तिनें डोळे उघडले; व मजकडे पाहून ह्मणाली, 'अरे उदार गृहस्था, मी असें समजतें कीं, माझे प्राण वांचविण्याकरितांच ईश्वरानें तुला ह्या समयीं येथें पाठविलें. तर माझ्या अंगांतून जें हें रक्त चाललें आहे तें बंद करण्यास मला मदत कर. मला लागलेल्या ह्या जखमा वर्मी नाहींत, याकरितां मी जगेन अशी आशा मला उत्पन्न झाली आहे. पण यावेळीं तूंच मला जगविलेंस तर मी जगेन; याकरितां त्वरा कर. हें परोपकाराचें कृत्य केल्याबद्दल तुला पुढें आनंद झाल्यावांचून खचीत राहणार नाहीं.

हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून मी लागलाच आपल्या अंगावरचा रुमाल फाडला, आणि त्या चिंध्यांनीं तिच्या जखमा बांधून टाकल्या. तेव्हां ती ह्मणाली, 'दादारे, आतां ह्या सत्कृत्यास तूं आरंभ केलास, त्यासारखें हें तूं शेवटास नेलेंस ह्मणजे फार चांगलें होईल. मला तेवढी शहरांत घेऊन जा ह्मणजे झालें, मग मला कशाचीही काळजी नाहीं.' मीं तिला ह्मटलें, 'बाई, तूं हें ह्मणतेस खरें, पण मीं पडलों परदेशी मुशाफर. शहरांत कोणीही माझ्या ओळखीचें नाहीं. एकाद्यानें जर मला सवाल केला कीं, ही मरणोन्मुख स्त्री तूं कोठून आणलीस, तर मी काय जबाब देऊं?' ती ह्मणाली, 'ही माझी बहीण आहे असें तूं ह्मण ह्मणजे झालें. पुढची काळजी तुला नको.'

त्यावरून त्या स्त्रीस मीं पाठीशीं घेतलें, आणि तिला शहरांत घेऊन गेलों. मीं तिला एका भटारखान्यांत उतरिलें व जलदी करून एक खाट आणविण्याविषयीं मालकास सांगितलें. नंतर त्या खाटेवर मीं तिला निजविलें, व ताबडतोब एका शस्त्रवैद्यास बोलावून आणून तिच्या जखमा त्यास दाखविल्या. त्यानें सांगितलें कीं, 'ह्या कांहीं असाध्य नाहींत; लौकरच बऱ्या होतील.' मग औषधोपचार जारीनें करतां करतां एका महिन्यांत ती स्त्री बरी झाली. तिला जरा बसण्याउठण्याची शक्ति आल्यावर तिनें मजकडून कागद शाई व-

गेरें मागविली, आणि एक पत्र लिहिलें, तें पत्र माझ्या हातीं देऊन तिनें मला सांगितलें कीं, 'येथल्या सदरबाजारांत जाऊन त्या ठिकाणीं मह्मार ह्या नांवाच्या व्यापाऱ्याचा शोध करा आणि तो जें कांहीं तुम्हांपाशीं देईल तें मजकडे घेऊन या.'

याप्रमाणें मी मह्मार याजकडे तें पत्र घेऊन गेलों. त्यानें तें लक्षपूर्वक वाचलें, व मोठ्या अदबीनें त्याचें चुंबन करून तें आपल्या पागोट्यांत ठेवून दिलें. नंतर त्यानें मोहोरांच्या दोन थैल्या काढून त्या माझ्या स्वाधीन केल्या. त्या घेऊन मी त्या स्त्रीकडे परत गेलों, तेव्हां तिनें एक घर भाड्यानें घेण्याविषयीं सांगितलें. त्याप्रमाणें मी एक सोईचें घर ठरविलें, आणि दोघेंही तेथें रहावयास गेलों, त्यानंतर तिनें मह्मार ह्यास माझ्या हातीं दुसरें एक पत्र पाठविलें, व त्यावरून त्यानें मोहोरांच्या आणखी चार थैल्या मजपाशीं दिल्या. त्या मी आणल्यावर त्या स्त्रीच्या सांगण्यावरून आम्हां दोघांकरितां मीं कपडे व कांहीं गुलाम खरेदी केले.

[ दिवस सातवा. ]

अबुल कासीम म्हणतो—मी त्या स्त्रीचा भाऊच आहें असें शेजारीपाजारी लोकांत प्रसिद्ध झालें, व ती जरी तरुण व खुपसुरत होती, तरी माझी खरोखरच तिच्याशीं भावाप्रमाणें वर्तणूक होती. शिवाय, माझें मन सर्वप्रकारें दार्दानीविषयींच्या विचारांत गढून गेलेलें असल्यामुळें, त्या स्त्रीविषयीं दुसरा कांहीं विचार माझ्या मनांत येण्याचें तर राहूंचद्या, पण हिच्या येथून मी कधीं निघून जाईन असें मला होऊन, दोन तीन वेळां मीं जाण्याविषयीं तिजपाशीं गोष्टही काढिली. परंतु ती म्हणाली, 'तुम्ही मला अशी निराश्रित सोडून जाऊं नका. थोडे दिवस कृपा करून दम धरा. मला अद्यापि तुम्हांशीं काम आहे. तेवढें तुम्हीं केलें म्हणजे, तुम्ही आपण होऊन उदारबुद्धीनें माझ्या पतकरलेल्या ऋणांतून मुक्त व्हाल. मी कोण, कोठची, हें थोडें दिवसांनीं तुम्हांस कळेल, व तें कळल्यावर, तुम्हीं मजवर जे उपकार केले ते सत्पात्रीं केले असें तुम्हांस दिसून येईल.

तसेंच मी तुमची उतराई झाल्याखेरीज मला तुह्मांस जाऊं देणेंही योग्य वाटत नाहीं.'

असें अनेक प्रकारें त्या स्त्रीनें मला सांगितल्यावरून मला तेथें राहणें, व केवळ परोपकारार्थ, जें जें ती सांगेल तें तें करणें, भाग पडलें. 'तुला कोणत्या कारणानें व कशा प्रकारें ठार मारण्याचा हा प्रयत्न झाला होता तें सांग,' ह्मणून मीं तिला पुष्कळ वेळां ह्मटलें. पण ती तें सांगेना. तसेंच तिला आपली एकंदर हकीकतही सांगण्याविषयीं मीं अनेक वेळां ह्मटलें, पण तीही तिनें बिलकूल सांगितली नाहीं.

एके दिवशीं तिनें मला एक मोहोरांची थैली देऊन सांगितलें कीं, 'बाजारांत जाऊन नमहरान या नांवाच्या व्यापाऱ्याचें दुकान कोठें आहे त्याचा शोध करा, व त्याच्या दुकानीं जाऊन त्याला सांगा कीं, मला कांहीं उंची कापड घ्यावयाचें आहे. मग तो तुह्मांला पुष्कळ प्रकारचें कापड दाखवील, त्यापैकीं तुह्मांला पसंत पडेल तें घेऊन त्याबद्दल तो जी किंमत मागेल ती त्यास द्या. ही देवघेव चालली असतां तुम्ही त्याच्याशीं मोठ्या अदबीनें व सभ्यतेनें वागून, तुमच्याविषयीं त्याचें उत्तम मत होईल असें करा, आणि नंतर कापड मजकडे घेऊन या.' यावरून मी नमहरान याच्या दुकानाचा शोध केला. तें मला लौकरच सांपडलें. नमहरान दुकानांत बसलेलाच होता. तो तरुण व मोठा देखणा असून त्याची बोलण्याचालण्याची रीत फार लीनपणाची, सभ्य व मोहक होती. त्याच्या कानांत मोठमोठे चौकडे व हातांत मौल्यवान् हिऱ्याच्या आंगठ्या होत्या. मी त्यास सलाम करून त्याच्याजवळ जाऊन बसलों, व 'कांहीं भारी किंमतीचा माल काढा' ह्मणून सांगितलें. त्यावरून त्यानें पुष्कळ जातींचे तागे माझ्यापुढें टाकिले. त्यांपैकीं तीन मीं पसंत करून घेतले, व त्यांची त्यानें जी किंमत सांगितली ती त्यास चुकती करून दिली. नंतर येतांना मोठ्या सभ्यतेनें त्याचा मीं निरोप घेतला, व जो गुलाम मीं बरोबर घेतला होता, त्याजपाशीं तें कापड देऊन आह्मी दोघे घरीं आलों.

नंतर दोन दिवसांनीं त्या स्त्रीनें मला आणखी एक मोहोरांची थैली दिली आणि फिरून पहिल्याप्रमाणेंच कापड आणण्याकरितां नमहरान याच्या दुकानीं पाठविलें. यावेळीं तिनें मला आणखी बजावून सांगितलें कीं, 'तुह्मी याच्याशीं किंमतीविषयीं बिलकूल घासघीस करूं नकाहो ! तो जी किंमत सांगेल ती डोळे मिटून त्याला द्या.' त्याप्रमाणें मी त्याच्या दुकानीं गेलों, व कापड काढण्यास त्यास सांगितलें. तेव्हां नमहरान यानें लागलीच मजपुढें पहिल्यापेक्षांही उंची व दिसण्यांत फारच सुरेख असें कित्येक प्रकारचें कापड मला दाखविलें. त्यापैकीं मला जें उत्तम वाटलें तें मीं घेतलें, आणि मोहोरांचें तोडे त्याजपुढें टाकून, 'यांतून तुमच्या इच्छेस येईल तो दाम घ्या,' असें त्यास म्हटलें पाहून तो फारच खुष झाला, व माझ्याशीं मोठ्या प्रेमानें इकडच्या तिकडच्या गोष्टी कांहीं वेळ बोलून मला ह्मणाला, 'आपल्यास सवड असेल तेव्हां एकादे दिवशीं आपल्या पंक्तीचा लाभ मला देण्याची मेहेरबानी होईल तर मजवर उपकार होतील.' मीं त्यास ह्मटलें, 'मजकडून कांहीं हरकत नाहीं. आपण येवढें अगत्यानें बोलावतां, तर मी नाहीं कशाला ह्मणूं? उद्यां देखील ह्मणाल तर मजकडून हरकत नाहीं.' तेव्हां तो ह्मणाला, 'फार चांगली गोष्ट आहे. उद्यांच मी तयारी करितों.'

नमहरान यानें मला जेवावयास बोलाविलें, इतकी त्याची माझी सलगी पडली हें पाहून माझी बहीण ह्मणविणाऱ्या त्या स्त्रीस पराकाष्ठेचा आनंद झाला. ती ह्मणाली, 'वाहवा ! बहुत खाशी गोष्ट ! उद्यां तुह्मी यांच्या येथें जाच; अनमान करूं नका, व लागलीच परवांचे दिवशीं त्यालाही आपल्या येथें येण्याविषयीं पाचारण करा. तुह्मीं त्याच्या येथें जाणार आहां तेव्हां तोही तुह्मला नकार करणार नाहीं. मेजवानीची सर्व तयारी करण्याचें काम मजकडे लागलें. मात्र त्याला संध्याकाळीं बोलवा, ह्मणजे आपल्याला सावकाशीनें सर्व बेत यथास्थित करतां येईल.' यावेळीं त्या स्त्रीच्या मनास इतका कांहीं आनंद झाला, व त्या योगानें तिचा चेहरा इतका प्रफुल्लित दिसूं लागला कीं, तसा आजपर्यंत मीं तो

कधींच पाहिला नव्हता. हा सर्व प्रकार घडवून आणण्यांत हिचा कांहीं गुप्त हेतु असावा असें मीं ताडलें. पण तो कोणता तो तिनें मला बिलकूल कळूं दिला नाहीं, व माझ्याही तो लक्षांत आला नाहीं.

असो. याप्रमाणें त्या व्यापाऱ्याच्या घरीं दुसरे दिवशीं मी जेवावयास गेलों. त्यानें अत्यंत प्रेमपूर्वक माझें आगतस्वागत केलें, व माझी उत्तमप्रकारें बरदास्त ठेविली. परत येण्याचे वेळेस मीं त्यास आपल्या बिऱ्हाडाची खूण सांगून, 'उद्यां आपणही माझ्या येथें भाजीभाकर खाण्यास सायंकाळीं येण्याची मेहरबानी करा,' असें त्यास ह्मटलें, व त्यानेंही तें तत्काळ मान्य केलें.

याप्रमाणें तो व्यापारी दुसरे दिवशीं नेमलेल्या वेळीं आमच्या बिऱ्हाडीं आला. आह्मी दोघें भोजनास बसलों, व भोजनांत आनंदानें हांसत बोलत पुष्कळ वेळ गेल्यावर मद्य पिण्यास सुरुवात केली. ती स्त्री भोजनास किंवा मद्य पिण्यास आह्मांबरोबर आली नाहीं. इतकेंच नव्हे, तर नमहरान हा घरांत आल्यापासून ती बाहेर दृष्टीसही पडली नाहीं. तिनें मला येवढें मात्र सांगून ठेविलें होतें कीं, 'तुह्मी त्या व्यापाऱ्यास होईल तितकी करमणूक करून पुष्कळ वेळ त्याच्याशीं बोलत रहा, आणि रात्र झाली ह्मणजे, आतां येथेंच निजा, असा त्यास आग्रह करून राहून घ्या.' मग रात्र बरीच झाली तेव्हां त्यानें घरीं जाण्याविषयीं पुष्कळ वेळां मला ह्मटलें; पण मीं त्यास राहण्याविषयीं फारच गळ घातल्यावरून तो राहिला. पुढें मद्याचे आणखी पेल्यांवर पेले झोंकून मजा मारतां मारतां मध्यरात्र झाली. तेव्हां त्या स्त्रीनें पूर्वीं सर्व व्यवस्था मला सांगून ठेविल्याप्रमाणें मी नमहरान यास एका खोलींत घेऊन गेलों, व तेथें पलंग वगैरेंची सर्व तयारी केलेली होती त्यावर त्यास निजावयास सांगितलें, आणि मी आपल्या नेहमींच्या ठिकाणीं निजावयास गेलों. मला झोंप लागते न लागते तों ती स्त्री मजकडे आली, व तिनें मला जागें केलें. तिच्या एका हातांत एक मोठा थोरला कांकडा आणि दुसऱ्या हातांत कट्यार असून तिची मुद्रा एकाद्या खुनी मनुष्याप्रमाणें क्रूर दिसत होती. ती मला ह्मणाली, 'भाईसाहेब, उठा! तुमचा

बडा दोस्त आपल्या कृतकर्माचें फळ भोगून रक्तानें न्हाऊन पडलेला आहे तो पहा!'

हें ऐकून माझ्या पोटांत धस्स झालें, व मी चटकन् उठून आपले कपडे घालून त्या स्त्रीच्या मागोमाग, तो व्यापारी निजला होता त्या खोलींत गेलों. त्या ठिकाणीं तिनें सांगितल्याप्रमाणें तो गतप्राण होऊन पडलेला पाहून मीं त्या स्त्रीस ह्मटलें, 'अगे चांडाळणी! काय हें तूं भयंकर कृत्य केलेंस! आणि ह्या घोर पातकाचा वांटेकरी मला आणखी केलेंस!' ती ह्मणाली, 'याचा सूड उगविण्यास तुमचेकडून मला साहाय्य मिळालें, याबद्दल तुह्माला बिलकुल वाईट वाटूं देऊं नका. तो महादुष्ट अत्यंत विश्वासघातकी मनुष्य होता. त्यानें केवढा अपराध केला होता हें तुह्माला समजलें ह्मणजे, झालें तें ठीक झालें असें तुह्मी ह्मणाल.' असें ह्मणून ती मला घेऊन दिवाणखान्यांत आली, व आपली हकीकत मला सांगूं लागली.

## जिवंत पुरलेल्या राजकन्येची गोष्ट.

ती स्त्री ह्मणाली—येथील राजाची मी कन्या आहें. मी एके दिवशीं शहरच्या हमामखान्यांत चाललें असतां नमहरान हा दुकानांत बसला होता, त्याजकडे माझी नजर गेली. तेव्हां त्याचें तारुण्य व अत्यंत मोहक रूप पाहून मी त्याजवर फिदा झालें, व रात्रंदिवस तो मला डोळ्यांपुढें दिसूं लागला. माझ्या मनांत कोण हें खराब वेड शिरलें आहे हें मी जाणून होतें, व आपल्याकडून वांकडें पाऊल पडल्यास आपली केवढी अपकीर्ति होईल हा विचार मनांत आणून मीं आपलें मन आवरून धरण्यास नाना उपाय केले: पण छी; जों जों मी आपल्या मनाचें आकलन करावयास जाई, तों तों नमहरान हा एकसारखा माझ्या डोळ्यांपुढें दिसूं लागे! शेवटीं त्या निर्दय आषकाचा माझ्या विवेकावर पुरता पगडा बसून मी झुरणीस लागलें, व माझें मन पराकाष्ठेचें अस्थिर होऊन मला कांहीं एक गोड वाटेनासें झालें. असा माझ्या मनाला ताप होतां होतां मी दुखण्यास पडलें. त्याला माझ्या बापाच्या दरबारच्या वैद्यांनीं पुष्कळ उपाय केले, पण त्या बिचाऱ्याच्या उपचारांचा अर्थातच कांहींएक उप-

योग झाला नाहीं. शेवटीं त्या हृद्रोगांत माझा अंतच व्हावयाचा, परंतु माझी दाई जी जन्मापासून माझ्यापाशीं होती, तिला माझी प्रकृति बिघडण्याचें खरें कारण कळून आलें. तिच्या मनांत जो तर्क आला, तो तिनें मला खोदून खोदून विचारतां अगदीं खरा ठरला, व मीं तिला जें काय सांगितलें, त्यावरून नमहरान याजवर मी पराकाष्ठेची लपंट झालें आहे हें तिच्या पूर्णपणें लक्षांत आलें.

नमहरान याच्या प्राप्तीवांचून माझी जगण्याची आशाच नाहीं असें पाहून दाईला माझी करुणा आली, व तिनें मला आपल्याकडून होईल तितकें साहाय्य त्या कामीं करण्याचें वचन दिलें. मग एके दिवशीं तिनें मोठ्या युक्तीनें नमहरान यास स्त्रीचा वेष देऊन रात्रीं माझ्या महालांत आणिलें. त्याला पाहून ज्याप्रमाणें माझा आनंद गगनांत माईना, त्याचप्रमाणें मला पाहून 'आपलें केवढें हें नशीब!' असें त्यालाही वाटलेंसें त्याच्या पराकाष्ठेच्या आनंदी मुद्रेवरून दिसलें. त्याला मी आपल्या महालांत कित्येक दिवस छपवून ठेविलें परंतु ही गोष्ट कदाचित् अशा रीतीनें उघडकीस येईल अशी मला भीति वाटून मीं दाईकडून त्याला पहिल्याप्रमाणेंच युक्तीनें वाड्यांतून काढून त्याच्या घरीं पोहोंचविलें. पुढें तो त्याच वेषानें वारंवार मजकडे येत असे.

(दिवस आठवा.)

ती स्त्री ह्मणते—याप्रमाणें क्रम चालला असतां पुढें माझ्या मनानें एकदा अशी उचल खाल्ली कीं, नमहरान हा जसा आपल्याकडे येतो तसेंच आपणही त्याच्या येथें एकदां जावें व त्यांतच दुसरें असें माझ्या मनांत आलें कीं, त्याला नकळत एकदम रात्रीच्या वेळीं त्याजकडे जाऊन त्याला आश्चर्यचकित करून टाकावें. शिवाय असें केलें असतां, आपली त्याजवर किती प्रीति आहे याजविषयीं त्याची खात्री होईल असें वाटलें. मग संधी साधून एके दिवशीं रात्रीं मी आपल्या वाड्यांतून एका चोरवाटेनें निघून त्याच्या येथें गेलें. त्याचें घर सांपडण्याला मला मुळींच पंचाईत पडली नाहीं. कां कीं, हमामखान्याच्या वाटेनें जातां येतां मीं तें पक्कें लक्षांत ठेविलें होतें. असो; मीं

त्याच्या दरवाज्याला थाप मारिली, तेव्हां एका गुलामानें येऊन तो उघडला, आणि 'तुह्मी कोण?' व 'कशाकरितां आला?' ह्मणून त्यानें मला विचारिलें. मीं उत्तर दिलें, 'मी येथलीच राहणारी एक स्त्री असून तुझ्या धन्यास मला भेटावयाचें आहे, व त्याशीं कांहीं बोलावयाचें आहे.' तो ह्मणाला, 'धनीसाहेब या वेळीं रिकामे नाहींत, दुसऱ्या कोणा स्त्रीशीं ते एकांतांत आहेत. यासाठीं तुह्मी उद्यां याल तर बरें.'

हें त्या गुलामाचें बोलणें ऐकून माझ्या तळव्याची आग मस्तकास गेली. मला वाटत होतें कीं, नमहरान हा मजवर येवढें प्रेम दाखवितो, तेव्हां माझ्याखेरीज दुसऱ्या स्त्रीची याच्या मनांत कल्पना देखील नसेल, पण असा हा असंभाव्य प्रकार मला कळल्यावरून संतापानें माझें देहभान अगदीं नाहींसें झालें, व मी तशीच घरांत घुसलें आणि एकदम दिवाणखान्यांत गेलें. तेथें मोठा चकचकाट केला असून जिकडे तिकडे सर्व ऐषआरामाच्या पदार्थांची लयलूट केलेली दिसत होती. तिकडे माझें फारसें लक्ष गेलें नाहीं, तर एका मोठ्या मेजाशीं दोन खुर्च्यांवर, नमहरान व कोणी तरुण सुंदर स्त्री बसलेली होती तिकडे माझें चटकन् लक्ष गेलें. त्या दोघांपुढें मद्याचे पेले भरलेले असून त्यांचे हास्यविनोद व मधून मधून गाण्याच्या लकेरी चालल्या होत्या. तें पाहून तर माझ्या संतापाची पराकाष्ठा झाली, व मी विजेप्रमाणें त्या स्त्रीच्या अंगावर धांवून गेलें, आणि तिच्यापेक्षां जरी बळानें मी अधिक असेन असें ह्मणतां येत नाहीं, तरी माझ्या अंगांत जणूं काय भूतसंचार झाल्यासारखें होऊन मला एवढा आवेश आला होता कीं, ती जर चटदिशीं तेथून निसटून गेली नसती, तर त्याच वेळेस माझ्या हातून ती यमपुरीला पोहोंचली असती! ती पळून गेली तेव्हां लागलीच मी नमहरान याच्या अंगावर तुटून पडलें.

नमहरान यानें लागलाच माझ्यापुढें साष्टांग नमस्कार घातला, माझ्या पायाचें चुंबन केलें, व 'मला एक वेळ क्षमा करा, इतःपर माझ्या हातून असें दग्याचें कृत्य कदापि होणार नाहीं,' अशी शपथ वाहिली. इतकें त्यानें केलें तेव्हां माझा राग शांत झाला, व त्याच्या

विनवणीवरून मी त्याजबरोबर मेजाशीं बसलें, व आम्हीं दोघांनीं थोडा फराळ केला. पुढें मद्यास सुरुवात झाली. तें नमहरान यानें मला आग्रह करून इतकें पाजलें कीं, मी गुंग होऊन बेशुद्ध होऊन पडलें. अशी माझी स्थिति झालेली पाहून नमहरान यास माझा सूड घेण्यास फावलें. त्या हरामखोरानें चाकूनें माझें आंग इतकें भोसकलें कीं, रक्तानें माझे सर्व कपडे थबथबले, व मी तिरीम येऊन धाड-दिशीं जमिनीवर पडलें. तेव्हां त्याला माझा जीव गेला असें वाटून त्यानें लागलीच मला तागाच्या एका मोठ्या थैल्यांत बांधून, ज्या खड्ड्यांतून तुह्मीं मला काढलें, त्यांत नेऊन पुरलें. तो खड्डा खणीत असतां मी अंमळ शुद्धीवर आलें, व विवळत विवळत, 'हें माझें काय करतोस?' ह्मणून बोललें, पण त्या मांगास माझी दया आली नाहीं; इतकेंच नव्हे, तर मला खड्ड्यांत पुरण्यापूर्वीं पुरती मारून तरी टाकावयाची तसें न करितां त्यानें मला जिवंत पुरून टाकिलें, हें तुह्मींच प्रत्यक्ष पाहिलें.

आतां मह्वार ह्या नांवाचा जो व्यापारी,—ह्मणजे ज्याकडे तुह्मीं माझीं पत्रें नेलीं व ज्यानें तुह्मांस मोहोराचे तोडे दिले,—तो कोण होता ह्मणाल तर ऐका. त्याच्याकडे आमच्या जनानखान्यास सामान पुरविण्याचें काम असून तो मोठा सचोटीचा व विश्वासू माणूस आहे. मजवर आलेलें संकट व त्यांतून मी कशी निभावलें ही हकीकत मीं त्याला कळविली, व 'त्या दुष्ट नमहरानचा सूड उगवीपर्यंत ही गोष्ट कानाच्या कोपऱ्यास कळूं देऊं नका' अशी त्यास विनंति करून, 'त्याच कामाकरितां मला पैसे पाहिजेत' ह्मणून त्यास लिहिल्यावरून तो मला पैसे पाठवीत गेला. हीच सारी माझी हकी-कत. ही मीं तुह्मांस यापूर्वीं कळविली नाहीं याचें कारण, या कामीं तुह्मी मला साहाय्य करणार नाहीं असें मला वाटलें हें होय. आतां मीं जें हें धाडसाचें कृत्य केलें, त्यासंबंधानें मला वाटतें कीं तुह्मीं माझी सर्व हकीकत ऐकिलीच आहे तिचा विचार करून, मीं केलें तें ठीक केलें असें तुह्मी ह्मटल्यावांचून राहणार नाहीं; इतकेंच नव्हे, तर विश्वासघातकी मनुष्याविषयीं तुह्मांला जर तिटकारा असेल, तर

माझ्या या कृत्याबद्दल तुह्मीं मला शाबासकी द्यावी असेंही मी ह्मणतें. आतां उजाडलें ह्मणजे आपण दोघें राजवाड्यांत जाऊं. माझा बाप मला जीव कीं प्राण करितो. मी त्याजपाशीं कांहीं न चोरतां आपला सर्व अपराध कबूल करीन, व झाल्या गोष्टीबद्दल त्याची क्षमा मागेन. ती तो करील अशी माझी खात्री आहे. आणि तुह्मी एवढी मेहनत करून मला जीवदान दिलें व इतकें माझ्या उपयोगीं पडलां, हे तुमचे उपकार तो पूर्णपणें फेडील.

मीं राजकन्येला ह्मटलें, (कारण कीं ही राजकन्या आहे हें मला प्रथम याच वेळीं समजलें,) 'बाईसाहेब, तुमचा जीव मीं वांचविला याबद्दल मला कांहीं बक्षिसाची जरूर नाहीं. परमेश्वर साक्ष आहे, तें कृत्य केल्याचा मला फार आनंद वाटतो. पण तुह्मीं जो त्या मनुष्याचा सूड घेतला त्यास मी साहाय्यभूत झालों याबद्दल तितकेंच मला वाईट वाटतें, नमहरान याचा विश्वासघात करून त्याला येथें आणण्याच्या कामांत तुह्मीं मला पाडलें, हें खरोखर, मीं भोळेपणानें तुमच्यावर विश्वास ठेविला याचें तुह्मीं चांगलें चीज केलें नाहीं. तुह्मी त्याचा जीव न घेतां, तुह्मांशीं त्यानें बेइमान केलें त्याबद्दल त्याचा अन्य रीतीनें सूड उगविण्याच्या कामीं जर माझा उपयोग केला असता, तर फार चांगलें झालें असतें. तुमच्याकरितां मी आपला जीवही खुषीनें खर्ची घालण्यास तयार झालों असतों.' सारांश, दोस्तसाहेब, नमहरान याचा जरी अपराध कमी नव्हता, तरी त्याच्या मरणास आपण परंपरेनें कारणीभूत झालों याविषयीं मला पराकाष्ठेचें वाईट वाटलें व त्या स्त्रीनें जरी मला, 'मी आपल्या बापाकडून तुला अमुक देईन, तमुक देईन,' ह्मणून पुष्कळ आशा दाखवून तेथें राहण्याविषयीं मोह पाडण्याचा यत्न केला, तरी त्या सर्वांस लाथ मारून मीं त्याच वेळीं तिचें घर सोडिलें, व आपलें बिऱ्हाडबाजलें घेऊन निघालों. त्या वेळीं रात्र होती सबब उजाडेपर्यंत मी शहराबाहेरच राहिलों, व दिवस उगवल्यावर वाटेला लागलों तों नजीकच एक व्यापाऱ्यांचा काफला उतरला होता तो माझ्या दृष्टीस पडला. ते व्यापारी बगदादेस जात आहेत असें मला चौकशीअंतीं कळल्यावरून,

आयतीच चांगली सोबत मिळाल्याचा मला आनंद झाला व त्यांज-बरोबर मी बगदादेस जावयास निघालों.

## अबुल कासीम याची गोष्ट. ( पुढें चालू. )

अबुल कासीम ह्मणतो—नंतर मी त्या व्यापाऱ्यांच्या सोबतीनें बगदादेस सुखरूप येऊन पोहोंचलों. पण त्या वेळीं माझ्या जवळचा पैसा सर्व खलास होऊन मी पराकाष्ठेच्या अडचणींत पडलों, नाहीं ह्मणायला मजजवळ एक मोहोर कायती राहिली होती. तीवर किती दिवस जाणार, असें समजून मीं तेवढ्यांतच कांहीं धंदा काढून पोटाला मिळविण्याची युक्ति योजिली. ती मोहोर मोडून मीं थोडी फळफळावळ, मिठाई व अत्तराच्या काड्या घेतल्या, व मोठमोठाल्या लोकांच्या मद्य व सरबतें पिण्याच्या ज्या जागा होत्या त्या ठिकाणीं जाऊं लागलों. तेथें हा माझा छोटेखानी माल बराच खपूं लागला; व अशा रीतीनें माझा चरितार्थ "कुच रोटी, कुच लंगोटी" अशा बेतानें चालला.

एके दिवशीं मी वर सांगितल्यापैकीं एके ठिकाणीं आपल्या जिनसा विकण्याकरितां गेलों असतां तेथें जी मंडळी बसली होती त्यांपैकीं प्रत्येकापुढें जाऊन, 'तुह्मांला अमुक पाहिजे का? तुह्मांला तमुक पाहिजे का?' असें विचारूं लागलों. तेथें कोंपऱ्यांत एकीकडे एक ह्मातारा मनुष्य बसलेला होता, त्याकडे माझें लक्ष न गेल्या-मुळें, मीं त्यास इतर लोकांप्रमाणें, 'तुह्मांला कांहीं पाहिजे काय?' ह्मणून विचारिलें नाहीं. त्यावरून त्यानें मुद्दाम मला हांक मारिली, आणि ह्मटलें, 'काय हो शेट, तुह्मीं इतर लोकांपुढें जसे आपले जिन्नस नेऊन, तुह्मांला कांहीं घ्यायचें काय? असें विचारलें, तसें तुह्मीं मजकडे येऊन मला कांहो नाहीं विचारिलें? मी आपला कोणी जुन्या तऱ्हेचा गांठीचा पैसा न सोडणारा, असा असेन, अथवा मजपाशीं पैसाच मुळीं नसेल, असें तुह्मांला वाटलें कीं काय?' मीं उत्तर केलें, 'हजरत, माफी करा. तशी गोष्ट बिलकूल नाहीं. खरोखर मीं तुह्मांस पाहिलेंच नाहीं, यामुळें माझ्या हातून अशी चूक झाली. वा! हें सर्व तुमचेंच आहे. तुह्मांला वाटेल तें यांतलें घ्या. मी तुह्मा-

पाशीं कांहीं मागत नाहीं, मग तर हा तुमचा झालेला गैरसमज दूर होईल ना?' असें ह्मणून मीं आपला सर्व माल त्याजपुढें ठेविला. त्यानें त्यांतून एक सिताफळ घेतलें, आणि मला आपल्या शेजारीं बसावयास सांगितलें. मी बसल्यावर त्यानें मला, 'तुह्मी कोण? कोठले?' वगैरे प्रश्न केले. मीं दुःखाचा सुस्कारा टाकून ह्मटलें, "महाराज, येवढें मला कृपा करून विचारूं नका. तें जर मी तुह्मांला सांगूं लागलों, तर ज्या दुःखातून मी नुकताच होरपळून निघालों आहें, व ज्याचा मला आतां थोडथोडा विसर पडत चालला आहे, तें दुप्पट होऊन माझ्या मनाला व्यर्थ शीण मात्र अतिशय होईल.' हा माझ्या बोलण्याचा रोंख, व मी बोलत असतां माझी जी चर्या त्याला दिसूं लागली ती पाहून त्यानें मला त्यासंबंधानें विचारण्याचें सोडून दिलें, व दुसऱ्याच गोष्टी काढिल्या. मग आमचें पुष्कळ वेळ इकडच्या तिकडच्या गोष्टीविषयीं संभाषण झाल्यावर आह्मी दोघे जेव्हां आपापल्या रस्त्यानें जावयास निघालों, तेव्हां त्यानें आपल्या खिशांतून दहा मोहरा काढून माझ्या हातावर ठेविल्या.

हें त्या ह्मातार्‍या मनुष्याचें औदार्य पाहून मला खरोखर मोठें आश्चर्य वाटलें. कारण त्या ठिकाणीं येणाऱ्या मोठमोठ्या लोकांनीं माझ्या जिनसांवर फार खुष होऊनही मला याचा दशांश देखील दिला नव्हता. असें असतां यानें मला येवढें दिलें, तेव्हां याची थोरवी किती तरी वर्णावी! असें मला वाटूं लागलें. नंतर दुसऱ्या दिवशीं त्याच ठिकाणीं मी गेलों असतां तो ह्मातारा मनुष्य तेथें फिरून मला आढळला. तेव्हां मी अर्थातच प्रथमदर्शनीं त्याजकडे गेलों. त्यानें मजपासून एक अत्तराची काडी घेतली. नंतर मला आपल्या जवळ बसवून घेऊन त्यानें मला आपली हकीकत सांगण्याविषयीं इतकी गळ घातली कीं, मला त्यास नाहीं ह्मणवेना.

मी त्याला आपल्या जन्मापासून हा वेळपर्यंत झालेला सर्व वृत्तांत इत्थंभूत सांगितला. तो त्यानें लक्षपूर्वक ऐकिल्यावर तो मला ह्मणाला, 'अरे बाबा, तुझें सर्व चरित्र मीं ऐकिलें, त्यावरून तुझ्या गुणांची मीं परीक्षा केली, व माझ्या मनांत काय आहे तें आतां तुला

सांगतों. मी बसरा शहरचा राहणारा असून तुझ्या बापाचा व माझा चांगला ऋणानुबंध होता. माझा व्यापारधंदा फार मोठा आहे व त्याच संबंधानें कांहीं कामाकरितां मी येथें आलों आहें. मला मूलबाळ कांहीं नाहीं, व पुढेंही होण्याची आशा नाहीं. कालपासूनच तुजवर माझी ममता बसली, व आजच्या तुझ्या निष्कपट भाषणानें ती दृढ होऊन गेली. यास्तव मीं तुला दत्तक घेण्याचा विचार केला आहे. तर, मुला, तुझ्या दुर्दैवामुळें तुला आजपर्यंत जें दुःख भोगावें लागलें तें तूं आतां विसरून जा, व इतःपर आपल्यास कोणत्याच गोष्टीचा उणेपणा नाहीं असें समज. तुझा बाप अबदुल अजीज हा मोठा श्रीमंत होता, हें खरें, तथापि त्याच्याहीपेक्षां मजपाशीं संपत्ति अधिक आहे; व तो तुझा प्रत्यक्ष बापच, तेव्हां ममतेच्या संबंधानें त्याची गोष्ट वेगळी असें जरी लोकरीतीस्तव ह्मटलें पाहिजे, तरी मी तुला खचीत सांगतों कीं, त्याच्याप्रमाणेंच—किंबहुना त्याच्या-पेक्षांही अधिक—ममता मी तुजवर करीन.

हें त्या थोर व उदार मनाच्या मनुष्याचें भाषण ऐकून मीं त्याचे किती आभार मानले असतील हें सांगण्याची गरजच नाहीं, नंतर तो जाऊं लागला तेव्हां लागलीच ती माझ्याजवळची मालाची करंडी तेथेंच टाकावयास त्यानें मला सांगितलें, व आपल्याबरोबर मला बिऱ्हाडीं घेऊन गेला. त्यानें मला एक स्वतंत्र खोली नेमून दिली, व माझ्या शुश्रूषेस चाकरमाणसेंही निराळींच देऊन, मजकरितां ताबड-तोंब उंची कपडे वगैरे सामान विकत आणविलें. याप्रमाणें मी त्या भिकार स्थितींतून निघून एकाएकीं, ह्या सुस्थितीस येऊन पोहोंचल्या-मुळें, मला जणूं काय, आपला बाप जिवंत असून आपण घरांत जसे सुखानें दिवस घालवीत होतों तसेंच हल्लीं घालवीत आहों असें वाटूं लागलें, व मला जीं आजपर्यंत दुःखें भोगावीं लागलीं त्यांचा अगदीं विसर पडून गेला.

नंतर त्या ह्मातान्या व्यापाऱ्याचें बगदादेस जें काय काम होतें तें उरकल्यावर आह्मी दोघे बसऱ्यास जावयास निघालों. तेथें माझे स्नेहीसोबती जे होते, त्यांना मी पुनः दृष्टीस पडेन असें मुळींच वा-

टत नव्हतें; परंतु मी एकाएकीं जेव्हां तेथें गेलों, व सर्व शहरांत ज्याच्या संपत्तीचा लौकिक गाजत होता अशा मोठ्या व्यापाऱ्यानें मला दत्तक घेतल्याचें जेव्हां त्यांना समजलें, तेव्हां ते अगदीं आश्चर्यचकित होऊन गेले. असो. मी त्या वृद्ध मनुष्यापाशीं अशा रीतीनें वागत गेलों कीं, त्या योगानें त्याची मजवर पराकाष्ठेची मर्जी बसून गेली. तो मला वारंवार ह्मणे कीं, 'अबुल कासीम, माझा हा सर्व पसारा संभाळण्यास तूं या वेळीं मला भेटलास याचा मला मोठा आनंद वाटत आहे; व तुझी उत्तम प्रकारची वागणूक पाहून, मीं तुजकरितां जें काय केलें त्यास तूं पूर्णपणें पात्र आहेस अशी माझी पूर्ण खात्री होऊन गेली आहे.' त्याचें मजवर अकृत्रिम प्रेम पाहून, तो मला केवळ आपला बापच वाटूं लागला. मी त्याला जेणेंकरून संतोष होईल अशा रीतीनें सदोदित वागत असें, इतकेंच नव्हे, तर व्यापारधंदा उरकल्यावर जो वेळ सांपडे, तो समवयस्क मंडळींत गप्पा गोष्टी सांगण्यामध्यें न घालवितां त्याच्या जवळच बसून त्याला व आपल्याला करमणूक करीत असें.

[ दिवस नववा. ]

पुढें थोडक्याच दिवसांनीं तो ह्मातारा मनुष्य अतिशय आजारी पडला. तो इतका कीं, त्याला जगण्याची आशा राहिली नाहीं. तेव्हां एके दिवशीं त्यानें आपल्या खोलींतून मजखेरीज बाकीच्या सर्व माणसांस बाहेर जावयास सांगून मजपाशीं याप्रमाणें भाषण केलें. तो ह्मणाला—मुला, आजपर्यंत मीं आपल्या स्वतःच्या व घराच्या संबंधानें ज्या कांहीं गोष्टी तुला सांगितल्या, त्यांखेरीज अत्यंत महत्वाची व गुप्त अशी एक गोष्ट तुला सांगावयाची आहे. हें पहा, मी आपलें हें घरदार व जी काय संपत्ति आजपर्यंत मिळविली ती सर्व अर्थात् तुझ्या स्वाधीन करणार आहे, किंवा केलीच आहे असें ह्मण. ती ह्मणजे कांहीं थोडीथोडकी आहे असें जरी तुला वाटणार नाहीं, तरी याच घरामध्यें भुयारांत जें मोठें संपत्तीचें भांडार असलेलें मी तुझ्या ताब्यांत देणार आहे, त्याच्या पासंगास देखील ती पुरावयाची नाहीं. ती कोणी कशा रीतीनें येथें आणून ठेविली याबद्दल मला

वास्तविक कांहींएक माहिती नाहीं. मला येवढेंच माहीत आहे कीं, माझ्या आज्यानें मरणसमयीं माझ्या बापाचे स्वाधीन ती केली; त्याचप्रमाणें माझ्या बापानें अंतकाळीं ती माझ्या हवालीं केली; आणि आतां तूं माझाच मुलगा झालास, यास्तव माझ्या वाडवडिलांप्रमाणें माझें जें कर्तव्यकर्म तें स्मरून, तें अपार द्रव्य मी तुझ्या ताब्यांत देणार. पण मुला, या संबंधानें तुला एक मी हिताची गोष्ट सांगून ठेवितों. ती तूं रात्रंदिवस लक्षांत ठेवून त्याप्रमाणें आपला वर्तनक्रम ठेव. तूं फार दयाळू व उदार मनाचा आहेस हें मला कळून आलें आहे. तेव्हां केवळ कुबेरासारखी तुझी स्थिति झाल्यावर लोकांची इच्छा तृप्त करून आपल्या अंतःकरणाचें समाधान करून घ्यावें असें तुझ्या मनांत साहजिकच येऊन, तूं आपला पैसा पाण्यासारखा उधळूं लागशील. तुजकडे जे कोणी गरीब लोक येतील त्यांचा तूं चांगला परामर्ष घेऊन त्यांना सुखी करशील, व तुजकडे जे कोणी मोठ्या योग्यतेचे लोक पाहुणचाराला येतील त्यांची तूं मोठी बडेजाव करून त्यांना नजराण्यांची रेलचेल करून अगदीं आश्चर्यचकित करून टाकशील. आतां ज्यांना परमेश्वरानें अपार संपत्ति दिली आहे, त्यांचें असें वर्तन असणें कांहीं गैर नाहीं असें जरी मी ह्मणतों, तरी तूं आपलें वर्तन जर अशा प्रकारचें ठेवलेंस तर त्यापासून तुला एकादे दिवशीं अपाय घडेल. तो अपाय ह्मणजे तुझ्या जवळचें द्रव्य संपून जाऊन तुझें एकदम दिवाळें निघेल व तूं पराकाष्ठेच्या विपत्तींत पडशील, असें तुझ्या मनांत आलें असल्यास त्याची भीति तुला नको. तें द्रव्य संपून जाण्याची भीति मुळींच नाहीं. भीति एवढीच कीं, तुझ्या घरचा थाटमाट व तुझें अनुपम औदार्य यांची चोहोंकडे प्रसिद्धि झाली ह्मणजे येथल्या राजाच्या लक्षांत ती गोष्ट येईल, व तो आणि त्याचे मंत्री तुझा हेवा करूं लागतील. तुझ्यापाशीं कोठें तरी गुप्त भांडार आहे असा स्वाभाविकच त्यांस अंदेशा येईल, व ते हरप्रयत्नानें त्याचा शोध लावून तुजपासून तें हिसकावून घेतील. तर असा प्रसंग न यावा ह्मणून मी तुला सांगतों कीं, तूं आपल्या वागणुकीसंबंधानें माझा कित्ता

गिरवीत जा. मी कशा रीतीनें वागत आलों ह्मणशील तर, माझा बाप व आजा हे ज्याप्रमाणें व्यापारधंदा करून फार डामडौल न दाखवितां बेतानें रहात असत, तसाच मीही रहात आलों आहें. लोकांची नजर ज्याच्या योगानें चक्क होऊन आपल्याविषयीं त्यांच्या मनांत मत्सर उत्पन्न होईल, असें कोणतेंही कृत्य मीं साऱ्या जन्मांत केलें नाहीं.

मीं त्या विचारी व वृद्ध मनुष्यास सांगितलें कीं, 'तुह्मीं सांगितल्याप्रमाणें सर्व गोष्टी ध्यानांत ठेवून तुमच्याप्रमाणेंच अगदीं बेताबातानें मी वागेन.' नंतर त्यानें, ज्या ठिकाणीं तें द्रव्याचें भांडार होतें ती जागा मला दाखवून दिली, आणि ह्मणाला; 'या ठिकाणीं केवढी अपार संपत्ति असावी याची तुझ्या मनांत कल्पना येते काय?' मला त्या वेळीं, मी मनुष्यलोकीं आहें कीं स्वर्गलोकीं आहें याचें देखील भान न राहून, चित्रासारखा मी कांहीं वेळ तटस्थ राहिलों. नंतर मीं त्यास ह्मटलें, 'मला या द्रव्याची कांहींच कल्पना करतां येत नाहीं.' असो. पुढें तो ह्मातारा गृहस्थ लवकरच मरण पावला. त्याचे अंत्य संस्कार केल्यानंतर त्याच्या सर्व मालमत्तेची मी व्यवस्था पाहूं लागलों असतां एके दिवशीं मी त्या द्रव्याच्या भांडाराकडे गेलों त्या वेळीं मीं तें सर्व सावकाशपणें पाहिलें. तेव्हां मला निदान इतकें वाटूं लागलें कीं, यांतील द्रव्य कितीही खर्च केलें तरी संपणार नाहीं असें जरी नाहीं ह्मटलें, तरी मनुष्याची आयुर्मर्यादा परमेश्वरानें जी ठरवून दिली आहे त्यापेक्षां दसपट जरी माझें आयुष्य वाढलें, तरी माझ्या हयातींत तें संपण्याची भीति बाळगण्याचें मला बिलकूल कारण नाहीं. त्या वेळेपासून त्या ह्माताऱ्या मनुष्यानें सांगितल्याप्रमाणें वागण्याविषयीं जरी मीं आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न केला, तरी त्याप्रमाणें माझ्या हातून कधींही घडत नाहीं. जे कोणी दीन, अनाथ आहेत, त्यांना माझ्या घरीं हवा तो व हवा तेव्हां मुक्तद्वार आश्रय आहे. कारण मी असें ह्मणतों कीं, जो कोणी आपल्या संपत्तीचा योग्य उपयोग करीत नाहीं, त्याला ती असून नसून सारखीच होय. तो योग्य उपयोग ह्मणजे मी असा समजतों कीं,

गरीबगुरिबांवर दया करून त्यांची गरज भागविणें, आल्यागेल्याचा चांगला सत्कार करणें, व स्वतःला सुखोपभोग घेणें, याहून दुसरें कांहीं नाहीं.

माझा असा हा क्रम सुरू झाला तेव्हां लोकांस असें वाटूं लागलें कीं, हा लौकरच अशा उधळेपणानें आपलें दिवाळें काढून धुळीचे दिवे खात मुलखावर जाणार. ते ह्मणाले, 'हा अबुल कासीम केवळ उरफाट्या काळजाचा मनुष्य आहे ! असा मनुष्य आपल्या अविचारानें कुबेराला सुद्धां भिक मागावयास लावील.' पण लौकरच त्याची ही भ्रांति दूर झाली. कां कीं, याप्रमाणेंच नित्य माझा वर्तनक्रम चालून दिवसेंदिवस माझी आपली भरभराटच होत असलेली त्यांच्या दृष्टीस पडली ! तेव्हां त्यांना मोठें कोडें पडलें कीं, अशा रीतीनें याचा पैसा एकसारखा जात असतां याला कांहींच कमी पडत नाहीं हें व्हावें तरी कसें !

मी आतां सांगितल्याप्रमाणें गरिबापासून श्रीमंतापर्यंत सर्वांस अगदीं खुष ठेवीत गेलों, तरी शेवटीं त्या वृद्ध मनुष्यानें भाकीत केल्याप्रमाणें लोक माझा पराकाष्ठेचा हेवा करूं लागले. मला द्रव्याची खाण सांपडली आहे अशी बातमी चोहोंकडे पसरली, व पुष्कळ लोभी लोक त्याच्या आशेनें माझ्या घरीं रात्रंदिवस ठाणें देऊन राहिले. फार काय सांगूं ? जे जन्मांत कधीं कोणाच्या घरीं जावयाचे नाहींत, असेही लोक माझ्या घरीं येऊं लागले ! जसा कांहीं मनुष्याला द्रव्याचा लोभ अनिवार आहे. याचें एक उदाहरण तुह्मांला सांगतों. एके दिवशीं येथील मुख्य कोतवाल एकाएकीं मजकडे आला, आणि मला ह्मणाला कीं, 'तुमचा येवढा डामडौल व खर्च ज्यावर चालला आहे तें तुमचें अपार संपत्तीचें भांडार कोठें आहे तें सांगा.' हें ऐकून मी अगदीं गोंधळून गेलों, व त्यास काय उत्तर द्यावें हें मला सुचेना. तेव्हां माझ्या मुद्रेवरून त्यानें सहजच ताडलें कीं, शहरांत याच्या संपत्तीविषयीं जी वार्ता आहे तिला कांहीं तरी आधार आहे. असो. पण संपत्ति कोठें आहे ती दाखविण्याविषयीं त्यानें मला धाक घालून न नाडतां ह्मटलें, 'शेटजी, मला जरी आपल्या अधि-

काराच्या जोरावर तुह्मांस वाटेल तशी तंबी देऊन तुमच्या संपत्तीच्या गुप्त ठिकाणाचा शोध लावणें मुळींच कठिण नाहीं, तरी मी असा अविचार कदापि करणार नाहीं. तुह्मी मला माझ्या योग्यतेप्रमाणें समजून उमजून कांहीं नजराणा द्या ह्मणजे झालें, मग तुह्मांस मजकडून कधींही तोषीस पोहोंचणार नाहीं.' मी ह्मणालों, 'ती गोष्ट मला पतकरली. मीं तुह्मांस काय दिलें असतां तुमचा संतोष आहे तेवढें मला सांगा मात्र;—तें एका क्षणाचाही विलंब न लागतां तुमच्या सेवेस हजर आहे असें समजा.' त्यानें उत्तर केलें, तुह्मी मला दररोज दहा मोहोरा देत गेलां ह्मणजे पुरे.' मीं ह्मटलें, 'ही तर अगदीं क्षुल्लक बाब आहे, व तुमच्या योग्यतेला हें अगदींच थोडें आहे! मी तुह्मांस रोज शंभर मोहोरा देईन. तुह्मी दररोज येथें येऊन त्या मुकाट्यानें घेऊन जात जा; अथवा पाहिजे असल्यास दर महिन्याच्या पहिले तारखेस एकदमच तुमच्यापुढें तोडे मोजले जातील.' हें ऐकून कोतवालास मोठा आनंद झाला. तो ह्मणाला, शेटजी, तुह्मांला जें काय भांडार सांपडलें आहे तशीं आणखी हजारों सांपडावीं अशी मी मनापासून इच्छा करतों! शेटजी, तुमची सर्व संपत्ति तुह्मांस लखलाभ होवो!' नंतर त्याच वेळीं मीं त्याला बरीच मोठी रक्कम आणून दिली, व तो खुष होऊन निघून गेला.

नंतर थोडक्याच दिवसांनीं येथल्या सुलतानाचा वजीर अबुल फत्ता यानें मला बोलावणें पाठविलें. त्यावरून मी त्याच्या घरीं गेलों. त्यानें मला एकांतीं नेऊन ह्मटलें, 'कायहो शेटसाहेब, तुह्मांला संपत्तीचें मोठें भांडार सांपडलें आहे अशी मला बातमी कळली आहे, तर तुह्मांला माहितच आहे कीं, शिरस्त्याप्रमाणें त्यांतला पांचवा हिस्सा राजाचा आहे. तो तुह्मीं दरबारांत ताबडतोब आदा केला पाहिजे. तो तुह्मीं दिला ह्मणजे बाकीच्या चार भागांचा तुह्मी खुशाल उपभोग घ्या. त्या संबंधानें मग तुह्मांला कोणाचा उपद्रव होण्याची भीति बाळगावयास नको.' मीं त्यास ह्मटलें, 'महाराज, मला भांडार सांपडलें आहे ही गोष्ट मी नाकबूल करीत नाहीं. परंतु ज्या अल्लानें तुह्मांला, मला व सर्व जगाला उत्पन्न केलें, त्याची शपथ वाहून मी तुह्मांला सां-

गतों, कीं, माझें तुह्मीं वाटेल तें जरी केलें,-माझे पराकाष्ठेचे हाल करून माझ्या अंगाचे राईयेवढे तुकडे केले,- तरी मी त्या संपत्तीची मोजदाद कोणास देणार नाहीं, व ती कोणास दाखविणार नाहीं, परंतु तुह्मी जर मला कोणत्याही प्रकारची तसदी न देण्याचें वचन द्याल, तर मी तुह्मांला दररोज एक हजार मोहोरा देण्याचा पतकर घेतों.' तें ऐकून कोतवालाप्रमाणेंच अबुल फत्ता वजीर हाही खुष झाला, व त्यानें एक आपला विश्वासू नोकर पाठविला त्याजबरोबर मीं त्याजकडे एक महिन्याचा अगाऊ हप्ता पाठवून दिला.

परंतु ही गोष्ट कदाचित् सुलतानास कळल्यास आपण त्याच्याशीं प्रतारणा केल्याबद्दल त्याची आपल्यावर गैरमर्जी होईल असें वजिराच्या मनांत आलें, सबब आपणच प्रथम सुलतानापाशीं ही गोष्ट बोलावी हें बरें असें जाणून त्यानें संधी साधून एकांतीं सुलतानाच्या कानावर सर्व वर्तमान घातलें. त्यानें ही गोष्ट फार महत्त्वाची व चौकशी करण्यासारखी आहे असें समजून मला हुजूर बोलावणें पाठविलें. मी गेल्यावर त्यानें प्रसन्न मुद्रेनें मजकडे पाहून मला मोठा मान दिला, आणि म्हणाला, 'काय शेट, तुमचें द्रव्याचें भांडार तुह्मी कोणाला दाखवीत नाहीं असें मीं ऐकिलें, पण मला तें तुह्मी दाखविण्यास अनमान खचित करणार नाहीं असें मी समजतों, कां कीं, मला तुमच्या एका छदामालाही शिवावयाचें नाहीं हें तुह्मी पक्कें समजा.' मीं अत्यंत नम्रतेनें उत्तर केलें, 'सरकार, परमेश्वरकृपेनें आपण चिरायु व्हावें, व आपली नियत सदोदित अशीच राहून आपली सर्वकाळ भरभराट व्हावी अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे. पण महाराज, बोलतों याबद्दल बेअदबीची माफी असावी. रक्ताप्रमाणें लाल झालेल्या सांडसानें माझें आंग टोंचून त्यांतलें मांस बाहेर काढण्याविषयीं जरी आपण हुकूम केला, तरी मी आपलें द्रव्याचें भांडार आपणांस दाखवावयाचा नाहीं! महाराज, आपणांला मी दररोज मोहोरांचे दोन तोडे नजर करण्याचें कबूल करतों, येवढ्यांत आपण संतुष्ट राहून या दासावर मेहेर नजर ठेवावी असें मी इच्छितों. पण इतक्याही उपर आपणांला अधिकाची इच्छा होऊन आपण माझें पा-

रिपत्य करूं लागाल तर आपण समर्थच आहां. आपल्या इच्छेआड येण्याची मज गरिबाची काय प्राज्ञा आहे? जी शिक्षा करण्याचा आपला हुकूम होईल ती भोगण्यास हा मी याचक्षणीं तयार आहें!'

याप्रमाणें मी बोलल्यावर सुलतान वजिराकडे वळला, व 'तुमचा याबद्दल काय सल्ला आहे?' असें त्यानें त्यास विचारिलें. वजीर ह्मणतो, 'महाराज, हा जो नजराणा आपणांस देतों ह्मणत आहे तो कांहीं थोडा थोडका आहे असें मुळींच ह्मणतां येणार नाहीं. तो एवढा मोठा आहे कीं, थोडे दिवसांत त्याकरितां निराळा जामदारखानाच करावा लागेल! तर मला वाटतें, याला आपण खुशाल रजा द्यावी. मात्र यानें बोलल्याप्रमाणें आपला शब्द पाळण्यास चुकूं नये अशी यास ताकीद द्यावी ह्मणजे झालें.' सुलतानास वजिराचा सल्ला ठीक वाटला, व त्यानें मोठ्या खुषीनें मला घरीं जाण्यास रजा दिली. याप्रमाणें तेव्हांपासून आजपर्यंत कोतवाल, वजीर व सुलतान या त्रिवर्गास मजकडून दीड लाखापेक्षां अधिक मोहरा घरीं बसल्या मिळत आहेत. तेव्हां यावरून, दोस्तसाहेब, मीं आपणांस जो काय नजराणा दिला व माझें जें काय वैभव येथें तुमच्या नजरेस पडत आहे, त्याविषयीं तुह्मांस आश्चर्य वाटावयास नको!

याप्रमाणें अबुल कासीम यानें आपला एकंदर वृत्तांत कालिफास सांगितल्यावर त्याला त्याचें तें गुप्त भांडार पाहण्याची अति उत्कट इच्छा झाली. तो ह्मणाला, 'तुमचें तें द्रव्य कितीही असलें तरी अशा प्रकारें तुमचा खर्च एकसारखा चालून तें तुह्मांस सदोदित पुरणें अशक्य दिसतें. तें कांहीं असो, पण तें तुमचें भांडार एकदां स्वतः नजरेनें पहावें अशी मला फार इच्छा झाली आहे. तुह्मी मजवर भरंवसा ठेवून ती तृप्त कराल, तर मी तुमचा विश्वासघात करणार नाहीं याविषयीं वाटेल तशी शपथ घेण्यास तयार आहें.'

हें कालिफाचें बोलणें ऐकून अबुल कासीम यास मोठें संकट पडलें. त्यानें पुष्कळ वेळ विचार करून उत्तर केलें, 'मीं आजपर्यंत कोणालाही तें भांडार कोणत्याही अटीवर दाखविलें नाहीं हें तुह्मी ऐकिलेंच आहे. पण तुह्मांला कबूल असल्यास कांहीं विशेष व क-

ठिण अटींवर मी तें तुह्मांला दाखवीन.' कालीफ ह्मणाला, 'कांहीं चिंता नाहीं. तुमच्या कसल्याही अटी असोत, मला त्या कबूल आहेत.' अबुल कासीम ह्मणाला, 'ठीक आहे. तुह्मीं आपल्याजवळ हत्यारपात्यार कांहीं एक घेऊं नये, व डोळे बांधून मजबरोबर चलावें. पण न जाणों, वेळेस द्रव्यलोभानें तुमच्या वृत्तींत चलबिचल झाली तर माझा मला बंदोबस्त करून घेतला पाहिजे; याकरितां मी मात्र आपल्या हातांत नागवी तरवार घेऊन येईन, ही गोष्ट तुह्मांला कबूल असली पाहिजे. ही तरवार मी कशाकरितां घेणार हें आणखी मी तुह्मांला स्पष्ट सांगतों. तें हें कीं, तुमच्या मनांत पापवासना आली असें माझ्या नजरेस आलें कीं, मी तेथल्या तेथें तुह्मांला ठार करीन. तर याचा अगोदर विचार करून तुह्मीं या कामास तयार व्हावें. मी स्वतः पूर्णपणें जाणून आहें कीं, हें काम मी मोठ्या अविचाराचें व धाडसाचें करीत आहें. तथापि आपल्या घरीं आलेला पाहुणा असंतुष्ट होऊन जाऊं नये ही माझी मनापासून इच्छा आहे, व तुह्मी शपथ घेऊन सांगतां त्यावर माझा भरंवसा आहे; येवढ्याच गोष्टीमुळें मी तुमचें ह्मणणें कबूल करितों.

कालीफ ह्मणाला, 'तुह्मी काय ह्मणालां तें सर्व माझ्या लक्षांत आलें. एकंदरींत मी येवढें सांगतों कीं, तुह्मांला या संबंधानें कोणत्याही प्रकारें भीति बाळगण्याचें कारण नाहीं. तुह्मी आतां दिरंग मात्र लावूं नका. याच वेळेस माझी इच्छा तृप्त करा, येवढेंच माझें मागणें आहे, का कीं, माझ्या दृष्टीस केव्हां तें भांडार पडेल असें मला झालें आहे!' अबुल कासीम ह्मणाला, 'तें आतांच्या आतां होणें अगदीं अशक्य आहे. तुह्मी आज रात्रीं येथें रहा, ह्मणजे वाड्यांत सर्व निजानीज झाल्यावर मी कोणास नकळत तुह्मांस तिकडे घेऊन जाईन.' असें ह्मणून त्यानें कालिफास एका उत्तम महालांत नेऊन तेथें पलंगावर निजावयास सांगितलें, व आपणही निजावयास गेला.

[दिवस दहावा.]

कालिफास झोंप कसची येते? अबुल कासीम आपणांस केव्हां हाक मारावयास येतो ह्मणून तो एकसारखा त्याची मार्गप्रतीक्षा

करीत राहिला होता. शेवटीं अगदीं मध्यारात्रीचे वेळीं अबुल कासीम कालिफाकडे गेला आणि त्यास ह्मणाला, 'दोस्तसाहेब, यावेळीं वाड्यांतील सर्व माणसांची निजानीज झाली आहे व जिकडे तिकडे अगदीं सामसूम आहे. तर आतां पूर्वीं ज्या शर्ती तुह्माला सांगितल्या आहेत त्या शर्तींवर मी तुह्मांस नेऊन तें खजिन्याचें ठिकाण दाखविण्यास तयार आहें.' कालिफ अगदीं उतावळाच झाला होता, सबब तो चट्कन् उठून ह्मणाला, 'हं चला तर. आपल्याकडून अगदीं तयारी आहे. मीं पूर्वीं ह्मटल्याप्रमाणें ब्रह्मांडनायक जो सर्वशक्तिमान व सर्वसाक्षी परमेश्वर त्याची शपथ वाहून सांगतों कीं, तुह्मीं ज्या अटी मला सांगितल्या आहेत, त्यांप्रमाणें वागण्यांत मी केंसाइतकीही कसूर करणार नाहीं, व एकंदरीनें तुह्मांला कोणत्याही प्रकारें या कृत्याबद्दल पश्चात्ताप होईल अशी कांहीं एक गोष्ट करणार नाहीं.'

नंतर अबुल कासीम यानें कालिफाचे डोळे बांधिले. त्यावेळीं तो कालिफास ह्मणाला, 'दोस्तसाहेब, आपल्याशीं असें वर्तन करणें हें मला अगदीं गैर वाटतें. पण तें करणें मला अनेक कारणांनीं भाग पडलें आहे याबद्दल माझा नाइलाज आहे. बाकी, तुमच्या वागणुकीवरून व चर्येवरून तुह्मी अत्यंत थोर व विश्वासू गृहस्थ आहां याविषयीं मला तिळप्राही संशय नाहीं.' कालीफ ह्मणाला, 'तुह्मांला याबद्दल कांहीं एक वाटूं देऊं नका. तुह्मी या कामीं सावधगिरी ठेवून वागतां तें तुमचें करणें अगदीं वाजवी आहे, हें मी पूर्णपणें जाणतों.'

नंतर अबुल कासीम यानें कालिफास हातीं धरून एका जिन्यांतून खालीं उतरविलें, व एका अफाट बागेंत त्यास घेऊन गेला. तींतील पुष्कळ बिकट व अडचणीच्या वाटांनीं ते बराच वेळ गेल्यावर, ज्या ठिकाणीं ती अपार संपत्ति होती त्या भुयारासारख्या खोल जागेंत ते उतरूं लागले. ती जागा बरीच भयंकर पण चांगली प्रशस्त असून तिला आंत जाण्यास फक्त एकच वाट होती. तिला दार होतें तें एका सबंध दगडाचें असून भलें मोठें अवजड होतें. ती उतरण्याची वाट अगदीं अंधारी होती, ती उतरून गेल्यावर ते

एका मोठ्या महालांत गेले. त्या महालांत, तेथें असलेल्या नाना प्रकारच्या मोठमोठ्या व अत्यंत तेज:पुंज अशा रत्नांच्या योगानें फारच चित्रविचित्र व स्वच्छ असा प्रकाश पडला होता. महालाच्या मध्यभागीं आल्यावर अबुल कासीम यानें कालिफाचे डोळे सोडले. तेव्हां तेथला तो अलौकिक प्रकार पाहून तो अगदीं थक्क होऊन गेला. महालाच्या मध्यभागीं शुभ्र संगमरवरी पाषाणाचा एक मोठा हौद होता. तो सुमारें वीस हात लांब व तितकाच रुंद असून मोठमोठ्या जुन्या काळच्या मोहरांनीं गच्च भरलेला होता. त्याच्या भोंवतीं सोन्याचे बारा खांब असून त्या प्रत्येक खांबावर अत्यंत कुशलतेनें तयार केलेला निवळ रत्नांचा एकेक सुरेख पुतळा बसविलेला होता.

अबुल कासीम यानें कालिफास हौदाजवळ नेऊन ह्मटलें, 'हा हौद पांच सहा पुरुष खोल आहे, यावरून यांत किती सोनें भरलेलें असावें याची कल्पना करा. मी एवढी उधळपट्टी करितों असें तुह्मांला वाटतें, पण हा हौद अजून दोन बोटें सुद्धां खालीं गेलेला नाहीं! यावरून हा निदान माझ्या हयातींत तरी रिकामा होण्याची भीति नाहीं असें तुह्मांला वाटत नाहीं काय?' कालिफानें बराच वेळ त्या हौदाकडे पाहून उत्तर केलें, 'ही संपत्ति अमर्याद आहे यांत संशय नाहीं. परंतु ती कालेंकरून संपली पाहिजे.' अबुल कासीम ह्मणतो, 'चिंता नाहीं. हा हौद रिकामा झाल्यावर दुसरें मजपाशीं काय आहे तें तुह्मांला दाखवितों.' असें ह्मणून त्यानें कालिफास दुसऱ्या एका महालांत नेलें. हा महाल तर पहिल्यापेक्षांही फार सुंदर असून, त्यांत निरनिराळ्या रंगाच्या संगमरवरी पाषाणांचीं कित्येक सुरेख कोचें ठेविलेलीं होतीं. त्या कोचांवर लाल रंगाच्या किनखापी चादरी पसरिलेल्या होत्या, व त्या चादरींना हजारों मोत्यें व हिरे लावल्यामुळें त्यांची शोभा अप्रतिम दिसत होती. ह्या महालाच्या मध्यभागींही पहिल्या महालाप्रमाणेंच एक हौद होता. तो पहिल्या एवढा मोठा नव्हता तरी त्यांतील संपत्ति पहिल्यापेक्षां लाखपटीनें किंवा कोटपटीनेंही अधिक होती असें ह्मणण्यास हरकत नाहीं; कां कीं,

त्यांत माणकें, पुष्कराज, पाच व दुसऱ्या सर्व प्रकारचीं रत्नेंच एक-सारखीं भरलेलीं होतीं !

हें पाहून कालिफास जें पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें तसें कधींही कोणास वाटलें नसेल ! हा जणूं काय आपल्यापुढें जादूचा खेळ चालला आहे अशी त्यास भ्रांति झाली ! या दुसऱ्या हौदांतील रत्नांकडे एकसारखी नजर लावून कालीफ तटस्थ उभा राहिला असतां अबुल कासीम यानें त्यास एका सोन्याच्या सिंहासनापाशीं नेलें. त्यावर दोन मनुष्यें निजलेलीं असून यांच्या मस्तकांवर रत्नांचे मुकुट होते, व तीं जणूं काय जिवंत अशीं भासत होतीं. अबुल कासीम ह्मणाला, 'या दोघांपैकीं एक राजा व दुसरी राणी असून हीं ह्या भांडाराचीं मूळचीं मालक होत. तीं ज्या सिंहासनावर निजलीं होतीं त्याच्या पुढच्या बाजूस—ह्मणजे त्या राजाराणीच्या पायगतीं—एक टेंबुरणीच्या लांकडाचें सुरेख मेज होतें. त्यावर पुढील अक्षरें लिहिलीं होतीं:—

" या ठिकाणीं जें अपार द्रव्य आहे तें मीं स्वत: आपल्या पराक्रमानें
"मिळविलें. मीं मोठमोठीं शहरें, किल्ले व देशचे देश काबीज करून व लुटून
"फस्त केले, आणि आपल्या शत्रूंस पादाक्रांत करून सोडिलें. सारांश, या
"पृथ्वीवर मी केवळ अद्वितीय पराक्रमी राजा झालों. तथापि सर्व लहान
"मोठ्या मर्त्य जीवांप्रमाणें शेवटीं माझा काळ आला, तेव्हां मृत्यूची धाड
"मजवर आल्यावांचून राहिली नाहीं! माझी स्थिति जो कोणी पाहील त्यानें
"आपले डोळे उघडावे, व माझ्या प्रमाणेंच त्याला कधीं तरी मृत्यु घेऊन
"जाईल हा विचार सदोदित त्यानें मनांत बाळगावा. येथील संपत्ति कालां-
"तरींही संपणार नाहीं हें त्यानें लक्षांत ठेवून तिचा व्यय जगामध्यें चांगलीं
"कृत्यें करण्यांत, चांगलें ह्मणवून घेण्यांत व स्वत: सुखोपभोग घेण्यांत करावा;
"कां कीं, त्याचें आयुष्य भरलें ह्मणजे या संपत्तीचा त्याला पुढें कांहीं उपयोग
"नाहीं. ती इतकी विपुल आहे तरी त्याला एक पळभर देखील अधिक
"आयुष्य देण्यास ती समर्थ होणार नाहीं ! "

हे त्या मेजावरचे शब्द वाचून कालीफ हरून् अल् रशीद हा अबुल कासीम यास ह्मणतो, 'तुह्मीं जो वर्तनक्रम ठेविला आहे तो यावरून अगदीं बरोबर आहे असें मी ह्मणतों. पण ज्या राजानें

हें एवढें द्रव्य संपादन केलें त्याचें नांव काय तें समजत नाहीं याबद्दल मला मोठें वाईट वाटतें.'

नंतर अबुल कासीम यानें कालिफास तेथून आणखी तिसऱ्या एका महालांत नेलें. त्या ठिकाणीं ज्या कांहीं अपूर्व वस्तु त्याच्या दृष्टीस पडल्या, त्यांत, त्याला अबुल कासीम यानें पूर्वीं जें एक रत्नांचीं पानें व फळें असलेलें सोन्याचें झाड नजर केलेलें होतें, तसलीं शेंकडों झाडें त्याच्या दृष्टीस पडलीं. अशा एकापेक्षां एक तेथील अपूर्व जिनसा पहात व आश्चर्य करीत कालीफ हा आणखी पुष्कळ वेळपर्यंत तेथें राहिला असता, परंतु पहाट होत आली तेव्हां घरांतील चाकरमाणसें जागीं होऊन कदाचित् आपला हा गुप्त प्रकार कोणाला कळेल, ह्या भीतीनें अबुल कासीम यानें कालिफास सांगितलें कीं, 'आतां आपल्याला पूर्ववत् येथून परत गेलें पाहिजे.' मग अबुल कासीम यानें कालिफाचे डोळे बांधण्याचा वगैरे पहिल्यासारखाच सर्व सोहळा केला, व ते दोघे कालीफ पूर्वीं निजला होता त्या खोलींत येऊन पोहोंचले. तेथें बसून ते उजाडेपर्यंत गोष्टी सांगत राहिले. कालीफ ह्मणतो, 'तुमचा स्वभाव, तुमची संपत्ति व तुमची वागणूक हीं सर्व पाहून मला पराकाष्ठेचा आनंद झाला. ईश्वरकृपेनें तुह्मीं बहुत दिवस वांचून या अप्रतिम सुखाचा उपभोग असाच सतत घेत जावा असें मी इच्छितों.' अबुल कासीम ह्मणाला, 'मला खरोखर कांहीं कमी नाहीं. पण खरें पुसाल तर एका गोष्टीमुळें मी रात्रंदिवस एकसारखा झुरत आहें. ती ही कीं, माझ्या येथें जरी देवांगनांस लाजविणाऱ्या अशा लावण्यवती स्त्रिया आहेत, तरी त्यांपैकीं एकीवरही माझी प्रीति नसून माझ्या प्राणांची धनीण जी दार्दोनी तिचा मला एकसारखा निदिध्यास लागलेला आहे. मी हें पूर्णपणें जाणून आहें कीं, ती ज्या अर्थी मरण पावल्याची शंका नाहीं, त्या अर्थी तिजविषयींचे विचार मनांत आणून काय उपयोग? तथापि माझ्या दुर्दैवामुळें मला चैन बिलकूल न पडून त्या सुंदरीची मूर्ति एकसारखी मला डोळ्यांपुढें दिसत असते, व तिच्या वियोगदुःखामुळें माझें काळीज जळत असतें, यामुळें मला हें एवढें वैभव असून तें

नसल्यासारखेंच आहे असें मी समजतों. एवढ्या ह्या संपत्तीच्या ऐवजीं, मला आपलें थोडेंसें पोटापुरतें मिळून मला माझ्या प्रिय दार्दानीच्या समागमांत राहतां आलें असतें तर मी आपल्याला हल्लींच्या पेक्षां हजारपटीनें अधिक सुखी समजलों असतों!'

कालिफास अबुल कासीम याच्या ह्या प्रेमातिशयाचें मोठें कौतुक वाटलें, व त्याची त्याला फार दया आली. तो ह्मणाला, 'शेटजी, तुह्मी तिचा हा व्यर्थ नाद घेऊन बसूं नका, व आपल्या मनाला शीण देऊं नका, असें माझें वारंवार तुह्मांस सांगणें आहे.' नंतर अबुल कासीम याचे पुनः एकवार आभार मानून कालीफ हा आपल्या बिऱ्हाडीं निघून गेला, व अबुल कासीम यानें त्यास जो नजराणा दिलेला होता तो घेऊन तो बगदादेस चालता झाला.

[ दिवस अकरावा. ]

याप्रमाणें कालीफ निघून गेल्यावर दोन दिवसांनीं अबुल कासीम याच्या द्रव्याच्या भांडाराविषयीं पुनः बसऱ्याच्या वजिराच्या मनांत लोभ उत्पन्न झाला. अबुल कासीम हा, जो जो आपणांकडे येतो त्यास वाटेल तितकें द्रव्य देतो, तसेंच सुलतानास, शहरच्या कोतवालास, व आपणांसही कबूल केल्याप्रमाणें हप्ते पोहोंचविण्याची वेळ कधींही चुकूं देत नाहीं, हें पाहून त्याचें तें भांडार फारच मोठें असलें पाहिजे असें त्याला वाटलें, व कोणत्या तरी उपायानें तें आपल्या हातीं लागेल असें केल्यावांचून सोडावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला. जे दुष्ट लोक आपल्या मनांतील हेतु साधण्याकरितां कोणत्याही प्रकारचें नीच कर्म करण्यास सहज प्रवृत्त होतात अशांपैकीं हा वजीर होता. त्याला एक अत्यंत सुरूप, व जिच्या अंगीं तारुण्य केवळ रसरसत होतें अशी सोळा वर्षांची कन्या होती. तिचें नांव बाल्किस् असें होतें. ती अत्यंत चतुर असून तिच्या अंगचे गुण मात्र तिच्या बापाच्या अगदीं विरुद्ध होते;—ह्मणजे ती सद्गुणांची केवळ पुतळीच होती असें ह्मणण्यास हरकत नाहीं. बसऱ्याच्या सुलतानाचा पुतण्या अली ह्या नांवाचा होता, त्याची तिजवर प्रीति बसली असून त्यानें तिजकरितां तिच्या बापापाशीं मागणीही

केली होती, व थोडक्याच दिवसांत तिच्याशीं त्याचा विवाह हो-ण्याचें ठरलें होतें.

असो. वजीर अबुल फत्ता यानें आपल्या त्या पापभीरू कन्येस एकांतीं नेऊन ह्मटलें, 'मुली, आज कांहीं अतिशय महत्त्वाच्या कामा-संबंधानें तुझ्या साहाय्याची मला गरज आहे. तें साहाय्य मी सांगतों याप्रमाणें तूं मला केलें पाहिजेस. बापानें कोणताही हुकूम केला तरी तो मुलांनीं शिरसावंद्य केला पाहिजे हें तूं जाणतच आहेस, सबब मी तुला जें काय सांगणार तें करण्यास तूं अनमान करणार नाहींस अशी माझी खात्री आहे. तूं आज रात्रीं जितका ह्मणून उत्तम प्रका-रचा पोषाख व नट्टापट्टा करवेल तितका करून अबुल कासीम याच्या घरीं जा. तेथें गेलीस ह्मणजे तो जेणेंकरून तुजवर लंपट होईल अशा प्रकारचें मोहक वर्तन करून त्याला पक्का आपल्या स्वाधीन करून घे, आणि त्याचें तेवढें द्रव्याचें भांडार कोठें आहे तें पाहून ये.' हे बापाच्या तोंडचे शब्द ऐकून बाल्किस् हिच्या अंगावर रोमांच उभे राहिले, व तिचें तोंड अगदीं उतरून जाऊन डोळे पाण्यानें भरून आले! ती स्फुंदत स्फुंदत ह्मणते, 'बाबा, क-सलें हें काम तुम्ही मला करावयास सांगतां! तें किती भयंकर व लज्जास्पद आहे व त्यापासून तुह्मांला केवढा काळिमा येणार आहे याचा विचार करा! तसेंच अह्मी याची मजवर इतकी प्रीति बसली आहे कीं, त्याला मजवांचून दुसरें कांहीं दिसत नाहीं. त्याच्याशीं असा बेइमानपणा करून मीं आपल्या सत्वास डाग लावावा हें तुह्मांस बरें दिसतें काय?' याप्रमाणें त्या मुलीनें बापाच्या तोंडांत चांगलें शेण घातलें, तरी तो पापकर्मा त्याविषयीं मनांत कांहीं न आणतां मुलीस ह्मणतो, 'तूं जें काय म्हणतेस त्या सर्व गोष्टींचा विचार यापूर्वींच मीं केलेला आहे. तूं मला कितीही बुद्धिवाद सांगि-तलास तरी माझा निश्चय ह्मणून ढळावयाचा नाहीं हें पक्कें समजून, मीं जी तुला आज्ञा करतों ती तुला निमूटपणें मान्य केली पाहिजे.' हें ऐकून ती बिचारी मुलगी ढळढळां रडूं लागली, आणि ह्मणते, 'बाबा, मी आतांपर्यंत जें बोललें त्याखेरीज, असलें दुष्ट कृत्य

करून, ज्यावर तुमचा बिलकूल हक्क नाहीं असें त्या मनुष्याचें द्रव्य हरण करण्याचा जो लोभ तुह्मांला सुटला आहे त्याबद्दल परमेश्वर तुह्मांला काय शिक्षा करील याही गोष्टीचा तुह्मी विचार करा, व मला कसेंही करून ह्या संकटांत पाडूं नका, अशी तुह्मांस माझी प्रार्थना आहे. वजिरानें तिच्या अंगावर खेंकरून रागानें ह्मटलें, 'कार्टे, मला असल्या परमार्थाच्या गोष्टी सांगूं नको. माझें कृत्य चांगलें असो किंवा वाईट असो, त्याचा विचार करण्याचें तुला कांहीं कारण नाहीं, व अधिकारही नाहीं. आतां ज्यास्त वाचाळपंचविशी लावशील तर तोंडांत खाशील. तुला अबुल कासीम याजकडे पाठविल्यावांचून मी कदापि सोडणार नाहीं; आणि मी शपथपूर्वक सांगतों कीं त्याच्या त्या खजिन्याचें ठिकाण पाहिल्याशिवाय तूं परत आलीस तर तुझ्या उरांत कट्यार खुपसून तत्काळ तुझा मी प्राण घेईन!'

हें ऐकून त्या बिचाऱ्या मुलीचा अगदीं निरुपाय झाला, व ती अत्यंत दुःखी होऊन तेथून निघून गेली. मग हें कृत्य कसेंही असो, आपल्याला तें केल्यावांचून तर गत्यंतर नाहीं, व आतां आपली अब्रू राखणें परमेश्वराकडे आहे, असा विचार करून ती संध्याकाळ झाली तशी पोषाख व दागदागिने घालण्याच्या कामास लागली. तिला स्वतःला नटण्यासवरण्याचा अगदीं कंटाळा असे, कारण ती ह्मणे कीं, 'खरी शोभा ह्मटली ह्मणजे मनुष्याचें मूळचें स्वरूप व अंगचे गुण यांतच आहे. वस्त्रप्रावरणें व दागदागिने घालून आणलेली जी शोभा ती केवळ भाड्यानें आणल्याप्रमाणें होय. या कारणास्तव ती डामडौल ह्मणून बहुतकरून कधींच करीत नसे. तेव्हां जी गोष्ट खरोखर तिच्या मनांत नव्हती, ती साधण्याकरितां अबुल कासीम याजकडे ती आपल्याकडून विशेष डामडौल करून गेली नाहीं; याचें नवल कशाला पाहिजे? तथापि ती मूळचीच अत्यंत सुंदर असून त्यांत आणखी दागिने व सुंदर वस्त्रें यांनीं जेव्हां भूषित झाली, तेव्हां तिच्या मोहकत्वाला काय विचारावयाचें आहे?

असो. रात्र होऊन काळोख पडल्यावर अबुल कासीम याचे घरीं

जाण्यास ठीक पडेल असें अबुल फत्ता वजीर यास वाटलें; यास्तव तो त्या वेळेची वाटच पहात राहिला. ती वेळ झाल्यावर त्यानें स्वत: अगदीं एकीकडच्या रस्त्यानें कोणाच्या दृष्टोत्पत्तीस न येईल अशा रीतीनें मुलीला अबुल कासीम याच्या दरवाज्यापर्यंत नेऊन पोंचविलें. तेथें तीस सोडून तो परत येऊं लागला असतां पुन: त्यानें तिला बजावून ह्मटलें कीं, सांगितल्याप्रमाणें तूं काम करून आली नाहींस तर तुझें डोकें जाईल हें खूप लक्षांत ठेव!'

बाल्किस् हिनें आपणास ह्या कठिण प्रसंगांतून अब्रू मलिन न होतां पार पाडावें अशाविषयी ईश्वराची मनांत प्रार्थना करून, अबुल कासीम याच्या दारावर थाप मारिली. तेव्हां लागलीच एक गुलाम येऊन त्यानें तें उघडलें, व आपल्या धन्याकडे तो तिला घेऊन गेला. त्याचा धनी ह्मणजे अबुल कासीम हा एका मोठ्या कोचावर, आपणावर पूर्वी आलेल्या संकटाचा विचार करीत, व आपल्या प्रिय दादानीविषयीं दु:ख करीत पडला होता. बाल्किस् दिवाणखान्यांत आल्याबरोबर तो उठला, व मोठ्या आदरानें तिला हातांत धरून त्यानें तीस कोचावर बसविलें, व 'आपण कोणत्या कारणास्तव येथें येण्याची तसदी घेतली?' असा तिला प्रश्न केला. ती ह्मणाली, 'आपण मोठे श्रीमान् व शौकी गृहस्थ आहां असा आपला लौकिक ऐकिल्यावरून, आपल्याशीं दोन घटका समागम करून मजा मारावी अशी इच्छा उत्पन्न झाल्यावरून मी आलें आहें.' नंतर तिनें आपल्या तोंडावरचा बुरखा एकीकडे केला. तेव्हां तिचें तें अप्रतिम सौंदर्य व तेज पाहून अबुल कासीम हा अगदीं वेडा होऊन गेला. दादानीखेरीज इतर कोणतीही स्त्री—मग ती कितीही सुरूप अथवा गुणसंपन्न असली तरी हा तिची पर्वा करणारा नव्हता. तथापि बाल्किस् हिला पाहून त्याला मोह पडल्यावांचून राहिला नाहीं. तो तिला ह्मणतो, 'हे मनमोहिनी, तुझ्या आगमनानें माझ्या अंत:करणाला जो अकल्पित आनंद झाला आहे, तसा आनंद होण्याचा खरोखर फारच थोड्यांस आजपर्यंत प्रसंग आला असेल! तुझ्या भेटीनें मी आपल्याला या समयीं अत्यंत धन्य समजतों!'

याप्रमाणें थोडावेळ त्यांचें संभाषण झाल्यावर रात्रीची भोजनाची वेळ झाली. तेव्हां अबुल कासीम हा बाल्किस् हिला घेऊन दुसऱ्या एका दिवाणखान्यांत गेला. त्या ठिकाणीं भोजनाचा अप्रतिम थाट केलेला असून यजमानांचा शब्द झेलावयाला अगदीं तत्पर असे पुष्कळ चाकरनफर होते; परंतु या स्त्रीला कदाचित् कोणी ओळखतील, तर हें चांगलें नाहीं, असा विचार करून अबुल कासीम यानें सर्वांस बाहेर जाण्यास सांगितलें. नंतर तीं दोघें जेवावयास बसलीं. जेवण झाल्यावर रत्नजडित सोन्याच्या पेल्यांत त्यानें त्या सुंदरीस आपल्या हातानें मद्य दिलें. त्या आनंदांत अबुल कासीम हा तिजकडे पाही तेव्हां प्रत्येक वेळीं तिजविषयीं त्याच्या मनांत अधिक अधिकच आसक्त उत्पन्न होई. तो तिजशीं अत्यंत प्रेमभरानें बोलूं लागला असतां तिचें मधून मधून समयोचित व दिलदार भाषण ऐकून तो अगदीं तल्लीन होऊन गेला. भोजन वगैरे सर्व आटपल्यावर तो फिरून तिला पहिल्या दिवाणखान्यांत घेऊन आला, व कोचावर अगदीं तिच्या सरसा जाऊन बसला. नंतर अत्यंत प्रेमपूर्वक तिचा हात घट्ट धरून किंचित् गहिंवरून ह्मणाला, 'हे भुवनसुंदरी, प्रथमच तुझ्या नेत्रकटाक्षबाणांनीं मला एका क्षणांत विव्हळ करून टाकिलें, आणि आतां तर तुझ्या प्रीतियुक्त संभाषणरूपी जाळ्यांतच मी प्रत्यक्ष सांपडल्यामुळें सर्वस्वी तुझ्या स्वाधीन झालों आहें! माझें मन व शरीर हीं दोन्हीं माझ्या स्वाधीन राहिलीं नाहींत! तर ह्या दासाचा अंगीकार करून याचें सर्व आयुष्य इतःपर सुखांत किंवा दुःखांत घालविणें हें केवळ तुझ्या स्वाधीन आहे.'

इतकें बोलून अबुल कासीम यानें त्या प्रेमभरांत बाल्किस् इच्या हाताचें इतक्या कांहीं आवेशानें चुंबन घेतलें कीं, आतां मात्र खरोखरीच कठिण प्रसंग आपल्यावर येतो असें तिला वाटून तिचें तोंड खाडकन् उतरून गेलें, व ती एका क्षणांत अगदीं निस्तेज दिसूं लागली, एवढ्यानेंच झालें नाहीं, तर ती क्षणाभरानें ढळढळां रडूंही लागली! हें पाहून अबुल कासीम फारच चकित झाला, व तिला पुसतो, 'हे सुंदरी, तुझी अशी अवस्था एकाएकीं होण्याचें कारण

काय? तुझे हे अश्रु पाहून माझें अंतःकरण तिळतिळ तुटूं लागलें आहे. असें होण्याचें कारण जर मी असेन, तर मी ह्मणतों कीं, माझ्या भाषणांत किंवा कृतींत जो कांहीं प्रमाद झाला असेल त्याबद्दल मला क्षमा कर, व तुझ्या इच्छेविरुद्ध माझ्या हातून कोणतीही गोष्ट होणार नाहीं ही मनांत गांठ बांधून तूं खुशाल निर्भय रहा.'

बाल्किस् ह्मणते, 'मी आतांपर्यंत तुमच्याशीं उघडपणें कांहीं बोलिलें नाहीं. कां कीं, अब्रूची भीति, दुःख व विश्वासघात यांच्या झगड्यानें माझ्या अंतःकरणांत पराकाष्ठेची चळवळ करून सोडल्यामुळें मी आतां पुढें करूं तरी काय, असें मला होऊन गेलें होतें; पण शेवटीं आतां मला वास्तविक प्रकार काय आहे तो बोलून दाखविल्यावांचून राहवत नाहीं. मी थोर कुलांतील स्त्री असून, तुमच्या येथें जें द्रव्याचें भांडार आहे त्याच्या ठिकाणाचा शोध लावण्याकरितां माझ्या बापानें मला एथें पाठविलें आहे. मीं वाटेल त्या रीतीनें तुमचें मन स्वाधीन करून घेऊन तें ठिकाण पाहून यावें अशी मला त्याची आज्ञा आहे. असें करणें हें चांगलें नाहीं, असें मीं बहुत प्रकारें त्यास ह्मटलें; पण तुजकडून हें काम न झाल्यास तुझा मी जीव घेईन असें मला त्यानें निक्षून सांगितलें, तेव्हां माझा अगदीं नाइलाज झाला. महाराज, ही केवढी कठिण अट मला त्यानें घातली याचा आपणच विचार करा. माझें मन एका राजघराण्यांतील पुरुषावर बसलें असून त्याचा माझ्याशीं लौकरच विवाह होणार आहे. असें असतां हा प्रसंग मजवर येऊन माझें सत्व मलीन व्हावें ही केवढी दुःखाची गोष्ट आहे! महाराज, जीव हा मनुष्यास अत्यंत प्यारा आहे हें सांगावयास नकोच; तर त्यावर प्रसंग आल्यामुळें मोठ्या संकटानें व दुःखानें मीं हें काम अंगावर घेतलें आहे. तेव्हां यांतून तुह्मांला व मला कोणत्याही प्रकारें अपाय न होतां पार पडतां येईल व माझ्या अब्रूचें संरक्षण होईल असें करणें तुमच्या हातीं आहे.'

[ दिवस बारावा. ]

अबुल फत्ता याच्या कन्येचें बोलणें ऐकून अबुल कासीम ह्मणतो, 'बाई, तुह्मीं मन मोकळें करून खरा प्रकार मला सांगितला एवढें

फार चांगलें झालें. आतां तुह्मांला कशाचीही भीति नाहीं असें समजा. तुह्मांला मी आपलें भांडार तर दाखवितोंच, पण माझें ज्या प्रकारचें तुह्मांशीं वर्तन असावें असें तुह्मी इच्छितां, त्यापेक्षांही अधिक चांगल्या रीतीनें मी वागेन हें तुमच्या पुढें प्रत्ययास येईल. तुमचें सौंदर्य पाहून मला जो कांहीं प्रथम मोह पडला होता, त्याला आतां अगदीं विरजण पडून गेलें आहे; व तुमच्याविषयीं जे विचार मीं मनांत आणले होते, त्यांच्या अगदीं उलट विचार आतां माझे झाले आहेत. तुमचें ज्यावर प्रेम बसलें आहे त्या आपल्या प्रियकरास, तुमच्या मनास यत्किंचितही धक्का न पोहोंचतां तुह्मांस वरतां येईल हें खचित समजा, व झालेलें सर्व दुःख अगदीं विसरून जा. पुसा डोळे पाहूं?' हें ऐकून बाल्‌किस्‌ ह्मणते, 'महाराज, तुह्मी अत्यंत उदार बुद्धीचे गृहस्थ अशी जी तुमची कीर्ति सर्वत्र पसरली आहे ती अगदीं यथार्थ आहे. तुमचें हें अनुपम सौजन्य पाहून मला जो आनंद झाला आहे तो किती ह्मणून सांगूं! आणि खरेंच सांगतें, तुमच्या महदुपकारांचा मजवर जो भार झाला आहे तो हलका करण्याची संधी येईपर्यंत मला बिलकूल चैन पडणार नाहीं!'

नंतर अबुल कासीम यानें, कालिफास पूर्वीं ज्या महालांत नेऊन निजविलें होतें, तेथें त्या स्त्रीस नेलें, व जिकडे तिकडे घरांत सामसूम होईपर्यंत तो तिच्याशीं गोष्टी सांगत बसला. नंतर तो तिला ह्मणाला, 'आतां तुह्मांला तें भांडार दाखविण्यास मला कांहीं हरकत नाहीं, पण तुमचे डोळे बांधून मला तुह्मांस तेथें नेलें पाहिजे, त्यावांचून मला तसें करितां येत नाहीं. तर याबद्दल क्षमा करा.' ती ह्मणाली, 'तुह्मी वाटेल तसें करा. तुमच्या ठायीं माझा पूर्णविश्वास असून तुह्मी सांगाल तिकडे निर्भयपणें तुमच्या मागून मी येतें.' मग अबुल कासीम यानें तिचे डोळे बांधिले, व तिला हातीं धरून, कालिफास ज्या रीतीनें त्या बागांतून तळघरांत तो घेऊन गेला होता, त्याप्रमाणेंच तिलाही त्यानें नेलें.

अबुल कासीम यानें बाल्‌किस्‌ इचे डोळे सोडले तेव्हां तेथली कधीं न दृष्टीस पडणारी अशी ती अमर्याद संपत्ति पाहून आश्चर्यानें

तिच्या मनाची अशी स्थिति होऊन गेली कीं, काय बोलावें आणि काय करावें हें तिला कांहींच सुचेना! ती अगदीं चित्रवत् स्तब्ध उभी राहिली! यांत कांहीं नवल नाहीं. कां कीं, एवढा संपत्तिमान् व महासमर्थ सार्वभौम राजा जो कालीफ, तो सुद्धां जर ती संपत्ति पाहून पराकाष्ठेचा चकित होऊन गेला, तर या बिचारीची कथा काय? असो. सर्वांत विशेषत: बाल्किस् इचें लक्ष तक्तावर निजलेल्या त्या राजाराणींकडेच फार वेधलें. तिनें त्यांच्या पायागतीं असलेल्या मेजावरचा लेख वाचला, व त्या निजलेल्या राणीच्या गळ्यांत खबुतराच्या अंड्याएवढाल्या मोत्यांचें पेंडें होतें तें पाहून, 'पृथ्वीवर असलें अपूर्व भूषण कोठेंतरी असेल काय?' असें बोलून दाखविल्यावांचून तिला राहवेना. तेव्हां अबुल कासीम यानें लागलीच तें पेंडें त्या राणीच्या गळ्यांतून काढून बाल्किस् हिच्या गळ्यांत घातलें, आणि तीस ह्मणाला, हें पेंडें पाहून तुमच्या वडिलांस येथील संपत्तीची कांहीं अटकळ करितां येईल.' खेरीज त्यानें तिला ह्मटलें कीं, 'येथलीं जीं काहीं उत्कृष्ट रत्नें आहेत, त्यांतून वाटेल तेवढीं तुह्मी घ्या. मजकडून कांहीं मनाई नाहीं. याप्रमाणें तिला जीं कित्येक रत्नें फार पसंत वाटलीं, तीं अबुल कासीम यानें काढून तिच्या पदरांत बांधून दिलीं. इतक्यांत पहाट होत आली, सबब अबुल कासीम यानें परत निघून जाण्याकरितां बाल्किस् इचे डोळे पूर्ववत् बांधिले व तिला घेऊन तो पूर्वी सांगितलेल्या महालांत आला. तेथें माणसाला माणूस दिसतें न दिसतें इतकें उजाडे तोंपर्यंत त्यांच्या गोष्टी झाल्यानंतर, अबुल कासीम याची अत्यंत आभारी होऊन बाल्किस् ही घराकडे जाण्यास निघाली.

वजिराला रात्रीं झोंप मुळींच लागली नाहीं, व पहाट झाली तसा तर तो आपल्या कन्येची मार्गप्रतीक्षा करीत दरवाज्याकडे डोळे लावून बसलेला होता. अबुल कासीम याला मोहित करून आपला कार्यभाग साधून मुलगी येते कीं नाहीं याविषयीं तो मोठी चिंता करीत होता, पण ती आल्याबरोबर तिच्या गळ्यांत तें मोठें पेंडें व अबुल कासीम यानें तिच्या पदरांत बांधून दिलेलीं बहुमोल रत्नें जेव्हां

त्यानें पाहिलीं, तेव्हां त्याचें अंतःकरण केवळ आनंदसागरांत पोहूं लागलें! मग तो तिला मोठ्या उत्सुकतेनें ह्मणतो, 'बरें मुली, तूं तें भांडार पाहून आलीस ना?' बाल्किस् उत्तर करिते, 'होय बाबा मीं तें सावकाशपणें पाहिलें, आणि खरोखर तेथल्या संपत्तीइतकी संपत्ति, पृथ्वीवरील सर्व राजांची संपत्ति जरी एकत्र केली तरी तीपेक्षां ही ज्यास्त भरेल असें मला वाटतें! पण विशेष गोष्ट ही कीं, एवढी संपत्ति जवळ असून तिचा मालक जो अबुल कासीम, त्याचें सौजन्य, लीनता व सभ्यपणाची वागणूक हीं मोठीं वर्णनीय आहेत ही फारच चमत्काराची गोष्ट आहे!' नंतर तिनें अथपासून इतिपर्यंत त्याच्याशीं घडलेला आपला सर्व व्यवहार त्याला कथन केला. पण अबुल कासीम याचा पापभीरुपणा व अलौकिक सद्गुण यांचा त्याच्या मनावर यत्किंचितूही ठसा बसला नाहीं! ठीकच आहे! आपली मुलगी भ्रष्ट झाली तरी बेहेत्तर आहे पण तिनें तें भांडार पाहून आलेंच पाहिजे असा ज्याचा निश्चय, त्या महापुरुषाचें वर्तन याहून निराळ्या प्रकारचें कसें असूं शकणार?

आतां इकडे हा प्रकार चालला असतां कालीफ हरून् अल् रशीद हा आपल्या राजधानीची वाट चालत होता. तो शहरांत पोहोंचल्याबरोबर त्यानें अगोदर जाफर वजिराची सुटका करण्याविषयीं हुकूम केला. मग खासा स्वारीनें मोठ्या संतोषानें त्यास हुजूर बोलावून, बगदादेहून निघाल्यापासून परत येईपर्यंत झालेली सर्व हकीकत त्यास तपशीलवार सांगितली. मग त्यास ह्मणतो, 'जाफर, आतां त्या अबुल कासिमाकरितां मी काय करूं असें तुला वाटतें? कारण पहा कीं, माझ्यासारख्या सार्वभौम राजानें अशा सामान्य मनुष्याच्या उपकाराचें ओझें तसेंच आपल्या डोक्यावर राहूं द्यावें हें अगदीं अयोग्य आहे. तें ओझें कसें उतरावें याचा मीं पुष्कळ विचार केला. पण कांहींच युक्ति सुचत नाहीं. त्या अत्यंत थोर मनाच्या श्रीमान् गृहस्थाकडे मीं जरी आपल्या जामदारखान्यांतल्या अतिशय दुर्मिळ व मौल्यवान् वस्तु पाठविल्या, तरी त्याच्या संपत्तीच्या मानानें त्या त्याला यःकश्चित् वाटतील यांत संशय नाहीं. तर आतां

त्याच्यावर आपली कडी होईल अशी कांहीं तरी युक्ति तूं विचार करून सांग.' जाफर ह्मणतो, 'महाराज, माझें जर आपण ऐकाल तर माझ्या विचारास असें येतें कीं, आपण आतांच्या आतां बसऱ्याच्या सुलतानास पत्र लिहावें कीं, देखत हुकूम आपला सर्व अधिकार अबुल कासीम यास द्यावा; इतःपर अबुल कासीम यास आह्मीं बसऱ्याचा सुलतान नेमिलें आहे. नंतर मागाहून मी आपल्या तर्फेनें तेथें जाऊन त्यास यथायोग्य समारंभानें गादीवर बसविण्याची तजवीज करीन.

कालिफास हा वजिराचा विचार पसंत पडला. तो त्यास ह्मणाला, 'तूं ही खरोखर फारच योग्य गोष्ट सांगितलीस. या योगानें अबुल कासीम याच्यावर आपली कडी होऊन शिवाय दुसरें असें होईल कीं, बसऱ्याचा सुलतान व त्याचा वजीर वगैरेंनीं त्या बिचाऱ्यापासून विनाकारण द्रव्य उपटलें आहे, ह्या त्यांच्या अपराधाबद्दल त्यांस योग्य शिक्षा होईल.' असें ह्मणून त्यानें ताबडतोब स्वदस्तुरचें पत्र बसऱ्याच्या सुलतानास लिहिलें, व तें आपल्या खासगी तैनातींतील सांडणीस्वाराबरोबर रवाना केलें.

नंतर कालीफ हा जुबैदी राणीच्या महालांत गेला, व झालेली सर्व हकीकत तिला सांगून, अबुल कासीम याजकडून नजर आलेला तो छोटा हुजऱ्या, तें झाड, आणि मोर हीं त्यानें तीस दिलीं. त्याचप्रमाणें ती रूपवती दासीही तिच्या तैनातीस त्यानें दिली. तिला पाहून तर राणी इतकी खुष झाली कीं, 'हिजपुढें, तुह्मीं बाकी जें काय दिलें तें कांहींच नाहीं' असें ती ह्मणाली. याखेरीज दुसऱ्या ज्या वस्तु होत्या, त्यापैकीं तो माणकांचा पेला मात्र कालिफानें स्वतःकरितां ठेवून बाकीचें सर्व जाफर वजिराच्या स्वाधीन केलें. जाफर यानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अबुल कासीम यास बसरा येथें गादीवर बसविण्याकरितां जाण्याची लागलीच तयारी केली.

[ दिवस तेरावा. ]

तो सांडणीस्वार दरकूच दरमजल करांत थोडक्याच दिवसांत बसरा येथें पोहोंचला, व त्यानें कालिफाकडील लखोटा, सुलतान

दरबारांत बसला होता त्याजपुढें नेऊन सादर केला. त्यांतील मजकूर वाचून त्याला अर्थातच परमावधीचें दुःख झालें. तो लागलीच वजिरास घेऊन एकांतीं गेला, आणि ह्मणाला, 'काय हो, कालीफ महाराजांच्या ह्या हुकुमास ह्मणावें तरी काय? असा मजकडून कोणता अन्याय झाला, कीं ज्याच्या योगानें त्यांची मजवर एवढी खप्पा मर्जी झाली? मला तर कांहीं एक याचें कारण दिसत नाहीं. हा हुकूम केवळ जुलुमाचा होय हा मीं मुकाट्यानें मानावा असें तुह्मांला वाटतें काय?' वजीर उत्तर करितो, 'सरकार, आपण इतकें दुःख करूं नका. हा हुकूम मानण्याचें कांहीं कारण नाहीं. असें केल्यापासून वाईट परिणाम होईल असें आपणांला वाटत असेल तर त्याला युक्ति मीं इतक्यांत योजिली आहे. ती हीच कीं, अबुल कासिमाला नाहींसा केला ह्मणजे झालें. त्याचा जीव घ्यावा असें मीं ह्मणत नाहीं, तर त्याला अशा ठिकाणीं नेऊन ठेवावा कीं, तो कधींही कोणाच्या दृष्टीस न पडेल; आणि मग जिकडे तिकडे अफवा उठवावी कीं, तो एकाएकीं मरण पावला. असें झालें ह्मणजे राज्य आपलें आपल्याला राहून, तो जी एवढी सार्वभौम बादशाहाची संपत्ति भोगीत आहे, तीही आपल्यास मिळण्यास मार्ग होईल. कसा तर, तो एकदां आपल्या हातीं सांपडला ह्मणजे त्याचे नानाप्रकारचे असे हाल करावे कीं, जिवाच्या तरी भीतीनें त्यानें आपलें तें भांडार आपल्या स्वाधीन करावें.' सुलतान ह्मणाला, 'हो. ही युक्ति बरी दिसते. पण कालिफाच्या हुकुमाचा जबाब आपण त्यास काय पाठवावा?' वजीर ह्मणतो, 'त्याबद्दल आपण कांहीं काळजी करूं नये. हें सर्व कसें करावयाचें तें मजकडे लागलें.' त्यावरून सुलतान त्यास ह्मणाला, 'कांहीं चिंता नाहीं. माझा पूर्ण विश्वास तुमच्यावर आहे. तुह्मांला वाटेल तशी तजवीज तुह्मी करा.'

मग वजीर दुसरे कांहीं दरबारचे मुत्सद्दी बरोबर घेऊन अबुल कासीम याच्या घरीं गेला. वजिराच्या मनांत काय डाव होता, हें त्याजबरोबरच्या दुसऱ्या मंडळीस कांहीं एक माहीत नव्हतें. असो. अबुल कासीम यानें त्या सर्वांचा चांगला सत्कार करून वजिरास गादी-

वर मुख्य ठिकाणीं बसविलें. नंतर त्या सर्वांस उपहारासाठीं दिवाण-खान्यांत नेलें. उपहार झाल्यावर शिरस्त्याप्रमाणें मद्याचे पेले झोंकण्यास सुरवात झाली. तेव्हां वजीर अबुल कासीम याच्या जवळच बसला होता, त्यानें कोणाला नकळत आपल्याबरोबर आणलेली एका प्रकारची भुकटी अबुल कासीम यांच्या पेल्यांत टाकिली. तें मद्य प्याल्याबरोबर अबुल कासीम याची विलक्षण अवस्था झाली, ती अशी कीं, तो एकाएकीं, धाडकन् जमिनीवर प्रेतवत् पडला. तेव्हां नोकर चाकर उभे होते ते झटकन् पुढें झाले, व त्यांनीं त्यास बसलें करून त्याच्या डोक्यावर व डोळ्यांवर पाणी शिंपडण्याचे वगैरे उपचार केले. पण तो जिवंत असल्याचें जेव्हां कांहींच चिन्ह दिसेना, तेव्हां त्यांनीं त्याला उचलून कोचावर ठेविलें. यावरून त्या घरांत जिकडे तिकडे आकांत होऊन गेला. वजिराबरोबर आलेली मंडळी अत्यंत आश्चर्यचकित व भयभीत होऊन जागच्या जागींच स्तब्ध राहिली. मात्र तो पक्का काफर माणून ह्मणजे वजीर अबुल फत्ता, यास आपला हेतु साधला असें पाहून पराकाष्ठेचा आनंद झाला; पण बाह्यात्कारीं त्यानें आपल्याला ऐवढें अमर्याद दुःख झालेंसें दाखविलें कीं, बाकीच्या लोकांना तें पाहून भारीच वाईट वाटलें. व जिकडे तिकडे एकच कल्लोळ होऊन गेला. नंतर त्या मात्रागमनी वजिरानें लागलीच टेंबुरणी व हस्तिदंत ह्यांची मोठी पेटी करावयास सांगून इकडे लागलीच अबुल कासीम याची सर्व मालमत्ता जप्त केली, व ती सुलतानाच्या कामगारांच्या ताब्यांत दिली.

थोडक्याच वेळांत अबुल कासीम याच्या मरणाची वार्ता शहरांत चोहोंकडे पसरली. तेव्हां सर्व आबालवृद्धांस अतिशय दुःख होऊन त्यांनीं सुतक्याचे पोषाख घातले, व त्या वेळच्या तेथल्या रिवाजाप्रमाणें सर्वजण त्याच्या दाराशीं अनवाणी व डोकीं मोकळीं टाकून आले. ह्मातारे व तरणे लोक, मोठ्या बायका व मुली ह्या सर्वांनीं रडून एकच हाहाःकार करून सोडला—जणूं काय कोणाचा एकुलता एक मुलगा, कोणाचा भाऊ, कोणाचा नवरा, अशीं मरण पावलीं आहेत असा भास झाला ! तसेंच श्रीमंत असो वा गरीब असो,

त्या सर्वांस त्याच्या मरणानें आपली मोठी हानि झाली आहे असें वाटलें, कां कीं, श्रीमंतांचें आदरातिथ्य करून त्यानें त्यास शेंकडों वेळां नानाप्रकारची करमणूक केली होती, व गरिबांचा तर तो सर्वप्रकारें वालीच होता. त्याच्या एथून कोणी कधीं विन्मुख गेला नाहीं, इतकेंच नाहीं, तर अत्यंत संतुष्ट होऊन बरेच दिवसांची बेगमी करून प्रत्येक गरीब माणूस जात असे. तेव्हां अशा गृहस्थाच्या मृत्यूनें सर्व शहर हलालून गेलें यांत काय नवल आहे?

असो. बिचाऱ्या अबुल कासिमास पूर्वीं सांगितलेल्या पेटींत घातलें, व वजिराच्या हुकुमानें शहराबाहेर थोरल्या कबरस्थानांत नेलें. तेथें नेऊन पेटी उतरल्यावर त्या महापाजी वजिरानें आपल्याला अनन्वित दुःख झाल्याची इतकी उत्कृष्ट बतावणी केली कीं, अबुल कासीम याची गोष्ट एकीकडेच राहिली, पण वजिराच्या दुःखाबद्दलच लोकांना वाईट वाटून ते त्याला समाधानाच्या गोष्टी सांगूं लागले!

मग तेथला सर्व विधि उरकल्यावर लोक आपआपल्या घरोघर निघून गेले. वजीर मात्र रात्र पडेपर्यंत तसाच आपले दोन विश्वासू गुलाम घेऊन तेथें राहिला. नंतर रात्र झाल्यावर त्यानें गुलामांकडून तेथें विस्तव करविला, व एका भांड्यांत आधण येईपर्यंत पाणी तापविलें. मग अबुल कासीम यांस खड्याबाहेर काढून त्याच्या आंगावर त्यानें तें पाणी थोडथोडें ओतविलें. तेव्हां कांहीं वेळानें तो अंमळ शुद्धीवर आला, आणि इकडे तिकडे पाहून ह्मणतो, 'अहो,' हें काय? आपण येथें कोठें आलों? आणि माझी ही अशी अवस्था कशानें झाली?' त्यास वजीर खोंचून उत्तर करतो, 'अरे लबाडा, सोद्या, मींच तुझी ही अवस्था केली आहे, समजलास? मींच तुला, तूं माझ्या हातीं पक्का सांपडावास म्हणून येथें कांहीं युक्ति करून आणिलें आहे आणि आतां तूं जर मला तें आपलें भांडार बऱ्याबोलानें दाखविणार नाहींस, तर तुझ्या आंगाची मी चामडी लोळविण्यास सोडणार नाहीं! तूं किती सोशिक आहेस तें मी आतां पहातों! आज नाहीं उद्यां, उद्यां नाहीं परवां, कधीं तरी तुला मीं आपलें ह्मणणें कबूल करावयास लावीनच लावीन; कां कीं, मी तुला

छळण्याच्या एकीहून एक अशा भयंकर युक्त्या योजीन कीं, तुला तें दुःख असह्य होऊन तूं आपोआप कबूल होशील.' अबुल कासीम तशा स्थितींत होता तरी त्यानें वजिरास चापून उत्तर केलें कीं, 'मी तुमच्या हातीं सांपडलों आहें तेव्हां तुह्मी वाटेल तें करावयास चुकणार नाहीं हें खचीत. तथापि मी आपल्या भांडाराचा तुह्मांला कदापि थांग लागूं देणार नाहीं हें मात्र पक्कें समजा.'

अबुल कासीम याच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच त्या दुष्ट वजिरानें आपल्या दोघां गुलामांस त्याला बळकट धरून ठेवण्यास सांगून बुद्धचा बरोबर आणलेल्या सिंहाच्या कातड्याचा चाबूक बाहेर काढला, आणि त्या चाबकानें त्यानें त्यास इतकें निर्दयपणें सडकलें कीं, अबुल कासीम हा जमिनीवर मूर्च्छित होऊन पडला! तेव्हां वजिरानें गुलामाकडून त्यास पुनः पेटींत घातलें, व थडग्याच्या दारास दोन मोठमोठीं कुलपें लावून व त्या गुलामांस तेथें पाहऱ्यास ठेवून आपण घरीं निघून गेला.

दुसरे दिवशीं वजीर सुलतानाकडे गेला, आणि त्यानें सर्व वृत्तांत त्यास निवेदन केला. तो ह्मणाला, 'काल मीं अबुल कासीम याचें धैर्य चांगलें कसास लाविलें, पण तो पक्का बिलंदर, माझ्या ह्मणण्यास बिलकूल कबूल झाला नाहीं! तथापि कांहीं चिंता नाहीं, मी त्याजकरितां आणखी अशा प्रकारचें चौदावें रत्न तयार करतों कीं, तो ह्मणेल शाबास! त्यानें त्या पाषाणाला घाम न सुटेल तर मी त्याहीपेक्षां आणखी वस्ताद असे कांहीं उपाय योजीन कीं, ते त्याला खचित सहन न होऊन तो कबूल झाल्यावांचून राहणार नाहीं. सुलतानही वजिराप्रमाणें अत्यंत दुष्टबुद्धि मनुष्य होता. त्याला हें ऐकून फार समाधान वाटलें, व तो वजिरास ह्मणाला, 'फार चांगलें आहे. तुह्मीं जो क्रम चालविला आहे त्यांत आपल्याला यशप्राप्ति होऊन तें भांडार आपल्या हातीं लौकरच लागेल असा संभव दिसतो. पण आतां कालिफाकडून जो स्वार आलेला आहे त्याबरोबर कसा काय जबाब लिहून पाठवावयाचा?' वजीर उत्तर करितो, 'अंः, त्यांत काय आहे? आपण असें लिहावें कीं, अबुल कासीम

यांच्या हातीं आह्मीं हुकुमाप्रमाणें सर्व अधिकार दिला, परंतु एकाएकीं एवढ्या मोठ्या पदास आपण पोहोंचलों असें पाहून त्याला पराकाष्ठेचा हर्ष झाला, व त्या निमित्तानें त्यानें फार मोठा समारंभ व थाट केला असतां बेसुमार मद्य त्यानें प्राशन केलें, व त्यामुळें तेथल्या तेथें एकाएकीं त्याचा अंत झाला.' सुलतानाला हा विचार फारच योग्य वाटला, व त्याप्रमाणें त्यानें पत्र लिहून स्वाराबरोबर तो लखोटा कालिफाकडे रवाना केला. नंतर अबुल कासीम याचा खजीना आतां आपल्या हातीं लागणार अशी वजिराला भारी आशा उत्पन्न होऊन त्याचा चांगला समाचार घेण्याकरितां ह्मणून कबरस्थानांत तो गेला. पण तेथें जाऊन पहातो तों थडग्याचें दार त्याला उघडें दिसलें! त्याबरोबर त्याच्या मनाला मोठा धक्का बसला, आणि आंत जाऊन पाहिल्यावर जेव्हां पेटींत अबुल कासीम नाहीं असें त्यास दिसलें, तेव्हां तर निराशा, दुःख व भीति ह्याच कोणी नद्या, यांच्या भोंवऱ्यांत सांपडून त्याची अवस्था फारच कठिण झाली. तो अत्यंत दुःख करीत व ऊर बडवीत तसाच आपल्या यजमानाकडे माघारा आला, आणि घाबऱ्या घाबऱ्या ह्मणतो, ' अल्ला ! अल्ला ! आतां आपलें काय होणार कोण जाणे ! तो महापाजी मनुष्य तर सुटून गेला ! तो आतां बगदादेस जाऊन कालिफास हा सर्व वृत्तांत सांगेल ! महाराज, आतां आपली धडगत दिसत नाहीं !'

[ दिवस चौदावा. ]

अबुल फत्ता यास आपण केलेल्या कृत्याचा पस्तावा होऊन तो ह्मणतो, 'काल मीं त्यास ठार मारून टाकलें असतें तरी बरें झालें असतें; पण आतां तेल नाहीं, तूप नाहीं, धुपाटणें मात्र हातीं आलें! अशी गोष्ट झाली तरी पण आपण निराश होऊन स्वस्थ बसून उपयोग नाहीं. डोळ्यांत प्राण आहे तोंपर्यंत संरक्षणाचा यत्न केलाच पाहिजे. अबुल कासीम हा बहुधा पळून गेला असावा, अथवा शहरांतच कोठें लपून बसला असावा. काय चिंता आहे ! तो जातो कोणीकडे ? आपण खासगीकडील हुशार लोक पाठवून शहरांत व आसपास चोहोंकडे त्याचा शोध करवूं, व इतक्यांतच ही तज-

बीज केली असतां त्याचा तपास लागल्यावांचून राहणार नाहीं, अशी मला उमेद आहे.' सुलतानाच्याही जिवाला वजिराप्रमाणेंच या गोष्टीचा मोठा चटका लागून राहिला. यास्तव त्यानें तत्काळ आपल्या खासगीकडील निवडक शिपायांच्या दोन टोळ्या करून एकीवर आपण व एकीवर वजीर मुख्य झाला, व ते अबुल कासीम याचा तपास लावण्याकरितां निघाले.

शहरांत कोठेंही अबुल कासीम याचा शोध लागेना, तेव्हां हे दोघे आपल्या लोकांसह त्या कामाकरितां बाहेर निघाले. त्यांनीं मोठ्या बारकाईनें खेड्यांपाड्यांत, रानावनांत व डोंगरांत जारीनें त्याचा शोध चालविला असतां, इकडे जाफर वजीर हा पूर्वीं सांगितल्याप्रमाणें बसऱ्यास येत होता त्यास सुलतानाकडील लखोटा घेऊन परत चाललेला कालिफाचा स्वार वाटेंत भेटला. तो जाफर यास सलाम करून व अत्यंत खिन्न वदन करून ह्मणतो, 'महाराज, आपण बसऱ्यास जाण्याची तसदी कशाला घेतां ? ज्याच्याकरितां आपण जाणार तो थोर गृहस्थ अबुल कासीम हा तर मरण पावला, व दोन दिवसांपूर्वीं त्यास मूठमाती दिली ती मीं या डोळ्यांनीं पाहिली !' हें दुःखकारक वर्तमान ऐकून जाफर यास इतकें वाईट वाटलें कीं, ज्याच्या डोळ्यांतून टपटपटप अश्रु गळाले ! कारण अबुल कासीम यास गादीवर बसविण्याचा कालिफाचा विचार त्याच्याच सांगण्यावरून झाला असून, तें बहुत सन्मानाचें व आनंदाचें काम केव्हां आपल्या हातून होईल अशी त्यास मोठी उत्कंठा लागून गेली होती. पण ती सर्वच जागच्या जागीं राहून भलताच अनर्थ गुदरला असें पाहून त्याला पराकाष्ठेचा खेद झाला, व तो त्याच पावलीं बगदादेस परत जावयास निघाला.

वजीर आणि तो स्वार हे दोघे बरोबरच बगदादेस परत आले, व तसेच राजवाड्यांत परत गेले. त्यांच्या चर्या पाहून, ह्यांनीं कांहीं तरी दुःखकारक वर्तमान आणिलें आहे असें कालीफ अगोदरच समजला. मग तो मोठ्या उतावळीनें वजिरास ह्मणतो, 'कायरे बाबा! तूं लौकरसा आलास ? तिकडची काय खबर आहे ? जाफर उत्तर

करितो, 'राजाधिराज, मी आपणांस जें अनिष्ट वर्तमान सांगणार तशा प्रकारचें वर्तमान आज आपल्याला कळेल असें आपल्या ध्यानीं मनीं देखील नसेल! महाराज, ज्याकरितां मी गेलों त्या कामाचा सर्व अध्यायच आटपला! अबुल कासीम हा थोड्या दिवसांपूर्वीं एकाएकीं परलोकवासी झाला!' जाफर याच्या तोंडचे हे शब्द ऐकून कालिफास कसें वाटलें असेल याची कल्पनाच केली पाहिजे! त्यानें धाडकन् तक्तावरून उडी टाकिली, आणि कांहीं वेळ तसाच जमिनीवर निचेष्ट पडला. दरबारचे लोक लागलेच धांवून गेले, व त्यांनीं त्यास उठवून त्याच्या मस्तकावर पाणी शिंपडलें. मग अंमळशानें तो जरा देहभानावर आल्यावर, बसऱ्याहून परत आलेल्या सांडणीस्वाराकडे त्याचें लक्ष गेलें. तेव्हां 'सुलतानानें पत्राचा जबाब काय दिला आहे?' असें त्यानें विचारतांच स्वारानें आणलेला लखोटा त्याजपुढें ठेविला. तो फाडून त्यांतील मजकूर त्यानें दोन तीनदां लक्षपूर्वक वाचला. नंतर जाफर यास घेऊन तो एकांतीं गेला, व त्यासही आणखी सुलतानाचें पत्र वाचावयास सांगून ह्मणाला, 'काय हो, असें होणें अगदीं अशक्य दिसतें! मला तर सुलतानाची ही सर्व लबाडी असावी असा तर्क होतो. मला वाटतें, आपला अधिकार जाईल ह्मणून त्यानें कांहीं कपटयुक्तीनें अबुल कासीम यास मारून टाकलें असावें.' जाफर ह्मणतो, 'हो, माझ्याही मनांत तोच अंदेशा आलेला आहे, व या गोष्टीचा पक्का तलास लागण्यासाठीं प्रथम सुलतान व त्याचा वजीर या दोघांस कामावरून काढून कैदेंत ठेवावें असें मला वाटतें.' कालीफ ह्मणतो, 'खरोखर माझ्याही मनांत तेंच आलेलें आहे. आणि तें काम तुह्मींच स्वतः केलें पाहिजे. तुह्मी दहा हजार स्वार बरोबर घेऊन ताबडतोब बसऱ्यास जा, आणि त्या दोघांस कैद करून माझ्या समोर आणा, ह्मणजे या प्रकरणाचा मी पुरता छडा लावून त्या अत्यंत थोर, उदार व निरपराध मनुष्याचा नाहक त्यांनीं जीव घेतल्याबद्दल त्यांस मी योग्य शासन करतों.' कालिफाच्या हुकुमाप्रमाणें जाफर यानें लागलेच बरोबर दहा हजार स्वार घेऊन बसऱ्याकडे कूच केलें.

आतां इकडे अबुल कासीम हा पेटींतून कसा नाहींसा झाला ती हकीकत चालवूं. बसऱ्याच्या सुलतानाचा वजीर त्यास पक्क्या बंदोबस्तांत ठेवून घरीं निघून गेला, येथपर्यंत पूर्वी हकीकत सांगितलीच आहे. पुढें कांहीं वेळानें, तेथें कोणी येऊन पहिल्याप्रमाणेंच आपणास पेटींतून काढीत आहे असें अबुल कासीम यास दिसलें. तेव्हां आणखी आपला छळ करण्यास वजीर व त्याचे गुलाम आले असें समजून तो ह्मणतो, 'अरे मांगांनो, तुमच्या अंगीं मनुष्यत्व जर कांहीं वास करीत असेल तर माझा जीव एकदम घेऊन टाका! कारण मी तुह्मांला खचीत सांगतों कीं, ज्याकरितां या भयंकर यातना तुह्मी मला भोगावयास लावीत आहां, तें आपलें गुप्त भांडार मी तुह्मांस कांहीं केलें तरी दाखविणार नाहींच नाहीं!' तें ऐकून जो मनुष्य त्याला पेटींतून काढीत होता तो त्यास ह्मणतो, 'अरे भल्या गृहस्था, तूं भिऊं नको. मी जो कोणी एथें आलों आहें तो तुला दुःख देण्याकरितां आलों नाहीं, तर तुझी या यातनांतून सुटका करून तुला सुख देण्याकरितां आलों आहे.' इतक्यांत त्या मनुष्यानें अबुल कासीम यास पेटीच्या बाहेर काढून बसविलें. तेव्हां त्यानें आपणांस संकटसमयीं साहाय्य करण्यास कोण आलें आहे ह्मणून पाहण्याकरितां वर दृष्टि केली. तों तेथें जीं कांहीं मनुष्यें होतीं, त्यांत एक अत्यंत सुंदर व तरुण स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. ही स्त्री जिला कांहीं दिवसांपूर्वी आपण आपलें भांडार दाखविलें होतें ती अबुल फत्ता याची कन्या बाल्किस् ही होय, असें त्यानें तत्काळ ओळखिलें. तिला तो ह्मणतो, 'तुह्मीं का मला हें आज प्राणदान दिलें ?' बाल्किस् ह्मणते, 'हो, मीच तुमची ही संकटाची वार्ता ऐकून माझे प्रियकर अलीसाहेब यांस घेऊन धांवत येथें आलें. हे पहा ते येथें उभेच आहेत. तुमची थोरवी माझ्या मुखानें त्यांना कळल्यावरून तुह्मांस मृत्यूच्या दाढेंतून सोडविण्यासाठीं ते मोठ्या आनंदानें मजबरोबर आले आहेत.' इतक्यांत अली ह्मणतो, 'हो, असेंच खरें. तुमच्याविषयीं माझ्या मनांत इतकी पूज्य बुद्धि उत्पन्न झाली

आहे कीं, अशा मनुष्याच्या संरक्षणांत आपला जीवही खर्ची पडला तरी हरकत नाहीं, असा मीं आपल्या मनाचा निश्चय केला आहे !'

थोड्या वेळानें अबुल कासीम यास, त्यांनीं बरोबर कांहीं आणलें होतें तें खाऊं घातल्यावर त्याला अंमळ हुशारी आली. त्यानें त्यांस विचारिलें, 'मी अद्यापि जिवंत आहें हें तुह्मांस कसें समजलें ?' बाल्किस् ह्मणते, 'तुमच्या मरणाची वार्ता जी चोहोंकडे पसरली ती सारी माझ्या बापाची लबाडी असावी असें मला वाटल्यावरून, त्याजबरोबर जे दोघे गुलाम स्मशानांत राहिले होते त्यांपैकीं एकाला मीं मथवून सर्व हकीकत समजावून घेतली, आणि कबरस्थानाची किल्ली जी त्याच्या ताब्यांत होती, ती मोठ्या युक्तीनें आपल्या हस्तगत करून घेतली. नंतर मीं अलीसाहेब यांस हें सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां ते आपले कांहीं विश्वासू लोक बरोबर घेऊन मजकडे आले, व आह्मी सर्वजण तशींच निघून येथें आलों. आह्मी अगदीं वेळेवर येऊन तुह्मांस उपयोग झाला ह्याबद्दल परमेश्वराचे आह्मांवर—व त्यांत विशेषतः मजवर-मोठेच उपकार आहेत, असें मी समजतें.'

हें ऐकून अबुल कासीम अत्यंत आश्चर्यभरित होऊन ह्मणतो, 'अहाहा ! अबुल फत्ता सारख्या निर्दय व नीच मनुष्याच्या पोटीं असलें अमोलिक रत्न निपजलें हें केवढें नवल आहे !' मग अली त्यास ह्मणतो, 'साहेब, आतां बोलून वेळ दवडण्याचा हा प्रसंग नव्हे. या कृत्याचा सुगावा कदाचित् वजिरास लागला तर मोठा अनर्थ होण्याचा संभव आहे. याकरितां चला लौकर मजबरोबर तुह्मी. मी आपल्या घरीं तुह्मांस घेऊन जातों. तेथें तुह्मांस कांहीं एक भीति नाहीं; कां कीं, माझ्या येथें तुह्मांला थारा मिळाला असेल असें कोणाच्या स्वप्नींही येणार नाहीं.' मग अबुल कासीम उठल्यावर त्यांनीं त्यास गुलामाचा वेष दिला, व तीं सर्व माणसें तेथून निघालीं आणि शहरांत आलीं. बाल्किस् हिनें घरीं येतांच गुलामास ती कबरस्थानाची किल्ली परत दिली, व इकडे अली हा अबुल कासीम यास घेऊन आपल्या घरीं गेला. याप्रमाणें सर्व काम बेमालूम पार पडून अबुल कासीम याच्या जिवावरचें संकट टळलें.

[ दिवस पन्धरावा. ]

अबुल कासीम हा अली याच्या घरीं बरेंच दिवस राहिला, व अली यानें त्यास मोठ्या सत्कारानें व प्रेमानें बागविलें. मग थोड्या दिवसांनीं सुलतान व वजीर यांची अबुल कासीम याचा शोध लागण्याविषयीं निराशा झाल्यावर अली यानें त्यास मोहोरांचे कांहीं तोडे व बहुमोल जवाहीर दिले, व त्यास एका मोठ्या उत्तम आरबी घोड्यावर बसवून रात्रीं शहराबाहेर नेऊन पोहोंचविलें. तो त्यास ह्मणाला, 'आतां तुह्मी खुशाल वाटेल तिकडे जा. तुमच्या शत्रूंना तुमचें काय झालें हें कांहीं माहीत नाहीं; कां कीं, तुमच्या शोधाची आशा त्यांनीं अगदीं सोडून दिली आहे.' अबुल कासीम यानें अली याचे मोठे उपकार मानले, व तुह्मी आणि तुमची प्रियकरीण यांचा मला जिवांत जीव आहे तोंपर्यंत विसर पडावयाचा नाहीं,' असें त्यास ह्मटलें. मग त्या दोघांनीं एकमेकांस मोठ्या प्रेमानें आलिंगिलें, व माझ्या ह्या उदार मित्रास परमेश्वर सुखरूप पार नेवो !' असें ह्मणून अली हा परतला.

अबुल कासीम यानें बगदादचा रस्ता धरिला, व थोडक्याच दिवसांत तो तेथें सुरक्षित पोहोंचला. तेथें गेल्यावर तो प्रथमतः, थोरल्या बाजारांत सायंकाळीं व्यापारी मंडळी जमण्याचें जें मोठें ठिकाण होतें त्या ठिकाणीं गेला. असें करण्याचा त्याचा हेतु हाच कीं, येथला जो व्यापारी बसरा येथें आपल्याकडे आला होता, व ज्याशीं आपलें सख्य जमून ज्यास आपण आपलें भांडार दाखविलें होतें, त्याला आपल्यावर आलेल्या ह्या संकटाची सर्व हकीकत सांगावी. पण तो व्यापारी ह्मणजे कालीफच होता हें ह्याला कोठें माहीत होतें? तो त्याला अर्थातच कोठें आढळला नाहीं. यामुळें त्याला मोठी खुरखुर लागून राहिली. तो ज्याच्या त्याच्या तोंडाकडे पाही, पण त्या व्यापाऱ्याच्या तोंडावळ्यासारखा तोंडावळाही त्याच्या दृष्टीस पडेना! शेवटीं एके दिवशीं कंटाळून तो कालिफाच्या वाड्यासमोरच एका घराच्या ओट्यावर बसला असतां, बसरा एथें कालिफास त्यानें जो हुजऱ्या नजराण्याबरोबर दिला होता, तो

सहज राजवाड्याच्या खिडकींत आला असतां त्याची नजर याच्याकडे जाऊन, त्यानें त्यास ओळखिलें. तेव्हां तो लागलाच कालिफाकडे जाऊन त्यास ह्मणाला, 'महाराज, माझा बसरा एथील पूर्वींचा धनी एथें इतक्यांत माझ्या दृष्टीस पडला!'

कालीफ यास त्या हुजऱ्याचें बोलणें खरें वाटेना. तो त्यास ह्मणतो, 'तुला उगीच तो भास झाला असेल. अरे, अबुल कासीम जिवंत आहे कोठें? त्याच्यासारखा दुसरा कोणी मनुष्य तूं पाहिला असशील.' हुजऱ्या ह्मणतो, 'छे छे! महाराज, असें कसें होईल? मी बहुत दिवस त्यांच्या पदरीं असून इतकी का मला भूल पडेल, कीं भलता एकादा मनुष्य पाहून मी फसेन?' इतकें तो बोलला तरी कालिफाचा त्याच्या बोलण्यावर विश्वास बसेना. तरी पण हा काय ह्मणतो याची चौकशी करावी असें त्यास वाटलें. तेव्हां त्यानें त्या हुजऱ्यावरोबर दुसरा एक मनुष्य देऊन पुनः त्यास नीट पाहून येण्यास सांगितलें. अबुल कासीम हा तसाच तेथें होता. कारण हुजऱ्याची ज्या वेळेस त्याजकडे नजर गेली त्या वेळेस त्यानेंही हुजऱ्यास पाहिलें होतें. तेव्हां त्यालाही आपला हा पूर्वींचा हुजऱ्या असावा असें वाटून तो पुनः खिडकीपाशीं येईपर्यंत तसाच तिकडे लक्ष देत राहिला होता.

पण इकडे तो हुजऱ्या कालिफाच्या सांगण्यावरून अबुल कासिम याजकडे जेव्हां गेला, तेव्हां अबुल कासीम यानें त्यास लागलीच ओळखिलें, व हुजऱ्याला तर त्याविषयीं शंकाच नव्हती, यामुळें अबुल कासिमाच्या जवळ येतांच त्यानें त्याजपुढें लोटांगण घातलें. अबुल कासीम यानें त्यास उठविलें, आणि विचारिलें, 'कायरे, तूं कालीफ महाराजांकडे असतोस कीं काय?' तो उत्तर करितो, 'होय महाराज, त्यांच्याकडेच मी असतों; व बसरा एथें ज्या पाहुण्याचा आपण कांहीं दिवसांपूर्वीं मोठा सत्कार केला, ते प्रत्यक्ष कालीफ महाराजच निराळ्या वेषानें आपणाकडे आलेले होते. त्यांसच आपण मला नजर केलें व तेव्हांपासून त्यांच्या चरणांपाशीं मी आहें. मी आपणांला त्यांच्याकडे घेऊन जातों. आपल्या भेटीपासून त्यांस ख-

चींत फार आनंद होईल.' हें त्या हुजऱ्याचें बोलणें ऐकून अबुल कासीम यास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें, व तो हुजऱ्या आणि त्याज-बरोबरचा मनुष्य यांच्या मागोमाग तो वाड्यांत गेला. त्या दोघांनीं त्यास लागलेंच कालिफाच्या समोर नेलें. त्याला पाहून कालिफाच्या मनाची फारच विलक्षण स्थिति झाली. तो कोचावर बसला होता तसाच उठला, आणि कांहीं शुद्धींत व कांहीं भ्रमांत जसा एकादा मनुष्य असतो, तसा क्षणभर अबुल कासिमाकडे टक लावून उभा राहिला. नंतर एकदम त्यास त्यानें अशी घट्ट मिठी मारली कीं, जन्मांत त्यानें असें गाढ आलिंगन कोणास दिलें नव्हतें! त्याला हर्षातिशय इतका झाला कीं, कांहीं वेळ त्याच्या तोंडांतून शब्दही निघेना!

मग थोड्या वेळानें अमळ देहभानावर येऊन कालीफ अबुल कासीम यास ह्मणतो, 'अरे माझ्या प्रिय सख्या, मला ओळखलेंस काय? बसरा येथें तूं आपल्या घरीं ज्याचें येवढें आदरातिथ्य केलेंस, व राजांनाही जे देण्याचें सामर्थ्य नाहीं असे बहुमोल नजराणे ज्यास दिलेस, तो मीच बरें!' हें ऐकून अबुल कासीम जिवंत असल्याचें कालिफास जसें नवल वाटलें, तसेंच अबुल कासिमासही कालिफाच्या बोलण्याचें नवल वाटलें! नंतर तो त्याजकडे लक्षपूर्वक पाहून व सर्व गोष्टींची आठवण करून अत्यंत गहिंवरानें ह्मणतो, 'अहो सद्धर्मप्रतिपालक महाराजाधिराज, मोठमोठ्या भाग्यवंतांना सुद्धां आपल्या चरणरजांचें दर्शन घडणें दुर्लभ, असें असतां आपण या क्षुद्र दासाच्या घरीं पायधूळ झाडण्याची कृपा केली हें केवढें तरी माझें भाग्य! महाराज, येवढा मज गरिबावर अनुग्रह करण्याचें आपल्या मनांत आलें तरी कसें?' असें ह्मणून त्यानें कालिफाच्या पायांवर लोळण घातली. कालिफानें त्यास आपल्या हातांनीं उठविलें, आणि आपल्या शेजारीं कोचावर बसविलें.

नंतर कालीफ अबुल कासिमास ह्मणतो, 'अहो, तुह्मी अद्यापि जिवंत आहां हें कसें? मला तर हें केवळ गौडबंगाल भासत आहे!' त्यावरून अबुल कासीम यानें अबुल फत्ता वजीर याच्या अत्यंत नीच व दुष्ट कृत्यांची सर्व कच्ची हकीकत सांगितली. कालिफानें

ती लक्षपूर्वक ऐकून ह्मटलें, 'हीं सर्व संकटें तुह्मांवर येण्यास मीच परंपरेनें कारणीभूत झालों आहें. कारण मीं बगदादेस परत आल्यावर तुमचे उपकार फेडण्याच्या हेतूनें तुह्मांस बसऱ्याचें राज्य देण्याविषयीं इकडून हुकूम पाठविला तो एकीकडे ठेवून, सुलतान व अबुल फत्ता यांनीं एकमत होऊन तुमचा जीव घेण्याचा बेत केला होता असें दिसतें. खरोखर, त्यांनीं तुह्मांस तेव्हांच्या तेव्हांच मारून टाकलें असतें! परंतु तुमच्याकडून तें भांडार हस्तगत करून घेण्याच्या आशेनें त्यांनीं तुह्मांस लगेच ठार मारलें नाहीं. असो; त्यांच्या कृतीचें फळ त्यांना मिळाल्यावांचून राहणार नाहीं. त्याची तजवीज मीं जाफर यास पाठवून आधींच केली आहे. आतां थोडक्याच दिवसांत जाफर हा त्या दोघांस कैद करून येथें घेऊन येईल, तोंपर्यंत तुह्मी मेहेरबानी करून माझ्या येथें रहा, व मजकडून पाहुणचार घ्या.

याप्रमाणें बोलून कालिफानें अबुल कासीम यास हातीं धरून आपल्या थोरल्या बागेंत नेलें. तेथील नानाप्रकारचीं अत्यंत फुलझाडें, वेली, फारच चमत्कारिक तऱ्हेनें उडणारीं कारंजीं वगैरेंची अप्रतिम शोभा पाहून अबुल कासीम याचें अंतःकरण गारीगार होऊन गेलें. त्या बागेच्या मध्यभागीं काळ्या संगमरवरी पाषाणाच्या फारच उंच अशा बारा खांबांवर एक अत्यंत रमणीय असा चंदनी महाल होता. ज्यावर हा महाल होता त्या बारा खांबांमधून सोन्याच्या तारांच्या दुहेरी जाळ्या असून त्यांमधून त्याच तारांचे पडदे घालून सभोंवार शेंकडों पिंजरे तयार केलेले होते. त्या पिंजऱ्यांतून नानाप्रकारचें सुंदर गायन करणारे पक्षी ठेविलेले असल्यामुळें त्यांच्या त्या एकवटलेल्या चमत्कारिक व गोड आवाजानें ऐकणाराचें अंतःकरण फारच प्रसन्न होत असे.

महालाच्या खालच्या बाजूस, ह्मणजे त्या बारा खांबांच्या व त्यांच्या मधील जाळ्यांच्या आंतले बाजूस कालिफाचा हमामखाना होता. त्या हमामखान्यांत कालीफ व अबुल कासीम यांनीं स्नान केलें. तेव्हां त्यांस नेसण्याकरितां अत्युत्तम अशीं नवीं मलमलीचीं

वस्त्रें नोकरांनीं आणून दिलीं. मग कालिफाच्या हुकुमावरून त्याच्याच सारखा उंची पोषाख अबुल कासीम याजकरितां जो आणिला होता, तो त्यानें घातल्यावर कालिफानें त्यास वरील महालाच्या दिवाणखान्यांत नेलें. तेथें भोजनाची तयारी झालेली होती. उभयतांनीं भोजन करून फळफळावळ खाल्ली, व मद्य प्राशन केलें. ती फळफळावळ व मद्य हीं इतकीं उत्तम होतीं कीं, त्याहून वरचढ प्रतीचे तसले जिन्नस साऱ्या पृथ्वींतही मिळण्यासारखे नव्हते. यानंतर कालीफ हा अबुल कासीम यास जुबैदी राणीच्या महालांत घेऊन गेला.

राणी ही मोठ्या भव्य सिंहासनावर बसली असून तिच्या दोहीं बाजूंस दोन रांगांनीं तरुण व रूपवती अशा कित्येक दासी उभ्या होत्या. त्यांपैकीं कित्येकांच्या हातांत विणे व कांहींच्या हातांत सारंग्या वगैरे वाद्यें होतीं. हे दोघेजण गेले त्या वेळेस त्या दासी गाणेंबजावणें कांहीं एक करीत नव्हत्या, तर फक्त त्यांच्यांतच जी एक सर्वांहून सुंदर अशी होती ती तेवढी मधुर स्वरानें करुणरसयुक्त असें एक गाणें गात होती. तें ऐकून सर्वजणी तटस्थ राहिल्या होत्या. त्या गाण्याचा भावार्थ असा होता—

"स्त्रीपुरुषांचें परस्परांवर । प्रेम खरें जें वसे निरंतर ।
" प्राण गेलिया मात्रचि अंतर । पडतें ज्यामाजीं. ॥"

जुबैदी ही कालीफ व अबुल कासीम यांस पाहून सिंहासनावरून खालीं उतरून त्या दोघांस सामोरी गेली. कालीफ तीस ह्मणतो, 'प्रिये, मीं आपले हे बसऱ्याचे पाहुणे तुझ्या भेटीस आणले आहेत.' तेव्हां अबुल कासीम यानें राणीस साष्टांग नमस्कार घातला. हें होत आहे इतक्यांत त्या उभ्या असलेल्या दासी एकाएकीं घाबरून जाऊन त्यांची मोठी गडबड उडाली. कारण जी दासी गात होती तिची नजर अबुल कासिमावर जातांच तिनें मोठ्यानें गळा काढला, व ती एकदम बेशुद्ध पडली.

[ दिवस सोळावा. ]

तेव्हां कालीफ व जुबैदी राणी हीं घाबऱ्या घाबऱ्या त्या दासीकडे पाहूं लागलीं असतां अबुल कासीम हा उठून उभा राहिला; पण

त्याची त्या दासीकडे नजर जातांच तोही तिच्याप्रमाणेंच मूर्च्छित होऊन पडला. त्याची इतकी कठिण अवस्था झाली कीं, त्याचे डोळे पांढरे झाले, तोंड सुकलें, व यामुळें, इतक्यांत त्याचा प्राण जातो कीं काय असें सर्वांस वाटलें ! कालिफानें त्यास पोटाशीं धरिलें, व वारा वैगेरे घालून थोडक्या वेळानें कांहींसें शुद्धीवर आणिलें.

याप्रमाणें अबुल कासीम जरा देहभानावर आल्यावर ह्मणतो, ' सद्धर्मप्रतिपालक महाराज, मीं आपली हकीकत या चरणांपाशीं कथन करितांना केरो येथें घडलेली गोष्ट आपणांस सांगितली ती आपल्या स्मरणांत असेलच. महाराज, ज्या स्त्रीसह केरो येथील सुलतानाच्या हुकुमावरून नीलनदीमध्यें मला लोटून दिलें, तीच ही निचेष्टित पडलेली दार्दानी होय !' हें ऐकून कालीफ आश्चर्यचकित होऊन ह्मणतो, ' खरेंच का ? तर मग या विलक्षण रीतीनें घडून आलेल्या योगाबद्दल आपण परमेश्वराचे किती आभार मानावे हें मला समजत नाहीं !'

इतक्यांत इकडे ती मूर्च्छित पडलेली दासीही आपल्या सोबतिणींच्या साहाय्यानें अंमळ शुद्धीवर आली. ती उठून कालिफाच्या पायांवर लोटांगण घालीत होती, पण त्यानें तीस तसें न करूं देतां ह्मटलें, 'काय गे, तुला नदींत टाकिलें असतां तूं जिवंत राहून येथें कशी आलीस याचें मला फारच नवल वाटतें !' ती ह्मणते, 'राजाधिराज, मी नदींत पडतांच एका कोळ्याच्या जाळ्यांत सांपडलें, व सुदैवानें तो त्याच वेळेस जाळें ओढीत होता यामुळें मी जिवंत वर आलें. मला पाहून त्याला पराकाष्ठेचें नवल वाटलें. मला यत्किंचित् धुगधुगी आहे असें दिसून येतांच तो मला आपल्या घरीं घेऊन गेला. मग त्यानें पुष्कळ उपाय करून मला चांगली सावध केल्यावर मीं त्यास आपला इत्थंभूत वृत्तांत सांगितला. तो ऐकून तो कोळी पराकाष्ठेचा घाबरून गेला. त्याला भय पडलें कीं, हिला वांचविण्यास आपण कारणीभूत झालों ही गोष्ट जर सुलतानाच्या कानावर गेली तर तो एकदम आपला शिरच्छेद करील ! ह्मणून त्यानें कोणासही ही गोष्ट न कळवितां, तितक्यांत एक व्यापारी बगदा-

देस येत होता, त्यास गुपचिप रीतीनें मला विकून टाकिलें. त्या व्यापाऱ्यानें मला येथें आणिलें व राणीसाहेबांस नजर केलें. त्यांनीं त्यास मजबद्दल चांगलें बक्षीस देऊन मला ठेवून घेतलें, व तेव्हांपासून मीं येथेंच आहें.'

त्या दासीचें बोलणें चाललें असतां कालिफाचे डोळे एकसारखे तिजकडे लागून राहिले होते. तेव्हां ती खरोखरच परम रूपवती आहे असें पाहून तो अबुल कासीमास ह्मणतो, 'अबुल कासीमजी, या स्त्रीच्या विरहानें तुह्मी एकसारखे झुरत आहां याबद्दल मला आतां आश्चर्य वाटत नाहीं, कां कीं, ती तशीच लोकोत्तर रूपवती आहे. ती मजपाशीं यावी असा योग परमेश्वरानें आणिला याबद्दल मी त्याचे परम आभार मानितों. दोस्तसाहेब, इतःपर ही दार्दानी माझी दासी नाहीं. तिला मीं आपल्या दास्यांतून मुक्त केलें आहे.' मग जुबैदी राणीकडे वळून ह्मणतो, 'प्रिये, तूंही पण मजप्रमाणेंच तिला मुक्त करण्यास नाखुष नसशील अशी माझी खात्री आहे.' राणी ह्मणते, 'महाराज, मी नाखुष नाहीं इतकेंच नाहीं, तर त्या गोष्टीचा मला मोठा आनंद वाटत आहे, व अनेक प्रकारचीं संकटें भोगून बहुत दिवसांनीं एकमेकांस भेटलेल्या या आषकमाषुकांना जन्मभर उत्तम सुख प्राप्त व्हावें अशी माझी मनापासून इच्छा आहे.'

कालीफ ह्मणतो, 'माझ्या मनांत याहूनही ज्यास्त आहे. आपल्या वाड्यांत मी या दोघांचें लग्न लावून देऊन त्यानिमित्त सर्व शहरांत तीन दिवसपर्यंत उत्सव करण्याविषयीं हुकूम करणार. इतकेंही करून ह्मणजे मी आपल्या मित्राचा उतराई होईन असें तर नाहींच, पण—' इतक्यांत अबुल कासीम कालिफाच्या पायांवर लोटांगण घालून ह्मणतो, 'अहाहा! महाराज, म्यां पामरानें आपली थोरवी काय वर्णावी! पण खरोखरच, इतर सर्व मनुष्यांपेक्षां जशी आपली पदवी मोठी आहे, तसेंच पण आपलें औदार्यही मोठें आहे यांत संशय नाहीं. महाराज, मला आपलें सर्व भांडार या चरणाचे सेवेस अर्पण करण्याविषयीं परवानगी द्या ह्मणजे मी कृतकृत्य होईन.' कालीफ ह्मणतो, 'छी छी! तसें मुळींच होणार नाहीं. तुह्मी आ-

पल्या संपत्तीचा यथेच्छ उपभोग घ्या. माझा तीवर यत्किंचितही वारसा नसतां मी ती कशी घेऊं हें तुह्मीच सांगा बरें ?'

यानंतर जुबैदीराणीनें अबुल कासीम व दार्दानी या उभयतांची सर्व हकीकत त्यांच्या तोंडून ऐकिली, व ती सोन्याच्या शाईनें लिहून दप्तरीं ठेवण्याविषयीं कालिफाकडून दरबारचे लोकांस हुकूम करविला. पुढें कालिफानें त्या उभयतांच्या लग्नाची तयारी करविली, व तो समारंभ फारच मोठ्या थाटानें झाला. नंतर शहरांत जिकडे तिकडे फारच मोठा उत्सव चालला असतां जाफर हा बसऱ्याच्या सुलतानाचा वजीर अबुल फत्ता या एकट्यासच बिड्या घालून सैन्यासह परत आला; कां कीं, बसऱ्याच्या सुलतानास अबुल कासिमाचा शोध न लागल्यामुळें तो पराकाष्ठेचा दुःखी झाला, व त्यांतच थोडक्या दिवसांत त्याचा अंत झाला.

जाफर यानें कालिफास आपण बजावलेल्या सर्व कामगिरीची हकीकत सांगितल्यावर, कालिफानें राजवाड्यासमोर वधस्तंभ उभा करवून त्यावर, अबुल फत्ता याचा शिरच्छेद करण्याविषयीं हुकूम केला. त्याच्या नीचपणाची व निर्दयतेची हकीकत सर्व लोकांस कळलेली असल्यामुळें त्याची कोणास दया आली नाहीं इतकेंच नाहीं, तर त्या दुष्टाचा वध झालेला आपण केव्हां पाहूं अशी त्यांस उतावळी झाली होती. अबुल फत्ता यास वधस्तंभावर चढविलें, व वध करणारा कामगार हातांत तरवार घेऊन त्याचें डोकें उडविणार, इतक्यांत अबुल कासीम यानें कालिफास साष्टांग नमस्कार घालून ह्मटलें, 'सद्धर्मप्रतिपालक महाराज, इतर कोणाकरितां नाहीं तरी एकट्या माझ्याकरितां अबुल फत्ता याचा जीव वांचवा. महाराज, त्याला वांचूं द्या, आणि आपली मजवर झालेली कृपा व माझें सौख्य हीं त्यास पाहूं द्या, ह्मणजे तेंच त्यास मरणापेक्षां मरण होईल !'

हें अबुल कासीम याचें भाषण ऐकून, याची थोरवी किती तरी वर्णावी असें कालिफास झालें, व त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रु चालले. तो अबुल कासीम यास ह्मणतो, ' अहाहा ! मित्रा, केवढी तुझी योग्यता ! तुझ्यासारखा दयाळू राजा बसऱ्याच्या लोकांस मिळणार हें

केवढें त्यांचें भाग्य समजावयाचें !' हें ऐकून अबुल कासीम ह्मणतो, 'राजाधिराज, या पायांपाशीं मला आणखी एक गोष्ट मागावयाची आहे. ती ही कीं, जें राज्य आपण कृपाळू होऊन मला देऊं इच्छितां, तें मला न देतां राजपुत्र अली यास द्यावें; व ज्या अलौकिक धैर्यवान् व पवित्र स्त्रीनें दया करून मला वांचविलें, तिच्यासह त्यानें राज्य करावें एवढीच माझी इच्छा आहे. हा मान त्या उभयतांस मिळण्यासारखी त्यांची योग्यता आहे यांत संशय नाहीं. मजविषयीं ह्मणाल तर, महाराजांच्या चरणांची मजवर कृपा असल्यावर मला राज्यच काय करावयाचें आहे ? राजापेक्षांही मी सुखी आहें !'

हें ऐकून कालिफास फार संतोष झाला, व अली हा अबुल कासीम याच्या फार उपयोगीं पडला हें जाणून त्यास त्यानें बसऱ्याचा सुलतान केल्याबद्दल लागलाच हुकूम पाठविला. परंतु अबुल कासीम याच्या विनंतीवरून बसऱ्याचा दुष्ट वजीर अबुल फत्ता याचा जीव जरी त्यानें वांचविला, तरी त्यास अजीबात सोडून देणें योग्य नाहीं असें ह्मणून त्यानें त्यास जन्मभर किल्ल्यावर अंधारकोठडींत कैदेंत राहण्याची शिक्षा दिली. याप्रमाणें अबुल कासीम यानें अबुल फत्ता याचा जीव वांचविला हें त्याचें लोकोत्तर औदार्य बगदादच्या लोकांच्या कानीं गेल्यावर तर त्यांनीं त्याची जी वाहवा केली ती किती ह्मणून सांगावी ! असो; पुढें थोडक्याच दिवसांनीं अबुल कासीम आपल्या प्रियतमेसह कालिफाची रजा घेऊन, त्यानें बरोबर दिलेल्या मोठ्या इतमामानिशीं बसऱ्यास जाऊन पोहोंचला.

---

याप्रमाणें दाईनें अबुल कासीम याची गोष्ट संपविली, तेव्हां तिच्या सर्व दासींनीं तिची मोठी तारीफ केली. कांहींजणींनीं अबुल कासीम याची संपत्ति व औदार्य हीं वाखाणिलीं, व कांहीं ह्मणाल्या कीं, 'कालीफ हरन् अल् रशीद हाही पण अबुल कासीम यापेक्षां कमी उदार होता असें कांहीं नाहीं !' कांहींनीं स्त्रीपुरुषांच्या प्रेमाचा फक्त विचार करून ह्मटलें, 'अबुल कासीम हा त्या स्त्रीवर खरें प्रेम ठेवणारा पुरुष होता यांत संशय नाहीं.' हें ऐकून राजकन्या फरुख्नाज् ही ह्मणाली, 'यांत मात्र तुमचा माझा मतभेद आहे.

कारण मध्यंतरीं बाल्किस् हिच्या सौंदर्यास अबुल कासीम इतका भुलला होता कीं, दार्दानीचा बहुतेक त्याला विसर पडण्याचा प्रसंग आला होता. तेव्हां मी असें ह्मणतें कीं, नवरा असावा तर असा असावा कीं, ज्या स्त्रीला एकवार त्यानें आपलें अंतःकरण वाहिलें, ती मरण पावली असतां दुसरीवर त्याचें मन कदापि जडूं नये' त्यावरून दाई ह्मणते, 'बाईसाहेब, कांहीं चिंता नाहीं. वाटेल तसले प्रसंग आले तरी कधींही ज्यास आपल्या स्त्रीचा विसर पडला नाहीं, अशा पुरुषांच्या आणखी अनेक गोष्टी मला ठाऊक आहेत. आपली मर्जी असेल तर रझवानशाह पातशाह आणि राजकन्या शेहरिस्तानी यांची गोष्ट मी आपणांला सांगतें, ह्मणजे याविषयीं आपली खात्री होईल.' राजकन्या ह्मणते, 'ठीक आहे. मला ती ऐकण्याची फार इच्छा आहे.' त्यावरून दाई पुढील गोष्ट सांगूं लागली.—

## रझवानशाह पातशाह आणि शेहरिस्तानी राजकन्या यांची गोष्ट.

प्राचीनकाळीं चीन देशामध्यें रझवानशाह या नांवाचा एक पातशाह होऊन गेला. एके दिवशीं तो शिकारीस गेला असतां त्याला एक हरिणी आढळली. तिचा रंग पांढरा असून, मधून मधून तिच्या अंगावर अस्मानी व काळ्या रंगाचे सुंदर ठिपके होते. तिच्या पायांत सोन्याच्या सांखळ्या व पाठीवर पिंवळ्या रंगाची साटीण होती, व त्या साटिणीला चोहोंबाजूंनीं रुपेरी जरीची वेलबुट्टी काढलेली होती.

अशी ती सुंदर व विलक्षण हरिणी पाहून तिला धरण्याविषयीं पातशाहाच्या मनांत फार इच्छा उत्पन्न झाली, व त्यानें आपला घोडा तिला गांठण्याकरितां तिच्या मागें काढला. परंतु ती त्याला झुकांडी देऊन इतकी जलद निघून गेली कीं, तीच केवळ नव्हे तर तिचीं पावलें जमिनीवर लागून उडत असलेली धूळही पातशाहास दिसेनाशी झाली. तेव्हां ही आतां कसची हातीं लागते असें जाणून तो आपल्या नशिबाला दोष देऊं लागला. इतक्यांत पुनः एकदां ती त्याच्या दृष्टीस पडली. या वेळीं ती एका झऱ्याच्या कांठीं गवतावर

बसलेली असून, पळण्याच्या श्रमानें भागल्यामुळें विसांवा घेत आहे अशी दिसली. तेव्हां पातशाहानें तिला धरण्याकरितां पुनः आपला घोडा भरधांव काढला, पण त्याचे श्रम फुकट गेले. कारण तो जवळ आलासें पाहून ती हळूच उठली, व उडी मारून डोहांत शिरली, आणि तत्काळ दिसेनाशी झाली !

[ दिवस सतरावा. ]

हें पाहून पातशाह लागलाच घोड्यावरून खालीं उतरला, व धांवत धांवत जाऊन त्या झऱ्याभोंवतीं कित्येक वेळ फिरला. नंतर तो झऱ्यांत शिरला, व डोहाच्या तळापर्यंत त्यानें काठीनें पाणी हालवून त्या हरिणीचा शोध केला. पण तिचा जेव्हां कोठेंच थांग लागेना, तेव्हां ती न सांपडल्याचे योगानें त्याला खेदापेक्षां आश्चर्यच विशेष वाटलें. त्याच्या बरोबर त्याचा वजीर व दुसरे लोक जे होते, त्यांनाही ह्या गोष्टीचें मोठें नवल वाटलें. या संबंधानें पातशाहानें कांहीं वेळ आपणाशीं विचार करून असा निर्णय केला कीं, ‘आपल्याला जी काय दिसली, ती वास्तविक हरिणी नसावी, तर ती कोणी वनदेवता असून शिकारी लोकांच्या पळण्याची गंमत पाहण्याकरितां तिनें हरिणीचें रूप घेतलें असावें.’ त्याच्या बरोबरच्या लोकांचेंही तसेंच मत पडलें.

याप्रमाणें त्या सर्व मंडळीचे विचार चालले असतां पातशाहाची नजर एकसारखी त्या झऱ्याकडे लागलेली होती. ती गोष्ट त्याच्या मनाला इतकी लागून राहिली कीं, त्याला बिलकुल चैन पडेनासें होऊन तो मोठमोठ्यानें दुःखाचे सुस्कारे टाकूं लागला. तो आपल्या वजिरास ह्मणतो, ‘आज रात्रची रात्र येथेंच राहून त्या यक्षिणीची पाळत राखण्याचा माझा निश्चय झाला आहे; कारण माझी मनोदेवता असें सांगते कीं, ती यक्षिण केव्हां तरी पाण्यांतून निघून माझ्या दृष्टीस पडेल.’ त्यावरून तो व वजीर असे दोघेजण तेथें राहिले, व बाकीच्या सर्वांस त्यांनीं परत पाठविलें. ते दोघेजण बरीच रात्र होईपर्यंत त्या हरिणीच्या संबंधानें गोष्टी बोलत राहिले. नंतर पातशाह दमलेला असल्यामुळें त्याला जरा झोंप घ्यावीशी वाटली.

तेव्हां तो वजिरास ह्मणतो, 'अहो, आतां मला जागवत नाहीं; माझा अंमळ डोळा लागतो आहे, तोंपर्यंत तुह्मी त्या झऱ्याकडे पहात रहा, व जर कांहीं दिसलें, तर मला ताबडतोब जागें करा. पहारा करण्यास आळस मात्र बिलकुल करूं नकाहो!' वजीर हाही फार थकलेला असल्यामुळें जरी त्यास अतिशय झोंप लोटली होती, तरी 'हुकुमाप्रमाणें करितों' असें ह्मणणें त्यास भाग पडलें. त्यानें त्याच्या मर्जीखातर कांहीं वेळ पहारा केला, परंतु झोंपेनें त्याला पराकाष्ठेचें त्रासविल्यामुळें, तिला घालविण्याकरितां त्यानें आपल्याकडून जरी अतिशय खटपट केली, तरी ती फुकट जाऊन शेवटीं त्याला झोंप लागली. हे दोघेजण निजून थोडाच वेळ झाला, तों कांहीं एक प्रकारचा सुंदर आवाज त्यांस ऐकूं येऊन ते दोघेही एकदम जागे झाले. त्या आवाजाचें त्यांना फारच आश्चर्य वाटलें. पण त्याहीपेक्षां समोर त्यांना जो एक मोठा वाडा एकाएकीं दिसूं लागला, त्याचें जें आश्चर्य वाटलें, तें किती ह्मणून सांगावें! या वाड्यांत जिकडे तिकडे दिव्यांचा लखलखाट केलेला असून, तो एवढा मोठा व इतका सुरेख दिसत होता कीं, हें अमानुष कृत्य असलें पाहिजे असें त्यांस सहज वाटूं लागलें.

पातशाह वजिरास ह्मणतो, 'अहो, याला ह्मणावें तरी काय? हा कोणाचा आवाज आपणांला ऐकायाला येत आहे? व हा वाडा एथें कोठून उत्पन्न झाला? वजीर उत्तर करितो, 'महाराज, हा सर्वच कांहीं अद्भुत चमत्कार आहे. महाराज, मला वाटतें, आपण एथें राहिलों नसतों तर बरें होतें. मला अशी धास्ती उत्पन्न झाली आहे कीं, आपणांस पाशांत पाडण्याकरितां कोणा जादुगारानें हें कृत्य केलें असावें.' पातशाह ह्मणतो, 'तें कांहीं असो, पण मी ह्मणजे भिऊन एथून माघारा फिरेन असें कालत्रयीं होणार नाहीं. हं, उठा; धीर धरून माझ्याबरोबर चला. आपण त्या वाड्यांत जाऊन तेथें कोणते लोक आहेत तें पाहूं. मी खचीत सांगतों कीं, जों जों तुह्मी मला भीति घालतां, तों तों मला हें धाडस करण्याचें अधिकच स्फुरण येत आहे.'

वजीर आपल्या धन्याचा अत्याग्रह पाहून त्याच्या इच्छेच्या आड बिलकुल आला नाहीं. मग ते दोघे तेथून उठून वाड्याजवळ गेले, तों त्याचे दरवाजे उघडे असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. ते आंत शिरून एका मोठ्या दिवाणखान्यांत गेले. त्याची जमीन चिनी मातीची उत्तम घोटींव असून भिंतींस किनखापी पडदे लाविले होते, व तेथें बसण्याकरितां उत्कृष्ट तऱ्हेच्या नकशीचीं कोचें ठेविलेलीं असून, जिकडे तिकडे नानाप्रकारच्या सुगंधी अत्तरांचा घमघमाट सुटला होता. त्या दिवाणखान्यांत यांना कोणीही मनुष्य दिसलें नाहीं; सबब तो टाकून ते पलीकडच्या दिवाणखान्यांत गेले. तेथील थाटमाट याहीपेक्षां कांहीं विशेष प्रकारचा असून त्याच्या मध्यभागीं सोनेरी सिंहासनावर एक तरुण स्त्री बसलेली त्यांच्या दृष्टीस पडली. ती अगोदरच पराकाष्ठेची सुंदर असून नानाप्रकारच्या उत्तम व मौल्यवान् अलंकारांनीं भूषित असल्यामुळें तिला पाहतांच या दोघांचे डोळे अगदीं दिपून गेले.

त्या स्त्रीच्या सभोंवतीं पन्नास साठ तरुण व सुंदर स्त्रिया उभ्या असून, त्यांपैकीं कांहीं गात होत्या व कांहीं वाद्यें वाजवीत होत्या. त्या सर्वांचे पोषाख गुलाबी रंगाचे असून, त्यांवर मोत्यांचा फारच सुंदर व दाट कशीदा काढलेला होता. त्यांच्या गाण्याबजावण्याकडे पातशाहाचें मन फार वेधलें, पण त्याहीपेक्षां त्या सिंहासनावर बसलेल्या स्त्रीकडे तर त्याचें मन अतिशयच वेधून गेलें.

त्या उभ्या असलेल्या स्त्रियांनीं पातशाहास पाहतांच आपलें गाणें बजावणें बंद केलें, तेव्हां तो पुढें झाला, व सिंहासनावर बसलेल्या त्या स्त्रीच्या समोर उभा राहून त्यानें तिला मोठ्या अदबीनें मुजरा केला. मग तिला ह्मणतो, 'हे हृदयंगमे, ज्या तुझ्या दर्शनानें चीन देशच्या लोकांवर राज्य करणारा हा पुरुष तुजवर अत्यंत मोहित होऊन तुझा दास होण्यास एका पायावर तयार झाला आहे, त्या तुझें नामाभिधान काय हें कृपा करून सांग.' हें ऐकून ती स्त्री किंचित हंसली, आणि ह्मणाली, 'मी आपली एक यःकश्चित् हरिणी आहें, पण मी सिंहांना बंदींत टाकीत असतें! तुह्मीं जिचा पाठ-

त्याग आज केला, व जी तुह्मांला झऱ्यांत जाऊन दिसेनाशी झाली तीच मी होय.' हें ऐकून पातशाह ह्मणतो, 'पण ह्या गोष्टीचें मला अतिशय नवल वाटतें, व माझें हृदय अगदीं ठिकाणावर नाहीं. मला दिवसास जी दिसली ती हरिणी नसून तूंच हरिणीचें रूप घेतलें होतेंस, हें तरी कशावरून मीं समजावें?' ती उत्तर करिते, 'तुह्मी कांहीं एक शंका मनांत आणूं नका. जें तुह्मी माझें रूप हल्लीं पाहत आहां, तेंच माझें वास्तविक रूप आहे. आतां इतकें खरें कीं, माझी लहर लागेल त्या वेळेस मी हरिणीचेंचसें काय, पण दुसरें वाटेल तें रूप घेऊन लोकांच्या दृष्टीस पडतें, व मनास वाटेल तेव्हां अंतर्धान पावतें. मला वाटेल तें रूप घेतां यावें हा गुण परमेश्वरानेंच जन्मापासून माझ्या अंगीं ठेविला आहे.'

इतकें बोलून ती स्त्री सिंहासनावरून खालीं उतरली, व पातशाहाच्या जवळ येऊन तिनें त्यास हातीं धरिलें, आणि दुसऱ्या एका महालांत नेलें. त्या ठिकाणीं भोजनाचा उत्तम प्रकारें थाट केलेला होता. तिनें पातशाहास व वजिरास भोजनास बसवून त्या दोघांच्या मध्यें आपण बसली. वजिरानें आतांपर्यंत जें काय पाहिलें, त्यावरून आपल्या धन्यास त्यापासून कांहीं तरी अपाय घडणार असें त्याला खास वाटलें.

परंतु इकडे पातशाह त्या स्त्रीच्या ठायीं अगदीं आसक्त होऊन गेला असल्यामुळें, वजिराप्रमाणें त्याच्या मनांत कसलाही किंतु आला नाहीं. वजीर व पातशाह हे दोघे भोजन करीत असतां ती स्त्री तशीच नुसती स्वस्थ बसली होती. पातशाह भोजन करण्याविषयीं तिला आग्रह करूं लागला, तेव्हां ती ह्मणाली, 'मला तें कांहीं नको. तुह्मी आपले दोघे जेवा. आमच्या योनींतील प्राण्यांचें असें आहे कीं, पदार्थांचा नुसता वास घेतल्यानें तुमच्याप्रमाणें यांचें पोट भरून जीवरक्षण होतें.'

[ दिवस आठरावा ]

पातशाह व वजीर या उभयतांचें जेवण आटोपल्यावर दोन तरुण स्त्रियांनीं गोमेदाचे दोन पेले भरून जांभळ्या रंगाचें मद्य त्यांस

त्यावयास दिलें. तें मद्य त्यांनीं प्राशन केल्यावर, त्या स्त्रियांनीं लागलेच पुनः ते पेले भरले, तेही त्यांनीं रिकामे केले. याप्रमाणें कित्येक वेळां होऊन त्यांनीं तें सुंदर मद्य यथेच्छ प्राशन केलें. त्या स्त्रियांनीं आपल्या धनिणीकरितां ह्मणजे त्या यक्षिणीकरितां मद्य आणिलें होतें. पण तिनें न पितां फक्त हुंगलें मात्र. तथापि पातशाह व वजीर यांच्या प्रमाणेंच तिजवरही त्या मद्याचा परिणाम झाला. मग पातशाह त्या मद्याच्या रंगांत आल्यावर त्यानें आषकाच्या आधीन होऊन यक्षिणीस हजारों प्रकारचे प्रश्न केले. तेव्हां तिच्याही अंतःकरणाची त्याच प्रकारची स्थिति होऊन, तिनें त्यास पुढीलप्रमाणें उत्तर दिलें.—ती ह्मणाली, 'महराज, तुह्मां मानवांची योग्यता जरी आह्मांपेक्षां कमी आहे, तरी तुह्मांवर माझी प्रीति जडली आहे, व तिचा अंकुर इतका जोमदार आहे कीं, आतां तो कोमेजण्याची मुळींच शंका नाहीं. सारांश, ज्याअर्थीं मीं आतां सर्वप्रकारें तुमच्या स्वाधीन झालें आहें, त्याअर्थीं तुमच्याशीं मला कोणताही आडपडदा न ठेवितां आपली सर्व हकीकत सांगितली पाहिजे.' असें ह्मणून ती यक्षीण आपली हकीकत पातशाहास सांगूं लागली.

ती ह्मणते,—महाराज, येथून दूर समुद्रांत एक बेट आहे. त्याचें नांव शेहरिस्तान. त्या बेटांत यक्षांची वस्ती असून तेथील राजाचें नांव मनशूर असें आहे. त्या राजास मी एकुलती एक कन्या असून माझें नांव शेहरिस्तानी असें आहे.

सुमारें तीन महिन्यांपूर्वीं माझ्या मनांत असें आलें कीं, आदामाच्या ह्मणजे मानवजातीच्या मूळ पुरुषाच्या संततीनें वस्ती केलेले निरनिराळे देश व तेथील चमत्कार पाहून मनाचें रंजन करावें. तेव्हांपासून मी प्रवास करीत असून आजपर्यंत जगांतलें एकून एक ठिकाण पाहून सोडलें आहे; व आजच परत शेहरिस्तानास जाण्याचा माझा बेत झाला असतां, एकाएकीं तुह्मांला मीं पारध करितांना पाहिलें, त्यावेळीं एकदम माझ्या मनाची कांहीं विलक्षण स्थिति झाली. तुह्मी मला दिसत होतां तोंपर्यंत माझें मन इतकें बावरून गेलें होतें कीं मीं कितीही विवेक केला तरी तें मुळींच आवरेना व

तुमची मी पुरती ताबेदारीण झालें, असें जेव्हां मला दिसून आलें, तेव्हां मी मनांतल्या मनांत फार लज्जायमान झालें. मीं ह्मटलें, 'अरेरे ! आदामाच्या वंशांतल्या यःकश्चित् मनुष्यानें माझें अंतःकरण हिरावून घेऊन माझी अशी दशा करावी काय! धिक्कार असो माझ्या त्या दौर्बल्याला!' असें ह्मणून मी तुमच्या दृष्टीसमोरून नाहींशी होणार होतें,पण माझ्या मनाचें आकलन करण्याची शक्तीच मला न राहून तें जिकडे मला नेईल तिकडे मी जाऊं लागलें. नंतर तुह्मीं माझ्या नादीं लागून माझ्या पाठीमागें यावें ह्मणून मीं सुंदर हरिणीचें रूप घेतलें. त्यावरून तुह्मीं माझा पाठलाग चालविला, व मीं डोहांत उडी टाकिली असतां, तुह्मीं माझा जो चोहोंकडे शोध केला, त्या योगानें माझ्या अंतःकरणास केवळ अवर्णनीय सौख्य झालें. मजप्रमाणेंच तुमचेंही मन माझ्याविषयीं आतुर झालेलें पाहून, मी मोठी दैववान् आहें असें मी मनांत समजलें; आणि तुह्मी सारी रात्र डोहाशेजारींच बसून घालविणार असें जेव्हां मीं ऐकिलें, तेव्हां तर माझ्या आनंदास पारावारच नाहींसा झाला. मग मीं एका क्षणांत तुमच्या स्वागतासाठीं हा येवढा मोठा वाडा व दासी वगैरेंची तयारी केली.

यक्षीण ही आणखी पुढें बोलणार, इतक्यांत एक तरुण स्त्री घाबऱ्या घाबऱ्या तेथें आली. तिची कावरीबावरी व दुःखी मुद्रा पाहून काय अनर्थ घडला कोण जाणे, असें ह्मणून राजकन्या ह्मणजे यक्षीण हिला कांपरें सुटलें व ती मोठ्यानें रडूं लागली. हा सर्व प्रकार पाहून पातशाहास फार विस्मय व खेद वाटला. राजकन्येचें दुःख पाहून त्याला मोठा गहिंवर आला, व त्या दुःखाचें कारण तो तिला विचारूं लागला. इतक्यांत ती आलेली स्त्री राजकन्येस उद्देशून ह्मणते, 'अहो बाईसाहेब, मानवांपेक्षां यक्षांना आयुष्य पुष्कळ असतें, ही गोष्ट खरी आहे तरी मानवांप्रमाणेंच मरण हें केव्हांना केव्हां त्यांच्या पाठीमागें लागलेंच आहे. बाईसाहेब, आमचे महाराजांनीं ह्मणजे आपले वडिलांनीं या विनाशी जगास सोडून अविनाशी जें जग ह्मणजे स्वर्ग त्याची वाट धरिली. त्यांच्या मागें त्यांचें राज्य चालविण्यास तुह्मीं त्वरित निघून यावें ह्मणून तुमची सर्व प्रजा

मोठ्या उत्सुकतेनें तुमची मार्गप्रतीक्षा करून राहिली आहे. त्यांचे मुख्य प्रधान ह्मणजे माझे वडील यांनीं मला हा निरोप आपणास कळविण्यास मुद्दाम पाठविलें आहे, तर आपण आतांच्या आतांच आपल्या राज्यांत येऊन सर्व लोकांचें समाधान करा. विलंब अगदीं करूं नका.'

राजकन्या ह्मणते, 'मैमुना, (हें त्या आलेल्या स्त्रीचें नांव होतें,) पुरे आतां मी सर्व समजलें. तुझ्या वडिलांनीं माझी एवढी काळजी घेतली, व तूं मोठ्या आस्थेनें मजकडे निरोप घेऊन आलीस, हे तुमचे मजवर मोठेच उपकार झाले. हे तुमचे उपकार मी फेडिल्या-वांचून राहणार नाहीं. असो; ही मी आतां तुझ्याबरोबर तिकडे या-वयास निघालें.' असें ह्मणून ती पातशाहाकडे वळून ह्मणते, 'महाराज, येतें तर आतां.' असें ह्मणून तिनें आपला गोंडस हात त्याजकडे केला. त्याचें त्यानें मोठ्या प्रेमानें चुंबन केल्यावर ती ह्मणते, 'महा-राज, मला आतां गेल्यावांचून गत्यंतरच नाहीं; पण ज्या दिवशीं आपण एकमेकांस भेटूं, असा एकादा दिवस येईलच येईल, या-विषयीं खात्री असूंद्या; व त्यावेळीं जर मला आढळून आलें कीं, तुमचें मजवर अव्याहत प्रेम असून तुह्मी आपल्या प्राणापलीकडे मला मानतां, तर मग तुह्मांहून अन्य पुरुषास मी कदापि वरणार नाहीं.'

असें ह्मणून यक्षीण अदृश्य झाली. तों लागलीच तेथला दि-व्यांचा लखलखाट नाहींसा होऊन जिकडे तिकडे अंधारमय झालें. तेव्हां निरुपायास्तव पातशाह व त्याचा वजीर यांना उजाडपर्यंत तसेंच तेथें रहावें लागलें. उजाडल्यावर आणखी निराळाच आश्चर्यकारक प्रकार त्यांस दिसला. तो असा कीं, त्यांना जें वाटलें होतें कीं, आपण आतांपर्यंत वाड्यांतच आहों, तो वाडाबिडा तेथें कांहीं एक नसून चोहोंकडें सर्व निर्जन अरण्य त्यांना दिसलें.

तेव्हां पातशाह वजिरास ह्मणतो, 'अहो, आतांपर्यंत जो हा प्रकार आपणांस दिसला, तें सर्व स्वप्न तर नसेलना?' वजीर ह्मणतो, 'स्वप्न तर खास नव्हे. पण मला वाटतें, हें सर्व गौडबंगाल असावें. महा-राज, जी स्त्री आपण पाहिली, तिजविषयीं माझा असा तर्क होतो कीं,

ती कोणी महादुष्ट चेटकी असावी, व तिनें आपणांस मोहित करण्या-साठीं हें सुंदर रूप धारण केलें असावें; आणि तिचें मनोरंजन कर-ण्याकरितां उभ्या असलेल्या स्त्रिया ज्या आपल्या दृष्टीस पडल्या, त्या स्त्रिया नसून ते सर्व तिला वश असलेले राक्षस असावे, व त्यांनीं तिच्या सांगण्यावरून आपणांस फसविण्याकरितां स्त्रियांचीं रूपें धारण केलीं असावीं, दुसरें कांहीं नाहीं.'

वजिराच्या बोलण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं असें जरी पातशाहास वाटलें नाहीं, तरी त्या यक्षिणीवर तो इतका लंपट झाला होता कीं, त्याला तिचा नाद सोडून देऊन आपल्या वाटेनें निघून जावें असें वाटेना. तिची मूर्ति एकसारखी त्याच्या डोळ्यांसमोर उभी राहिली; व तो परत आपल्या वाड्यांत जाऊन पोहोंचला, तथापि कामाकाजा-कडे बिलकूल त्याचें लक्ष लागेना. असो; याप्रमाणें एकसारखा त्याला तिचाच निदिध्यास लागला. फार काय! पण तिची जरी त्यास कांहीं एक वार्ता समजण्याचा मार्ग नव्हता, व त्याचा वजीर त्याच्या मनां-तून तिजविषयींचे विचार काढून टाकण्याचा एकसारखा प्रयत्न क-रीत होता, तरी त्याचा कांहीं एक उपयोग न होतां तिच्या विर-हानें तो एकसारखा दुःखी होऊन झुरणीस लागला. त्याचें कोठेंही चित्त लागेना. यास्तव त्यानें आपला दररोज शिकारीस जाण्याचा पाठ ठेविला. हें कांहीं तो चैनीकरितां करीत असे असें नव्हे, तर ज्या ठिकाणीं ती सुंदर हरिणी दृष्टीस पडली होती, त्या ठिकाणीं जाऊन पुनः ती दृष्टीस पडावी, आणि त्या योगानें पहिल्याप्रमाणें त्या मनमोहि-नीच्या दर्शनाचा लाभ घडावा, हाच हेतु असें करण्यांत त्याचा होता.

याप्रमाणें एक वर्ष लोटलें, तरी तेवढ्या काळांत त्या यक्षिणीचा कांहींच मागमूस त्याला जेव्हां लागला नाहीं, तेव्हां मात्र त्याला वाटलें कीं, 'आपण ज्याच्याकरितां आपलें अंतःकरण रात्रंदिवस झिजवीत आहों, तो आपल्या प्रीतीचा विषय ह्मणून मुळींच कांहीं नसून, जें कांहीं आपल्या एकदां दृष्टीस पडलें, तो सारा जादूचा खेळ असावा.' अशी त्याच्या मनाची समजूत झाल्यामुळें तर तो फारच उदास झाला. तेव्हां हें सारें औदासीन्य नाहींसें होण्यासाठीं

वजिराच्या हातीं राज्यकारभार देऊन, त्यानें प्रवासास जाऊन निरनिराळ्या ठिकाणचे चमत्कार पाहण्याचें मनांत आणिलें. वजिरानें त्याचें मन फिरविण्यासाठीं होते तितके उपाय केले; पण तें मुळींच न फिरतां त्याचा निश्चय दृढ झाला, व तो कोणासही बरोबर न घेतां एके दिवशीं रात्रीचा आपल्या वाड्यांतून घोड्यावर बसून निघाला. तो घोडा मोठा बळकट व सुंदर असून त्याच्यावरील सर्व सामान सोन्यानें मढविलेलें होतें व त्यावर हिरे माणकें वगैरे लाविलेलीं होतीं. त्याचप्रमाणें पातशाहाचा पोषाखही मोठा भव्य, सुंदर व बहुमोलाचा असून त्यानें आपल्या कंबरेला रत्नजडित अशा म्यानांत घातलेली एक मोठी तरवार लटकावलेली होती.

अशा थाटानें पातशाह प्रवास करीत जो निघाला, तो आपल्या राज्याची सीमा टाकून तिबेटच्या राज्यांत येऊन पोहोंचला. नंतर त्या देशाच्या राजधानीस त्यानें जाण्याचा बेत केला. याप्रमाणें तो चालला असतां तें शहर सुमारें दोन मजलांवर राहिलें, तेव्हां मध्याह्नाच्या सुमारास तो एका लहानशा झाडाच्या सावलीस उतरला. तो उतरून अंमळ विसांवा घेत आहे तों शेजारच्या दुसऱ्या एका झाडाखालीं सुमारें सतरा आठरा वर्षांची एक स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. ती हातावर डोकें टेंकून बसलेली असून तिची मुद्रा चिंतातुर अशी दिसत होती. त्यावरून तिजवर कांहीं संकट गुदरलें आहे, असें पातशाहास स्पष्ट दिसलें. तिच्या अंगावरचीं सर्व वस्त्रें फाटून गेलीं होतीं; तथापि तशाही स्थितींत तिचें मूळचें सौंदर्य सहज दृष्टोत्पत्तीस येत होतें, व तिच्या तेजावरून, ही कोणी थोर कुळांतील स्त्री असावी असें व्यक्त होत होतें. पातशाह हा उठून तिजकडे गेला, आणि तिला साहाय्य करण्याच्या हेतूनें, 'तूं कोण ? कोठची?' वगैरे प्रश्न त्यानें तिला केले. ती ह्मणाली, 'मी राजकन्या असून राजकन्या नाहीं, व राजपत्नी असून राजपत्नीही नाहीं !'

[ दिवस एकोणिसावा. ]

त्या स्त्रीचें भाषण ऐकून, तिला काय ह्मणावें हें पातशाहास समजेना. त्याला वाटलें कीं, हिच्यावर कठिण प्रसंग गुदरला असल्या-

मुळें ही भांबावून गेली असावी. मग तीस तो ह्मणतो, 'बाई, तूं अंमळ शुद्धीवर येऊन माझ्याशीं बोल. तूं एवढी खात्री ठेव कीं, माझ्यांत जेवढें सामर्थ्य आहे तेवढें खर्च करून मी तुला साहाय्य करण्यास तयार आहें.' ती ह्मणते, 'महाराज, मी शुद्धीवर नाहीं असें जें आपणांला वाटलें, त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण मी जें काय मघांशीं तुमच्याशीं बोललें, त्याला अर्थच नाहीं असें कोणासही सकृद्दर्शनीं वाटणार आहे. परंतु मजवर जे कांहीं प्रसंग गुदरले आहेत, त्यांची हकीकत आपणांला समजली ह्मणजे, आपण हिला उगीच असें बोलून गेलों अशी आपल्या मनाला खुरखुर लागल्यावांचून खचीत राहणार नाहीं. आपण उदार व दयाळू अंतःकरणाचे आहां, यास्तव मी आपली हकीकत आपणांला सांगतें.

## तिबेटचा तरुण राजा व नैमण लोकांच्या राजाची कन्या यांची गोष्ट.

ती स्त्री ह्मणते,—महाराज, मी नैमण लोकांच्या राजाची कन्या आहें. माझा बाप मरण पावला त्या वेळेस मी केवळ चार वर्षांची होतें. माझ्या बापाला मी एकटीच असल्यामुळें दरबारच्या लोकांनीं मला त्याच्यामागें गादीवर बसविलें, व मी लहान असल्यामुळें राज्याचा कारभार मुख्य वजीर अली बिन ह्यात हा चालवीत होता. या प्रधानानें माझ्या दाईशीं निका लाविला होता, व हा राज्यकारभारांत मोठा निष्णात असून त्याच्याचकडे माझ्या शिक्षणाची वगैरे देखरेख होती. त्यानें मला राज्यकारभाराचें उत्तम शिक्षण दिलें, व मी त्यांत हुशार होऊन कारभार हातीं घेण्याइतकें माझें वय होतें न होतें इतक्यांत रावाचा रंक व रंकाचा राव करण्याचें ज्याचें हातीं आहे अशा दैवाच्या दुर्गतीनें मी एकदम त्या उच्चपदापासून जी गडगडत खालीं आलें, ती दीनापेक्षांही दीन होऊन बसलें! माझा चुलता मुआफक, जो पुष्कळ वर्षांपूर्वी मोंगल लोकांशीं लढत असतां मरण पावला ह्मणून सर्वांची समजूत होती, तो एकाएकीं आमच्या देशांत प्राप्त झाला. तेव्हां राज्यांतील जे वडे लोक त्याचे पूर्वीचे स्नेही होते ते त्याला मिळाले, व त्यांच्या मदतीनें राज्यांत त्यानें बं-

डाचा झेंडा लाविला. वजीर अली बिन ह्यात यानें तें बंड मोडून लोकांतील दुफळी नाहींशी करण्याचा आपल्याकडून पुष्कळ यत्न केला. पण ह्मण आहेना, कीं "घर फिरलें ह्मणजे घराचे वांसेही फिरतात," त्याप्रमाणें त्या बिचाऱ्या स्वामिभक्तिनिष्ठ प्रधानानें माझ्याकरितां जे जे ह्मणून यत्न केले, त्यांच्या योगानें लोकांचीं मनें ज्यास्तच बिथरून जाऊन बहुतेक सर्व लोक माझ्या चुलत्याच्या पक्षास मिळाले, व त्यांनीं मुआफक हा नैमण लोकांचा राजा असा जाहिरनामा लाविला.

याप्रमाणें मुआफक हा राजा होतांच, माझ्या पक्षाचे जे थोडकेसे लोक होते त्यांस माझ्या तर्फेनें बंडावा वगैरे करण्यास कारणच राहूं नये ह्मणून, मला धरून ठार मारण्याचा त्यानें बेत केला. तेव्हां तो विश्वासू वजीर व त्याची बायको ह्मणजे माझी दाई यांनीं युक्तिप्रयुक्तीनें माझा जीव वांचविण्याची खटपट चालविली. त्यांनीं असें केलें कीं, रात्रीच्या वेळेस मला चोरवाटांनीं पळवून तिबेटच्या शिंवेच्या आंत आणिलें. मग आह्मीं राजधानीस जाऊन, अज्ञातवासांत काळ घालविण्याचा निश्चय केला. वजिरानें आपण चितारी आहों व ही ( ह्मणजे मी ) आपली कन्या आहे असें प्रसिद्ध केलें. त्याला खरोखरच लहानपणापासून चित्रकलेचा शोक असून तो तींत चांगला पारंगतही होता. यास्तव शहरांत त्याची लौकरच मोठी ख्याति झाली. आह्मांजवळ बहुमोल रत्नादिकांच्या रूपानें विपुल द्रव्य असल्यामुळें आह्मांला श्रीमंती थाटानें सहज राहतां आलें असतें. परंतु मुआफक याच्या हेरांची भीति आह्मांस होती, यासाठीं आमची स्थिति बाह्यात्कारें दिसत होती तिच्या मगदुराबाहेर आह्मी काडीइतकीं देखील चाललों नाहीं. सारांश, अली याच्या कलमाच्या जोरावरच केवळ आमचा चरितार्थ चालला आहे असें लोकांस दिसेल अशा रीतीनें आह्मी राहूं लागलों.

याप्रमाणें दोन वर्षें लोटलीं. तेव्हां ऐषआरामांत राहण्याची माझी संवय बहुतेक गेली, व मला आपल्या स्थित्यनुरूप गरिबींत दिवस घालविणें वाईट वाटेनासें झालें. फार काय सांगावें, पण मी कधीं

तरी राज्यावर बसलें होतें कीं नाहीं, याचेंही मला स्मरण न राहतां अगदीं सामान्य मनुष्याच्या पोटीं मी जन्मलें आहे, असा संवयीच्या योगानें माझ्या मनाचा ग्रह होऊन गेला. आणि याहूनही विशेष गोष्ट ही कीं, मला त्यावेळीं जी शांतता भोगावयास सांपडली, तिच्या योगानें मला सर्व गतगोष्टींचा अगदीं विसर पडला; येवढेंच नव्हे, तर एकादे वेळीं मला आपल्या पूर्वींच्या उच्च स्थितीचें स्मरण झालें असतां, मला तिचा त्रास वाटून मी त्या त्रासापासून सुटलें हें माझें सुदैव असें मी मानूं लागलें. खरोखर, त्या गरिबीच्या पण अत्यंत सुखकर स्थितीची मला आठवण झाली ह्मणजे असें वाटतें कीं, परमेश्वरानें तींतच मला शेवटपर्यंत ठेविलें असतें तर किती उत्तम झालें असतें! पण दैवाची गति विचित्र आहे; त्याच्यापुढें कोणाची मात्रा चालावयाची नाहीं. तेव्हां आपल्या कपाळीं जीं काय संकटें लिहिलीं असतील तीं टाळणें जसें मनुष्यास अशक्य आहे, तसेंच त्यांच्या संबंधानें सदा सर्वकाळ अंतःकरणाला ताप करून घेणें हेंही अगदीं व्यर्थ होय, असें ह्मणून मला आपल्या मनाचें सांत्वन केल्याखेरीज गत्यंतर नाहीं!

असो, अली ह्यानें ज्या कित्येक उत्कृष्ट तसबिरी इतक्या वेळांत काढल्या, त्यांच्या योगानें सर्व शहरांत त्याची फार वाहवा होऊन गेली. ती इतकी कीं, खुद्द राजाच्याही कानीं ती वार्ता जाऊन तो फारच खुष झाला. तो त्या तसबिरी पाहण्याकरितां स्वतः आमचे घरीं आला, आणि त्या पाहून त्यानें त्यांची फार तारीफ केली. या संबंधानें अलीचें त्याशीं जें भाषण झालें, त्यायोगानें तर अलीवर त्याची मर्जी फारच प्रसन्न झाली. त्या उभयतांचें संभाषण चाललें असतां राजाला पाहण्याविषयीं मला इच्छा उत्पन्न होऊन मीही त्या ठिकाणीं गेलें. मला वाटलें होतें कीं, यःकश्चित् चितान्याची मुलगी असें समजून मजकडे त्याचें मुळींच लक्ष जाणार नाहीं. पण माझी ही समजूत चुकीची ठरली. त्यानें मजकडे पाहतांच माझ्या सौंदर्याच्या व तारुण्याच्या योगानें तो पराकाष्ठेचा चकित झाला असें दिसलें. त्यावरून मी झट्दिशीं तेथून निघून घरांत गेलें, तेव्हां

त्यानेंही मला जणूं काय पाहिलेंच नाहीं असें दाखविण्याच्या इरा-ध्यानें अलीबरोबर पूर्ववत् संभाषण चालविलें. पण त्याची मुद्रा इतकी विकारयुक्त दिसूं लागली व त्याच्या बोलण्यांत इतकी विसंगतता येऊं लागली, कीं, मला पाहिल्याच्या योगानें त्याच्या मनावर जो परिणाम झाला, तो अगदीं स्पष्ट दिसूं लागला. दुसरे दिवशीं राजा पुनः आमचे घरीं आला, व त्याप्रमाणें आणखी कित्येक दिवस त्यानें केलें. मी त्याच्या दृष्टीस न पडावें ह्मणून घरांत अगदीं एकीकडच्या खोलींत जाऊन बसत असें. पण तो असें करी कीं, तसबिरी पाह-ण्याच्या मिषानें ही खोली धुंडाळ, ती खोली धुंडाळ, असें करतां करतां शेवटीं मला हुडकून काढून आपल्या नेत्रांचें पारणें फेडि-ल्यावांचून रहात नसे. तो अर्थातच माझ्याशीं कांहीं बोलत नसे, तथापि त्याच्या डोळ्यांवरून व मुद्रेवरून हा आपल्यावर किती मोहित झाला आहे हें मला स्पष्ट दिसून येत असे.

शेवटीं एके दिवशीं राजानें आपण होऊनच वजिरास ह्मटलें. कीं, 'तुमच्यासारखा अलौकिक गुणवान् पुरुष आपल्या पदरीं असावा असें माझ्या मनांत फार दिवसांपासून आलें आहे. यास्तव माझें ह्मणणें असें आहे कीं, तुह्मी आमच्या वाड्यांत येऊन रहावें व तुह्मांस मी मोठी नेमणूक करून देईन तीवर तुह्मीं सुखानें काळ घालवावा.' असें करण्यांत राजाचा गुप्त हेतु काय असावा हें अलीनें सहज ताडलें, व या बीजापासून पुढें कोणता अंकुर उद्भवणार हें लक्षांत आणून त्यानें मला एकांतीं ह्मटलें, 'बाईसाहेब, राजेसाहेबांची आप-णांवर प्रीति बसली आहे असें बरेच दिवसांपासून माझ्या लक्षांत आलें आहे. नाहीं तर तसबिरी त्या काय! आणि त्यांना नेहमीं ने-हमीं पहावयाचें तें काय! तेव्हां वास्तविक पहातां, त्यांचें मन तुह्मां-वर बसल्यामुळेंच तसबिरी पाहण्याच्या निमित्तानें ते वारंवार आपल्या घरीं येत असतात, व आतां ते असें ह्मणत आहेत कीं, तुह्मांला मी मोठी नेमणूक करून देतों, तुह्मी सर्वजण आमच्या वाड्यांत येऊन रहा. त्यांचें ह्मणणें आपल्याला नाकबूल करतां येत नाहीं. पण मी तुह्मांला इतकेंच सांगतों कीं, ते तुमच्याकडे नेहमीं येऊन तुह्मांला

आपल्या प्रेमपाशांत बद्ध करून टाकतील, तर तुह्मी आपल्या थोर कुलाचें स्मरण ठेऊन त्यांना भुलून जाऊं नका. मात्र इतकेंच कीं, जर त्यांचें अंतःकरणापासून तुह्मांवर प्रेम असेल, व तुह्मांस ते आपल्या बरोबरीच्या पदवीस चढविण्यास तयार असतील, तर मग पुढचा विचार पहतां येईल. एरव्हीं तसें कांहीं नसल्यास, आपण युक्तिप्रयुक्तीनें त्यांच्या इच्छेचा विघात केला पाहिजे.' मीं वजिरास ह्मटलें, 'तुमचा विचार मला कबूल आहे, व तुमच्या सल्ल्याखेरीज मी पाऊलही टाकणार नाहीं, याविषयीं खात्री ठेवा.' राजाचें आपणांवर मन बसलें आहे ही गोष्ट पूर्वींच आपल्या लक्षांत आली होती हें मीं वजिरास सांगितलें नाहीं इतकेंच नाहीं, तर त्याचे मुखानें ऐकिलेल्या गोष्टीचाही परिणाम आपल्या मनावर कांहींएक झाला नाहीं असें उलटें त्यास दर्शविलें.

[ दिवस विसावा. ]

तिबेटचा राजा हा तरुण, सुंदर व गुणवान् पुरुष होता; यामुळें अर्थात् त्याच्याप्रमाणेंच माझेंही मन त्यावर लुब्ध झालें. पण तो आपल्याला बरोबरीच्या नात्यानें वागविण्यास तयार असेल तरच त्याच्याकडे लक्ष द्यावें, नाहींपेक्षां त्याला आपलें औदासीन्य दाखवून नकार दर्शवावा असा विचाराअंतीं वजिराच्या सांगण्याप्रमाणेंच माझाही मनापासून निश्चय झाला. पण त्या थोर पुरुषानें, ह्मणजे तिबेटच्या राजानें मला असें दुटप्पी वर्तन करण्याचें मुळींच कारण पडूं दिलें नाहीं. आह्मी राजवाड्यांत राहावयास गेल्यावर थोडक्याच दिवसांनीं माझ्या इच्छेप्रमाणें माझ्याशीं त्यानें बोलणें सुरू केलें. तो ह्मणाला, 'हे सुंदरी, मीं तुला प्रथम पाहिलें तेव्हांपासूनच माझ्या मनांत तुजविषयीं प्रेमाचा अंकुर उद्भवला, व त्यास वाढ लागतां लागतां आज माझी अशी स्थिति झाली आहे कीं, तुजखेरीज इतर सर्व विषय मला अगदीं तुच्छ वाटूं लागले आहेत. फार काय, पण तुजवांचून माझें जीवित व्यर्थ आहे असें मी समजतों. असा जरी मी तुजवर लंपट झालों आहें, तरी तुला दासीप्रमाणें वागविण्याचा माझा हेतु आहे असें तूं मुळींच समजूं नको. तुजविषयीं

माझी इतकी सन्मानबुद्धि आहे कीं, जणूं काय तूं खुद चीनच्या राजाचीच मुलगी आहेस असें माझ्या मनानें घेतलें आहे, व माझ्या बोलण्यावर तुझा भरंवसा बसावा ह्मणून तुला तिबेटच्या गादीची मालकीण करून टाकावी असा माझा बेत आहे.'

राजानें अशा प्रकारें माझा सन्मानयुक्त स्वीकार करण्याचा जो उद्देश दर्शविला, त्याबद्दल मीं त्याचे फार उपकार मानिले, आणि आपला खरा वृत्तांत त्यास सांगण्यास ही चांगली संधी आहे असें समजून मी कोणाची कोण, व या स्थितींत कशा प्रकारें पडलें, वगैरे सर्व हकीकत त्यास सांगितली. ती ऐकून त्याला मोठा गहिंवर आला. मग तो मला ह्मणतो, 'हे परमथोर राजकन्ये, यावरून उघड झालें कीं, तूं आपल्या दुष्ट चुलत्याच्या हातून आपला प्राण वांचवण्यासाठीं माझ्या शिवेंत येऊन माझ्या आश्रयास राहिलीस; व या प्रसंगीं तुला साहाय्य करून तुझें राज्य हिरावून घेणाऱ्या त्या महाचांडाळास शासन करण्याचें माझ्या हातीं आहे याबद्दल मी परमेश्वराचे फार आभार मानतों. असो; तुजशीं विवाह करण्याचा मीं हा आजच निश्चय केला; मात्र त्यास तुझी मान्यता असावी, व ती असेल याविषयीं मला शंका नाहींच. पण ती तुझ्या मुखानें एकदां कळली ह्मणजे ठीक होईल. असें झालें ह्मणजे मी उद्यांच मुआफक याजकडे वकील पाठवून त्यास कळवितों कीं, तुझा कोण-त्याही प्रकारें हक्क नसतां अन्यायानें तूं राज्य घेतलें आहेस, त्यास आतां ताबडतोब राज्य खालीं करून देशील तर ठीक आहे, नाहीं-पेक्षां लढाईस तयार हो.' राजानें मला विवाहसंबंधानें आपला रुकार पुसला, त्याजविषयीं मीं उघड उत्तर न करितां नुसतें मौन धारण केलें, व त्या योगानें आपली या गोष्टीस मुळींच हरकत नाहीं इतकेंच नव्हे, तर ती करण्याविषयीं आपल्याला मनापासून आनंद आहे असें दर्शविलें, व हेंही स्पष्ट त्यास बोलून दाखविलें कीं, 'मला प्रथम पाहिल्यापासून मजविषयीं तुमच्या मनांत जसा प्रेमभाव उत्पन्न झाला, त्याचप्रमाणें तुमच्याही दर्शनानें माझ्या मनांत तुह्मांविषयीं झाला.' हें ऐकून तर त्याला फार आनंद झाला, व त्यानें माझा हात

धरून अत्यंत प्रीतीनें त्याचें चुंबन केलें, आणि जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुझा व माझा देह मात्र भिन्न, पण अंतःकरण एकच राहील' असें शपथ वाहून सांगितलें. नंतर त्या दिवशीं उभयतांचा विवाह मोठ्या थाटानें होऊन त्यानिमित्त शहरांत मोठा उत्सव झाला.

दुसरे दिवशीं सकाळीं पातशहानें बोलल्याप्रमाणें लागलेच वकील माझ्या चुलत्याकडे रवाना केले. ते वकील दरकूच दरमजल करीत मुआफक याचे दरबारीं जाऊन पोहोंचले, आणि 'आह्मी तिबेटच्या राजाकडून फार जरुरीचा व महत्त्वाचा निरोप घेऊन आलों आहों, यास्तव आमचें ह्मणणें ऐकण्याची लवकर मेहरबानी व्हावी,' असें त्यांनीं त्यास कळविलें. त्यावरून मुआफक यानें त्यांस ताबडतोब समक्ष बोलाविलें. तेव्हां त्यांनीं मुआफक यास सांगितलें कीं, 'आमच्या महाराजांनीं तुमची पुतणी जी या राज्याची खरी मालकीण, तिजशीं विवाह केला असून त्यांनीं आपणांस असें कळविण्याविषयीं हुकूम केला आहे कीं, आपण कोणतीही सबब न सांगतां, व यत्किंचितूही विलंब न लावतां, तिचें राज्य तिच्या स्वाधीन करावें, नाहींपेक्षां लढाईस तयार व्हावें.' मुआफक यास जरी तिबेटच्या राजाशीं लढण्याचें मुळींच सामर्थ्य नव्हतें, तरी तो मोठा हट्टी व अविचारी असल्यामुळें त्यानें रागाच्या आवेशांत त्या वकिलांस सांगितलें कीं, 'आम्ही तुमच्या धन्याचें कांहींएक ऐकत नाहीं, त्यानें वाटेल तें करावें.' हा त्याचा उद्दामपणाचा निरोप त्या वकिलांनीं तिबेटच्या राजास येऊन कळवितांच त्यानें राज्यांतील सर्व सैन्यास लढाईकरितां जावयास तयार असण्याविषयीं हुकूम करून, त्यांपैकीं एका मोठ्या टोळीस नैमण लोकांच्या राज्यावर एकदम चाल करून जाण्याविषयीं आज्ञा केली. तें सैन्य कूच करण्याच्या तयारींत आहे इतक्यांत नैमण लोकांपैकीं कांहीं शिष्ट लोक मजकडे येऊन त्यांनीं मला सांगितलें कीं, 'मुआफक हा एकाएकीं आजारी पडून मरण पावल्यामुळें, जो कार्यभाग साधण्याकरितां इकडून सैन्य पाठविण्याची योजना झाली आहे, तो आपोआपच साधल्यासारखा आहे, करितां सैन्य पाठविण्याची तहकुबी व्हावी. आह्मी सर्व आ-

पल्या वडिलांप्रमाणें आपल्याशीं प्रजाधर्मानें वागण्यास तयार आहों.' ही बातमी ऐकून तिबेटच्या राजानें सैन्यास दिलेला हुकूम फिरविला, व आजपर्यंत ज्यानें माझें पित्याप्रमाणें पालन केलें त्या परम विश्वासू अल्लीस माझ्या नांवानें नैमण लोकांवर राज्य करण्यास पाठविण्याचा निश्चय केला यांप्रमाणें अल्ली सर्व तयारी करून तिकडे जाण्याकरितां निघण्याच्या अगदीं बेतांत असतां, कांहींएक आगापिछा नसतां दुर्दैवानें एकाएकीं असा कांहीं प्रसंग येऊन गुदरला कीं, त्या योगानें अल्लींचें तिकडे जाणें तहकूब होऊन, मी फिरून अत्यंत विपन्न स्थितींत पडलें.

एके दिवशीं रात्रीं मी महालांत कुराण वाचीत एका कोचावर बसलें होतें. माझें वाचन झाल्यावर मी निजण्याकरितां पलंगाकडे जात असतां एकाएकीं माझ्या समोरून जातांना एक भयंकर आकृतीचा पुरुष मला दिसला, व तो लागलाच नाहींसा झाला! त्याला पाहून मीं इतकी मोठ्यानें किंकाळी फोडली कीं, पतींना अगदीं गाढ निद्रा लागली होती तरी ते एकदम दचकून जागे झाले. ते उठून मजकडे आले, व 'एकाएकीं आरडण्याचें कारण काय?' ह्मणून मला त्यांनीं विचारिलें. मीं त्याचें कारण त्यांस सांगितलें. तेव्हां त्यांनीं माझें बोलणें ऐकून मला धीर द्यावयाचा तो एकीकडेसच राहिला, व ते उलट मला ह्मणाले, 'माझ्या मनाची तुझ्यापेक्षांही फारच चमत्कारिक स्थिति झाली आहे. कशी तर, तूं एकाच वेळीं मजशेजारीं बिछान्यावर असून पुनः ह्या ठिकाणींही आहेस, हें कसें?' मीं ह्मटलें, 'महाराज, आपण काय बोलतां तें मला मुळींच समजत नाहीं. काय असेल तें कृपा करून स्पष्ट बोला.' तेव्हां ते ह्मणाले. 'पलंगापाशीं चल ह्मणजे तुला हा सर्व चमत्कार दिसेल' त्यावरून मी तेथें जाऊन पाहतें तों अगदीं हुबेहुब माझ्यासारखी अशी एक तरुण स्त्री बिछान्यावर निजलेली माझ्या दृष्टीस पडली! तेव्हां मला किती आश्चर्य वाटलें असेल याची कल्पनाच केली पाहिजे!

मीं मनांत अगदीं चर्र होऊन गेलें, व ह्मणालें, 'अरे देवा, हा काय तरी विलक्षण प्रकार मला दिसत आहे!' त्यावरून ती स्त्री

माझ्यासारख्याच स्वरानें ह्मणते, 'अग ए चेटके, माझ्यासारखें रूप घेऊन या ठिकाणीं येण्याचें धाडस करणारी तूं आहेस तरी कोण? अग दुष्टे, तुला असें वाटतें काय, कीं तूं हुबेहूब माझ्यासारखी दिसत आहेस ह्मणून माझे पती तुझ्या रूपाला फसून जातील, व मला येथून घालवून देऊन तुला माझी जागा देतील? तूं ही जी युक्ति लढविली आहेस, तिचा कांहींएक उपयोग होणार नाहीं, हें तूं खूब समज. तूं कितीही ढोंगधुतारे केलेस तरी माझे पती तुला काडीमात्रही बधणार नाहींत, समजलीस?' मग पतींना उद्देशून ती ह्मणते, 'महाराज, ह्या रांडेला पकडून अंधारकोठडींत कोंडून टाकण्याचा हुकूम करा, व उद्यां हिच्या ह्या घोर अपराधाबद्दल हिला जाळून टाकण्याची शिक्षा द्या.'

[ दिवस एकविसावा. ]

नैमण लोकांच्या राजाची कन्या ह्मणजे तिबेटच्या राजाची राणी ह्मणते—त्या बिछान्यावरील स्त्रीशीं माझें सर्वप्रकारें सादृश्य पाहून मला जें आश्चर्य वाटलें. त्यांहींपेक्षां तिनें माझ्याशीं जें दांडगेपणाचें भाषण केलें त्याचें मला फारच नवल वाटलें. पण मी तिला तसेंच उलटून उत्तर न करितां, रडायला लागलें. मग मीं रडत रडत पतींस ह्मटलें, 'महाराज, आज सतत इतके दिवस दुःखांत घालविल्यानंतर मला नुकताच जो सुदिन प्राप्त झाला, त्यावरून मला वाटलें होतें कीं, दुर्दैवानें माझी आतां पाठ सोडली. पण छी! तें कांहीं नाहीं असें दिसतें. महाराज, कोणा चांडाळणीस माझें सौख्य न साहून तिनें जादूच्या योगानें माझें रूप धारण केलें आहे. व मला ती दुःखसागरांत लोटूं पहात आहे यांत संशय नाहीं. महाराज, तिनें आपल्याला तरी कशी भूल पाडली कीं, मला आपण बिलकुल ओळखीत नाहीं! व ही जी जखीण तीच मी असें आपण समजतां! तर आपल्या चरणांपाशीं माझी एक वेळ विनंति आहे, ती ही कीं, आपण मला निरखून पहा, ह्मणजे जिला आपण नुकतेंच वरलें तीवर आपली अंतःकरणपूर्वक प्रीति असेल तर, आपली खरी प्रिया कोणती हें आपलें अंतःकरणच आपणाला सांगेल. मीच

नैमण लोकांच्या राजाची कन्या, व या चरणांची खरी दासी आहें. हें तो सर्वसाक्षी परमेश्वर जाणत आहे. व त्याची शपथ वाहून मी सांगतें कीं, मी जें काय ह्मणतें यांत असत्याचा लेशही नाहीं.'

इतकें माझें बोलणें होत आहे तों ती पलंगावरची स्त्री पुनः माझा धिक्कार करून ह्मणते, 'अग, तूं मोठी निर्लज्ज बायको आहेस ! तूं जें एवढें तिखटमीठ लावून खोट्याचें खरें करूं पहात आहेस, त्या तुझ्या जिभेला हाड कसें गे नाहीं ? तुझ्यासारख्या बाजारबसव्या वेसवांना देवाच्या शपथेची काय चाड आहे ? तुझा तो मानभावी चेहरा आणि रडून घर घेणें या गोष्टींना महाराजांसारखे अनुभवी पुरुष फसतील असें तुला वाटतें काय ?' हें ऐकून माझे पति ह्मणाले, 'तुह्मी दोघीही आतां गप्प रहा; कां कीं तुमच्या बोलण्यापासून मला कांहींही बोध होत नसून उलट मी अधिक अधिक गोंधळून मात्र जात आहें. मी इतकें खात्रीनें ह्मणूं शकतों कीं, मला एकच बायको असून तुह्मांपैकीं एकजण चेटकी आहे व ती मला आपल्या पाशांत पाडूं पाहत आहे. पण ती कोणती, याचा निर्णय करण्यास मला मुळींच साधन नाहीं, यामुळें मी चेटकीला शिक्षा करण्याचा यत्न करूं लागलों असतां कदाचित् या गोंधळामुळें बिचाऱ्या निरपराध स्त्रीवरच आग पाखडीन असें मला वाटत आहे. तर या गोष्टीची मला अगोदरच पुरती शहानिशा करून मग काय तें केलें पाहिजे.'

असें ह्मणून राजानें खोजांच्या जमादारास हाक मारली आणि आह्मां दोघींस रात्रभर निरनिराळ्या खोल्यांत कोंडून ठेवण्याविषयीं त्यास हुकूम केला. नंतर सकाळीं प्रथमतः त्यानें अली व त्याची बायको ह्मणजे माझी पूर्वींची दाई यांस बोलावून आणून झालेला सर्व वृत्तांत त्यांस कळविला. तो ऐकून त्या दोघांनाही पराकाष्ठेचा विस्मय वाटला कीं, अशी गोष्ट घडावी तरी कशी ! राजानें जरी त्यांस पुष्कळ प्रकारें सांगितलें कीं, 'माझी खरी बायको कोणती हें मला कळण्याची पंचाईत पडली--इतकें त्या दोन स्त्रियांमध्यें सादृश्य आहे--तरी, त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें समजून त्या उभयतांनीं ह्मटलें कीं, त्या

दोघींस आह्मांपुढें आणा ह्मणजे आपली राणी कोणती तें आह्मी एकदम ओळखून काढूं.' पण आह्मां दोघींना पुष्कळ वेळ निरखून पाहिल्यावर राजाप्रमाणेंच त्या उभयतांचीही लौकरच खात्री झाली कीं, या दोघींपैकीं खरी राणी कोणती, व बनलेली कोणती, हें सांगणें अगदीं अशक्य आहे. शेवटीं माझ्या दाईला आठवण झाली कीं, माझ्या एका गुडघ्यावर तीळ आहे. तेव्हां तिला जरा उमेद आली, व तिनें पुन: आह्मां दोघींस नीट बघितलें, पण काय चमत्कार सांगावा! दोघींच्याही त्याच गुडघ्यावर तसाच एकेक तीळ असलेला तिला आढळला! तेव्हां तर ती फारच थक्क झाली. तथापि या दोघांनीं आणखी आमची बिनाखी केली. ती अशी कीं, आह्मांस निरनिराळ्या ठिकाणीं नेऊन तेच तेच प्रश्न केले; पण मीं जीं उत्तरें दिलीं तींच त्या स्त्रीनेंही दिलीं. तेव्हां तर दाई अगदींच कुंठित झाली. तथापि या शेवटच्या वेळीं, माझीं उत्तरें त्या दुसऱ्या स्त्रीच्या उत्तरांपेक्षां ज्यास्त बरोबर आहेत असें आपलें मत झालें आहे असें ठरवून, माझ्यासारखा तिनें न्याय दिला.

पण माझ्या दाईच्या ठरावाला कोण पुसतो? कां कीं राजानें आपल्या सर्व प्रधानमंडळीस बोलावून आणिलें होतें, त्यांचीं मतें माझ्या विरुद्ध पडलीं. ते ह्मणाले, 'हा प्रकार घडला त्या वेळेस जी स्त्री बिछान्यावर निजलेली आढळली, तीच खरी राणी असून दुसरी चेटकी असावी; व यास्तव हिला देशाच्या कायद्याप्रमाणें जिवंत जाळण्याची शिक्षा द्यावी.' याप्रमाणें बहुमत पडल्यावरून त्या शिक्षेस मी पात्र ठरलें. पण असली क्रूर शिक्षा करण्याच्या विरुद्ध राजाचें मत पडलें. खेरीज, या वादग्रस्त प्रश्नाच्या संबंधानें त्याच्या मनाचा कोणताच पक्का निश्चय न झाल्यामुळें त्याला वाटलें कीं, न जाणों, आपण अशी शिक्षा दिली तर कदाचित् चुकीमुळें असें होईल कीं, आपली खरी बायको, जिला जन्मभर होईल तितकें सुख देण्याचा आपला विचार तीच बिचारी प्राणास मुकेल! ह्मणून त्यानें मला फक्त हद्दपार करण्याची शिक्षा ठरविली. मग माझ्या अंगावरचीं सर्व मौल्यवान् वस्त्रें व दागदागिने त्यानें काढून घेतले, व मला फाट-

कौतुकीं चिरगुटें देऊन शहराबाहेर घालविलें. पुढें लोकांना माझी दया येऊन त्यांनीं जी काय अन्नावस्त्राची मला थोडीबहुत सामुग्री कृपा करून दिली, तीवर मी कशी तरी येथें येऊन पोहोंचलें.

तिबेटच्या राजाची राणी पातशाहास ह्मणते, 'महाराज, ही माझी हकीकत आहे, व यावरून मीं जें काय आपल्याला प्रथम सांगितलें, त्यांत विसंगत कांहीं नसून मी चांगली शुद्धीवर आहें असें आपल्या लक्षांत येईल. कारण विचार करून पहा कीं, मी राजस्त्री असून राजस्त्री नाहीं, व राजकन्या असून राजकन्याही नाहीं, असें झालें आहे.' रझवानशाह पातशाह तीस ह्मणतो, 'बाई, तूं स्वस्थ रहा. तुझ्या विपत्तीचा आतां कळस झाला आहे, तर आजपासून तिला उतरती कळा लागून तुला हळूहळू चांगले दिवस येतील. कारण, एका कवीनें असें ह्मटलें आहे कीं, कोणालाही अत्युत्तम स्थिति प्राप्त झाली कीं, तेव्हांपासून त्याच्या विनाशकाळास प्रारंभ झाला असें समजावें; तसेंच कोणालाही अतिनिकृष्ट दशा आली ह्मणजे त्याचें कल्याण होण्याचा काळ जवळ आला असें समजावें. तुह्मांला जेव्हां वाटत असतें कीं, आतां मात्र आपली गत ठीक नाहीं, आतां आपण संकटांतून वांचत नाहीं, तेव्हां तुह्मांला पूर्ण सौख्य मिळणार आहे असें समजा; व जेव्हां तुह्मांला वाटत असतें कीं, आतां आपणाला कोणत्याही गोष्टीची कमतरपणा नाहीं, आपल्याला जेवढें सौख्य पाहिजे तेवढें आहे, तेव्हां विपन्नकाळ तुह्मांस ग्रासावयास येऊन ठेपलाच असें समजा. तर सारांश काय कीं, बाई, ईश्वरानें इहलोकीं मनुष्याची अशी स्थिति ठेविली आहे. ह्या गोष्टीच्या प्रत्ययाकरितां तुला कुवरशाह नामक वजिराची गोष्ट सांगतों. असें ह्मणून तो पुढील गोष्ट तिबेटच्या राणीस सांगूं लागला.—

### ( कुवरशाह वजीर ह्याची गोष्ट. )

हिरकेनिया नामक देशाचा राजा खुदावंदी याचा कुवरशाह नांवाचा वजीर होता. हा वजीर मोठा उदार, विचारी आणि अत्यंत चतुर असा होता. एके दिवशीं तो स्नान करीत असतां त्यानें आ-

पल्या हातांतली आंगठी काढिली, आणि सहज पाण्यांत टाकिली, तों ती आंगठी पाण्यांत न बुडतां तशीच तरंगत राहिली!

कुवरशाह यास हा चमत्कार पाहून मोठें आश्चर्य वाटलें. पण त्याबरोबर तो मनांत चरकला, आणि त्यानें तत्काळ आपल्या नोकरांस हुकूम केला कीं, 'घरांतील सर्व संपत्ति आतांच्या आतां काढून अमुक अमुक ठिकाणीं लपवून ठेवा.' कारण, तो ह्मणाला, 'माझ्या धन्याकडून लौकरच मला कैद करून नेण्याकरितां लोक येतील.' नंतर खरोखरच असें घडलें कीं, वजिराच्या हुकुमाप्रमाणें त्याचे नोकर लोक त्याची सर्व चीजवस्त त्याच्या घरांतून काढून सांगितलेल्या ठिकाणीं नेऊन ठेवतात न ठेवतात इतक्यांत, राजाच्या खुद्द तैनातीकडील पहारेकऱ्यांवरचा हवालदार, शिपाई प्यादे बरोबर घेऊन कुवरशाहाचे घरीं आला, व त्यास ह्मणाला कीं, 'तुह्मांस कैद करून तुरुंगांत टाकण्याविषयीं सरकारचा मला हुकूम झाला आहे.' हें ऐकून वज़ीर यत्किंचितूही नानू न करितां त्या हवालदाराबरोबर मुकाट्यानें चालता झाला. हवालदारानें कांहीं शिपाई लोक आपल्या बरोबर घेतले, व बाकीच्यांनीं वजिराचे घरांत जो कांहीं थोडाबहुत ऐवज राहिला होता तो सर्व जप्त केला. याप्रमाणें केवळ अन्यायानें या दुर्दैवी वजिरास राजानें कित्येक वर्षेंपर्यंत तुरुंगांत टाकून त्याचे फार हाल केले. ते असे कीं, त्याच्या इष्टमित्रांजवळ बोलण्याचालण्यासही त्याला परवानगी दिली नाहीं, त्याला खायला पुरतें मिळूं दिलें नाहीं, आणि खेरीज त्याला कारागृहवास जेणेंकरून अधिक अधिक दुःखदायक होत जाईल अशा प्रकारचे कांहीं तरी नवीन नवीन हुकूम तो करूं लागला.

कुवरशाहाच्या फार आवडीचें एक पक्कान्न होतें तें खाण्याविषयीं त्यास एकदां इच्छा उत्पन्न होऊन, तो किती एक दिवसांपासून तें आपणांला आणून देण्याविषयीं तुरुंगावरील कामदारांची विनवणी करीत होता. पण त्याच्या मनाप्रमाणें कांहींएक करावयाचें नाहीं, तर उलटा त्यास होईल तितका अधिक त्रास द्यावयाचा हेंच त्यांचें काम असल्यामुळें, त्यांनीं मुळींच त्याच्या विनवणीकडे लक्ष दिलें नाहीं.

तथापि एकेदिवशीं तुरुंगावरील जमादारास त्याची दया येऊन त्यानें एक चिनी तबक भरून तें पक्कान्न त्याला आणून दिलें. तेव्हां कुवरशाहास मोठें समाधान वाटून तो तें खावयास बसला, इतक्यांत, दोन भले लठ्ठ उंदीर भांडत होते, ते भांडतां भांडतां धप्दिशीं त्या तबकांत येऊन पडले! तेव्हां वजिरास अर्थातच त्या पक्कान्नाची किळस येऊन त्यानें तबक एकीकडे सारलें, व आपल्या घरीं चाकरमाणसांस सांगून पाठविलें कीं 'तुह्मीं पूर्वीं माझ्या हुकुमावरून माझ्या घरांतील द्रव्य ज्या ठिकाणीं नेऊन ठेविलें आहे, तेथून तें आतां काढून घरांत आणून ठेवा; कारण, आतां लौकरच राजेसाहेबांची मजवर झालेली गैरमर्जी दूर होऊन ते मला बंधमुक्त करतील, व माझा अधिकार पूर्ववत् मला देतील.' त्यानें ह्मटल्याप्रमाणें खरोखरच गोष्ट घडून आली. राजानें त्याच दिवशीं त्याला कैदेंतून सोडवून आपल्या समोर बोलाविलें, आणि ह्मणाला, 'तुमच्या वैऱ्यांनीं माझे कान फुंकल्यामुळें तुह्मांविषयीं माझ्या मनांत रोष आलेला होता; परंतु तुह्मी निरपराधी आहां अशी आतां माझी खात्री झाली असून तुमच्या शत्रूंनीं खोटी चुगली केल्याबद्दल त्यांस मीं जबरदस्त शिक्षा केली आहे. सारांश, आतां पूर्वीप्रमाणें तुह्मांवर माझा पूर्ण भरंवसा आहे, व तुमचें काम ह्या वेळेपासून पुनः तुह्मांस मीं दिलें आहे.'

कुवरशाहाच्या मित्रांनीं हा सर्व घडलेला प्रकार पाहून त्यास विचारिलें कीं, 'तुह्मांस राजेसाहेब अमुक वेळीं कैदेंत टाकतील व फिरून आज मुक्त करतील हें तुह्मांला कशावरून समजलें?' वजीर त्यांस ह्मणतो, 'मीं आपली आंगठी पाण्यांत टाकली असतां ती तळाशीं जावी ती न जातां तरंगत राहिली; यावरून मीं ताडलें कीं, माझ्या भाग्याची आतां सीमा झाली असून माझा विनाशकाळ जवळ येऊन ठपला आहे; व त्याप्रमाणें लागलाच मला प्रत्यय आला. पुढें मी तुरुंगांत असतां आपल्या आवडीचें पक्कान्न कित्येक दिवस तेथल्या लोकांपाशीं मागत होतों, पण ते मला तें देईनात. यावरून आपल्या विपत्तीचा अद्याप शेवट झाला नाहीं असें मी मनांत समजलों. शेवटीं मला त्यांनीं तें पक्कान्न आणून दिलें असतां, व मी तें

अगदीं खाण्याच्या बेतांत असतां त्यांत एकाएकीं उंदीर येऊन पडले! त्यावरून मीं ताडलें कीं, आपल्या दुर्दैवाची आतां अगदीं अखेर झाली, व यापुढें आपणांला संपत्काल लौकरच प्राप्त होणार आहे!'

## तिबेटचा तरुण राजा व नैमण लोकांच्या राजाची कन्या ह्यांची गोष्ट. (पुढें चालू.)

ही कुवरशाह वजिराची गोष्ट सांगून चीनचा पातशाह तिबेटच्या राणीस ह्मणतो, 'बाई, यावरून तूं पहा कीं, आतां तुझ्या विपत्तीची कमाल होऊन गेली असल्यामुळें, तुला सुखाचे दिवस लौकरच येतील असा संभव आहे. तर तूं निराशेनें उदास होऊन अंतःकरणास व्यर्थ शिणवूं नको. माझी गोष्ट बहुतेक तुझ्यासारखीच आहे व मलाही असें वाटतें कीं, मी जो आज रानावनांत येऊन पडलों आहें, तो कोणा एका चेटकीच्याच दुष्ट कृत्यानें पडलों आहें कीं काय, व जिच्यावर माझें प्रेम बसलें आहे ती कोणी जखीण आहे कीं काय कोण जाणे!' असें ह्मणून पातशाहानें राणीस आपलें नांव गांव सांगून त्या पांढऱ्या हरिणीचा सर्व वृत्तांत कथन केला.

पातशाह आपली गोष्ट संपवीत आहे इतक्यांत कोणी तरुण मनुष्य घोड्यावर बसून भरधांव चाललेला त्या दोघांच्या नजरेस पडला. तो बहुतेक दिगंबर असून घोड्याला इतका दामटीत चालला होता कीं, त्या बिचाऱ्याच्या आंगाचें अगदीं पाणी पाणी होऊन गेलें होतें. तो घोड्यावरचा मनुष्य त्या दोघांच्या इतका जवळून गेला कीं, राणीनें त्यास ओळखून मोठ्यानें गहिंवरून ह्मटलें! 'अग बाई! हे तर माझे पति! यांची अशी कशी दशा झाली!' तथापि त्या घोड्यावरच्या गृहस्थानें तिच्याकडे लक्ष न देतां तो तसाच आपल्या व्यवधानांत भरदिशीं निघून गेला. त्याची मुद्रा अगदीं कावरी बावरी व भयाभीत होती, व तो पळण्याच्या गर्दींत असतांही वारंवार मागें वळून पहात होता. त्यावरून त्याचा कोणी पाठलाग करीत असून आपण धरले जाऊं कीं काय अशा भीतींत तो आहे असें दिसत होतें.

[ दिवस बाविसावा. ]

तिबेटची राणी व चीनचा पातशाह यांचे डोळे त्या घोड्यावर बसून चाललेल्या मनुष्याकडे एकसारखे लागले होते, व तो त्यांच्या दृष्टीआड होत आहे तोंच त्याच्या मागून दुसरा एक मनुष्य घोड्यावर बसून तसाच घोडा भरधांव फेंकीत चाललेला त्यांचे दृष्टीस पडला. त्याचा पोशाख फार उंची असून त्याच्या हातांत रक्तानें भरलेली नागवी तरवार होती, व त्यावरून स्पष्ट दिसत होतें कीं, पुढें चाललेल्या मनुष्याच्या हा पाठीस लागलेला असून त्याला गांठण्यास फार उतावळा झाला आहे. पण मोठा चमत्कार हा कीं, पहिल्यांत व त्याच्यांत इतकें सादृश्य दिसत होतें कीं, राणीच्या तो जवळून चालला असतां त्यास पाहून, 'अग बाई ! हे तर माझे पति ! हे इकडे कोणीकडे चालले !' असें ह्मटल्यावांचून तिच्यानें राहवेना. तथापि तो मनुष्य इतका गर्दींत होता कीं, तिच्या बोलण्याकडे त्याचें लक्ष न जाऊन तो तसाच निघून गेला. हें पाहून पातशाह राणीस ह्मणतो, 'असा चमत्कार तर कधीं कोणींच पाहिला नसेल,' ती त्यास ह्मणते,'यावरून तर तुमची आतां पूर्ण खात्री झाली असेल कीं, मीं आपल्या संबंधानें जें काय तुह्मांस सांगितलें, त्यांत असत्याचा यत्किंचित्‌ही अंश नाहीं.' या गोष्टीच्या संबंधानें तीं दोघें आश्चर्यचकित होऊन विचार करीत बसलीं असतां थोडक्याच वेळानें तिसरा एक मनुष्य घोड्यावर बसून चाललेला त्यांस दिसला. मात्र तो पूर्वींच्या दोघांइतका जरी वेगानें चालला होता, तरी तो पातशाह व राणी त्यांच्या जवळून चालला असतां राणीकडे त्याची नजर जातांच त्यानें तीस ओळखिलें. हा मनुष्य अली बिन ह्यात ह्मणजे राणीच्या बापाचा पूर्वींचा वजीर होता. राणीनेंही त्यास तत्काळ ओळखिलें, व तो लागलाच घोड्यावरून खालीं उतरला, आणि तिजपुढें त्यानें साष्टांग नमस्कार घातला. तो तिला मोठ्या गहिंवरानें ह्मणतो, 'बाईसाहेब, तुह्मांलाच का ह्मा मी आपल्या समोर पाहतों ? अहाहा ! तुह्मांला सुरक्षित ठेवल्याबद्दल परमेश्वराचे मी किती आभार मानूं ! तो सर्वशक्तिमान् प्रभु अत्यंत न्यायी असून, केव्हां केव्हां निरपराध्याचें संरक्षण करीत नाहींसा

दिसतो; पण आपला न्यायीपणा मनुष्याच्या पूर्ण नजरेस यावा एव-ढ्याकरितांच तो असें करतोसें दिसतें. असो, आतां आपलीं सर्व संकटें दूर झालीं असें समजा. तुमची हाडवैरीण ती चेटकी यमसदनास गेली;—महाराजांनीं स्वतः आपल्या तरवारीनें तिची खांडोळी करून टाकिली असून तिच्या दुष्ट रक्तानें भरलेली महाराजांची तरवार अ-द्यापि वाळली नाहीं. तसेंच ज्या एका चांडाळानें मंत्रसामर्थ्यानें त्यांचें रूप धारण केलें आहे, त्याचाही चांगला समाचार घेण्यासाठीं ते त्याच्या मागें लागलेले आहेत. तुह्मांला राजवाड्याचे बाहेर घाल-विलें हा तुह्मांवर जो दुर्घट प्रसंग गुदरला, त्या वेळेपासून दरबारांत ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या सर्व सांगण्यास मला या वेळेस अव-काश नाहीं, सबब दुसरे एकादे वेळीं त्या मी तुह्मांला सांगेन. सध्यां महाराज हे घोडा अगदीं दामटीत चालले असल्यामुळें क्षणोक्षणीं आपण त्यांजपासून लांब रहात आहों, ह्मणून, बाईसाहेब, माझ्या ब-रोबर आतांच्याआतां तुह्मी घोड्यावर बसा ह्मणजे आपण कसेंही करून त्यांना गांठण्याचा यत्न करूं.' हें वजिराचें भाषण ऐकून चीनचा पातशाह त्यास ह्मणतो, 'अहो, हा तुमचा विचार रहित करा. या योगानें बाईसाहेबांस फार श्रम होणार आहेत. तुह्मी येथें त्यांच्या-पाशीं रहा, व मी स्वतः जाऊन तुमच्या राजेसाहेबांस येथें घेऊन येतों.' असें ह्मणून पातशाह तत्काळ घोड्यावर बसला, व त्याच्या ह्या थोरपणाबद्दल तिबेटच्या राणीनें त्याचे फार आभार मानले तिकडे लक्ष न देतां व अवकाश न करितां तो तिबेटच्या राजास गांठण्यासाठीं खूप जलदीनें आपला घोडा फेंकीत चालला.

याप्रमाणें पातशाह निघून गेल्यावर 'हा तरुण पुरुष कोण ?' ह्मणून वजिरानें राणीस विचारिलें. तिनें जेव्हां त्यास सांगितलें कीं, 'हा चीनचा पातशाह आहे.' तेव्हां त्यास मोठें आश्चर्य वाटलें. मग राणी वजिरास पुसते, 'ती स्त्री चेटकी आहे असें पुढें कसें उघ-डकीस आलें तें सांगा बरें ?' वजीर उत्तर करितो, 'बाईसा-हेब, प्रथमतः आपले पति राजेसाहेब, यांना असें वाटलें होतें कीं, दरबारच्या लोकांनीं खरी राणी कोणती व खोटी कोणती

याचा बरोबर निर्णय केला; व ती चेटकी तुमच्या पतींच्या समागमें मोठ्या आनंदानें राहिली. कांहीं दिवसांनीं तिला बरोबर घेऊन ते राजधानीपासून सुमारें पंधरा कोसांचे अंतरावर एक किल्ला आहे तेथें मजेनें जाऊन राहिले, व आजपर्यंत ते तेथेंच होते. त्यांनीं बरोबर जीं मनुष्यें घेतलीं होतीं त्यांत मीही होतों. आज सकाळीं असें झालें कीं, तेथून मी व ते बरोबर फक्त एक गुलाम घेऊन निघालों असतां किल्ल्यापासून थोडकेच दूर गेल्यावर, कांहीं एक महत्त्वाचें काम आपण राणीस सांगण्यास विसरलों अशी राजेसाहेबांस आठवण होऊन, आह्मी पुढें न जातां तसेच किल्ल्याकडे परत गेलों. राजेसाहेब किल्ल्याच्या दरवाज्यापाशीं घोड्यावरून उतरले, व मला तेथेंच उभें राहण्यास सांगून मागील जिन्यानें राणीच्या ह्मणजे त्या चेटकीच्या महालांत गेले. नंतर थोडक्याच वेळानें, एक उघडा बोडका व अर्धवट नग्न असा हुबेहूब राजेसाहेबांसारखा दिसणारा मनुष्य मजकडे आला. मीं त्यास राजेसाहेबच समजून ह्मटलें, ‘महाराज, आपली अशी स्थिति कशानें झाली?’ पण तो कांहीं उत्तर न करितां लागलाच राजेसाहेबांच्या घोड्यावर बसून धूम पळ काढीत सुटला. मला अजून अर्थातच वाटत होतें कीं, हे राजेसाहेबच आहेत, तेव्हां त्यांस काय अपाय घडला याचा तपास लाविला पाहिजे ह्मणून मीं त्या मनुष्याच्या मागें दौड करीत चाललों. इतक्यांत, ‘थांबा हो थांबा! पळूं नका!’ असा आवाज मला पाठीमागें ऐकूं आल्यावरून मी लागलाच थांबलों, व मागें वळून पाहतों तों हातांत नागवी तरवार असून नेत्र आरक्त झालेले व एकंदर मुद्रा भयंकर झालेली असे राजेसाहेब किल्ल्याकडून येतांना माझ्या नजरेस पडले. ते भरधांव घोडा टाकीत मला येऊन मिळाले, आणि ह्मणतात, ‘अहो साहेब, आह्मांकडून केवढी चूक झाली कीं, आह्मीं आपल्या प्रियकर राणीस हद्दपार करून जादूच्या योगानें तिचें रूप धारण करणाऱ्या दुष्ट स्त्रीस घरांत घेतलें! त्या दुष्ट चेटकीस मीं इतक्यांत या तरवारीनें ठार केली असून, जो एक महापाजी जादुगार माझें रूप घेऊन

आलेला मला तेथें आढळला, व तो तुमच्यापुढें पळून चालला आहे, त्याची तीच गत करण्याची ही वेळ आहे, ह्मणून मला लौकर गेलें पाहिजे. तो माझ्या हातून सुटून जाऊं पहात आहे, पण त्याचीं शंभर वर्षे पुरीं भरलीं असें त्यानें खुब समजावें!' असें ह्मणून राजेसाहेब पूर्वीं सांगितलेल्या त्या गुलामाच्या घोड्यावर बसलेले होते तसेच निघाले, ते त्या दुष्टाचा पाठलाग करीत जे गेले ते अद्यापि तसेच त्याच्या मागें लागून राहिले आहेत.

याप्रमाणें इकडे वजीर अली बिन हयात, हा हें वर्तमान तिबेटच्या राणीस सांगत चीनचा पातशाह पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तिबेटच्या राजास गांठून परत आणण्याकरितां अतिशय त्वरेनें जो निघून गेला तो थोडक्याच वेळांत दिसेनासा झाला. तिबेटचा राजाही, त्या जादुगारास गांठल्यावांचून सोडावयाचें नाहीं असा निश्चय करून एकसारखा जो त्याच्या मागें भरधांव घोडा फेंकीत चालला होता तो मध्यें एक क्षणभरही थांबला नाहीं, व तो त्या जादुगारापेक्षां घोड्यावर बसण्यांत फारच पटाईत असल्यामुळें त्या दुष्टास त्यानें लौकरच गांठलें. त्यानें त्याच्या खांद्यावर जोरानें वार करून तो घायाळ झाला असतां त्यास घोड्यावरून ओढून खालीं पाडिलें. नंतर त्याची पुरती शांतिपुष्टि करण्याकरितां राजा आपल्या घोड्यावरून खालीं उतरला असतां तो हरामखोर शरण येऊन. 'जीवदान द्या,' ह्मणून त्याची प्रार्थना करूं लागला. तेव्हां त्यास राजानें ह्मटलें कीं, 'तूं जर कोण आहेस, हें खरें सांगशील, आणि कोणत्या साधनानें व कोणत्या कारणाकरितां माझें रूप घेतलेंस याची खुलासेवार हकीकत सांगून, खेरीज मी जें जें ह्मणून विचारीन त्याचीं समर्पक उत्तरें कांहीं एक न चोरतां देशील, तरच मजकडून तुला अभय आहे.' तेव्हां तो राजाच्या पायां पडून ह्मणतो, 'महाराज, ज्या अर्थीं आपण कृपा करून मला क्षमा करितां, त्या अर्थीं मी आपल्याशीं कांहींएक न लपवितां आपली खरी हकीकत या पायांपाशीं निवेदन करितों; व याविषयीं आपणांला खात्री पटण्याकरितां मी अगोदर आपलें मूळचें रूप धारण करितों.' असें

ह्मणून त्यानें आपल्या हातांत असलेली एक आंगठी काढिली, व ती काढतांच तो अतिशय भयंकर, कुरूप असा ह्मातारा जरुख माणूस दिसूं लागला !

[ दिवस तेविसावा. ]

त्या मनुष्याचें असें एकाएकीं रूपांतर झालेलें पाहून तिबेटच्या राजास अतिशय विस्मय वाटला, व त्याची गोष्ट ऐकून घेण्याची त्याला फारच उत्कंठा झाली. तो ह्मातारा ह्मणतो, 'महाराज, जसा आपण मला आतां पाहतां, तसें माझें वास्तविक रूप आहे. आतां मी आपला सर्व वृत्तांत आपणांला सांगतों.'

**( माकबेल आणि दिलनवाज यांची हकीकत. )**

तो ह्मातारा ह्मणतो,—महाराज,मी मिसर देशांतील दामास नामक शहरच्या एका कोळ्याचा मुलगा असून माझें नांव माकबेल असें आहे. माझा बाप फार चिकू असल्यामुळें, तो मरण पावला त्या वेळीं माझ्या हातीं त्याचें जें काय द्रव्य आलें तें त्याच्या धंद्याच्या मानानें फारच होतें. माझ्या बापाच्या कंजूषपणाचा मला अगोदरच फार त्रास झालेला होता, व मला कांहीं श्रम न पडतां आयतेंच त्याचें डबोलें सांपडलें, तेव्हां मी एकदम उल्लू होऊन वाटेल तसा खर्च करून श्रीमंता-प्रमाणें ऐषआराम भोगूं लागलों. विषयोपभोगाकडे तर माझें लक्ष फार लागलें, व माझ्या घराशेजारींच एक फार सुस्वरूप अशी दिलनवाज या नांवाची तरुण स्त्री रहात होती, तिला मीं आपलें सर्व तनमनधन वाहिलें. ती स्त्री जशी रूपवती तशीच मोठी हुशार व धूर्त होती. त्या हुशारीचा व धूर्तपणाचा ती फार वाईट उपयोग करीत असे. तो असा कीं, माझ्यासारखेच तिला आपल्या जिवापेक्षां प्यारी मानणारे असे पुष्कळ पुरुष असून त्या सर्वांस ती आपल्या कृत्रिम भाषणानें व आंजारण्यागोंजारण्यानें असें भासवी कीं, त्या प्रत्येकाला, मीच काय तो हिच्या जिवाचा कलिजा आहें असें वाटत असे. त्या सर्व कुमार्गी पुरुषांप्रमाणेंच मीही तिच्या बाह्यात्कारी गोड वर्तनास फसून गेलों. तिच्या वरकांती प्रेमास भुलून मीं अशी मनांत गांठ घातली कीं, हिजपासून खरें सौख्य काय तें मलाच मि-

ळत आहे. याप्रमाणें मी तिच्या कपटजालांत पक्का सांपडल्यामुळें, तिला खुष ठेवण्यास मी भलभलताच खर्च करूं लागलों. तिला मी दररोज कांहीं तरी नवी भेट घेऊन जात असें; ती इतक्या मोठ्या किंमतीची असे कीं, तीन चार वर्षांत माझ्या जवळचें काय होतें नव्हतें तें सर्व नाहींसें होऊन, मी अन्नासही मोताद झालों. माझ्यासारखेच दुसरे जे तिचे दोस्त होते, त्यांनाही तिनें अशीच भूल पाडून आपल्याकारितां चढाओढीनें खर्च करावयास लाविलें, व अशा प्रकारें सर्वांच्या टाळूवर हात फिरवून ती चांगली गबर होऊन बसली. माझ्यापासून त्या स्त्रीला जेव्हां कांहीं मिळेनासें झालें, तेव्हां आपणाला आतां ती विचारणार नाहीं असें साहजिकच माझ्या लक्षांत आलें; व मी भिकेस लागलों होतों तरी, तिचा शौक मला सुटला नव्हता यामुळें तर, ती आतां आपल्याला मानणार नाहीं या गोष्टीचा मला फारच खेद वाटूं लागला. पण दिलनवाज ही जरी पैसा काढण्यांत वस्ताद व नखरेबाज बायको होती तरी मजविषयीं तिच्या मनांत काय आलें असेल तें असो, माझा अव्हेर ह्मणून तिनें केला नाहीं. ती एके दिवशीं मला ह्मणाली, 'प्रियकरा तुजकडून पूर्वींप्रमाणेंच मला कांहीं जिन्नसपानस मिळेनासा झाल्यामुळें माझें घर तुला वर्ज होईल असें तूं समजूं नको. तूं मजवर आसक्त झाल्याकारणानेंच तुला ही अशी निकृष्ट दशा एकाएकीं प्राप्त झाली आहे हें मी जाणतें; व याकरितां, कृतज्ञतेला स्मरून, मी तुजवर उलटून पडणार नाहीं हें तूं पक्कें समज. तुझ्यासारखेच माझ्या येथें येणारे दुसरे कित्येक गृहस्थ आहेत, त्यांजकडून जें मला मिळेल त्यापैकीं अर्धा हिस्सा मी तुला देत जाईन; व अशा रीतीनें तूं जें माझ्याकरितां इतकें द्रव्य उधळिलें आहेस तें तुझें तुला सव्याज मिळेल असें करीन.' असें बोलून ती त्या दिवसापासूनच आपल्या वचनाप्रमाणें वागूं लागली, व त्यामुळें पूर्वींप्रमाणेंच माझी पुनः चंगळ सुरू झाली. तेव्हां तरी मीं शुद्धीवर येऊन बेताबातानें वागावें, पण, तसें मुळींच केलें नाहीं! असो. दिलनवाज हिचा मजवर पूर्ण

विश्वास असून ती सदोदित माझ्या तंत्रानें वागत असे. याप्रमाणें आह्मीं कित्येक वर्षें मोठ्या आनंदांत घालविलीं.

कालेंकरून दिलनवाज हिच्या तारुण्याचा बहर निघून गेला; तिच्या गालाला सुरकुत्या पडल्या; व ती निस्तेज झाली. तेव्हां तिच्यावर फिदा असलेल्या सर्व लोकांनीं तिला सोडून दिलें. त्यावेळीं ती मोठ्या दुःखानें मला ह्मणाली, 'प्राणसख्या, मला जी सांप्रत जरा प्राप्त झाली आहे, ती सृष्टिक्रमाप्रमाणेंच प्राप्त झाली आहे; तरी पण तरुण व विषयासक्त लोकांच्या संगतींत व आर्जवांत राहण्याची मला बहुत दिवसपर्यंत संवय लागली असल्यामुळें, मजकडे आतां कोणी ढुंकूनही बघत नाहीं; हें पाहून मला परम असह्य दुःख होत आहे. माझ्या जिवाला समाधान कसलें तें मुळींच नाहीं, व मी रात्रंदिवस एकाद्या रुक्ष अरण्यांत पडल्याप्रमाणें कष्टी होत आहें. या दुःखाच्या निवारणाचा एक उपाय माझ्या मनांत आला आहे, तो तुला सांगतें: फारन नांवाच्या अरण्यांत बेद्रा या नांवाची जादुविद्येंत निपुण अशी जगद्विख्यात स्त्री राहत आहे. तिचा असा लौकिक आहे कीं, सृष्टीच्या व्यापारांची तिला घडामोड करतां येते. फार काय सांगावें? तिच्या हुकुमानें नद्यांचे ओघ खालीं समुद्राकडे चाललेले असतात ते उगमांकडे वळतात; सूर्य नाहींसा होऊन सर्व अंधारमय होतें; व चंद्राची गति मध्येंच खुंटते! त्या स्त्रीला जाऊन एकदां भेटावें असें माझ्या मनांत फार आलें आहे. फारन अरण्याच्या कोणत्या भागांत ती राहते तें मला माहीत आहे. ती ज्या अर्थीं एवढी पराक्रमी आहे त्या अर्थीं, जरा प्राप्त झालेलीं मनुष्यें तरुण व सुंदर दिसावीं असाही एकादा मंत्र कदाचित् तिला साध्य असेल. तो मंत्र तिनें मला सांगितल्यास माझा जन्म अक्षय्य सुखांत जाण्यास काय हरकत आहे?' मीं तीस ह्मटलें, 'असें होईल तर फारच उत्तम. तूं तिच्याकडे जाच. मीही ह्मणशील तर तुझ्याबरोबर येतों.' ती ह्मणाली, 'ठीक आहे, चला तर उद्यांच आपण निघूं.' याप्रमाणें ठरल्यावर आह्मीं प्रवासास पुरेशी अन्नसामुग्री आणि त्या मांत्रिक स्त्रीकरितां कांहीं नजराण्याच्या चिजा घेऊन फारन अरण्याचा रस्ता धरिला.

आह्मी दोन दिवसांनीं त्या अरण्यांत जाऊन पोहोंचलों. दिलनवाज हिनें मला दूर एक डोंगर दाखविला, व 'या डोंगरावर ती स्त्री राहते' असें ह्मणाली. मग आह्मी त्या डोंगरापाशीं गेलों, तों तेथें फार खोल व प्रशस्त अशी एक गुहा आमच्या दृष्टीस पडली. त्या गुहेनजीक आह्मी गेलों असतां तींतून हजारों अपशकुनदर्शक पक्ष्यांचे दीनवाणे पण कर्कश असे शब्द आह्मांस ऐकूं आले. ते पक्षी इतके मोठे, विद्रूप व भयंकर होते कीं, त्यांना पक्षी ह्मणण्यापेक्षां पक्षिरूपी राक्षसच ह्मटल्यास शोभेल. आह्मी गुहेच्या दाराशीं गेलों तों आंत एक दिवा जळत होता, त्याच्या मंद उजेडांत एका मोठ्या चिन्यावर बसलेली एक जळमाणसासारखी अगदीं लहान अशी स्त्री आमच्या दृष्टीस पडली. तीच बेद्रा मांत्रिकीण होती. तिनें आपल्या गुडघ्यावर एक पुस्तक ठेविलें होतें, व तें ती वाचीत होती. तिच्या पुढें एक सोन्याची भट्टी होती व तींत एका रुप्याच्या भांड्यांत काळी माती असून ती माती विस्तवावांचून जळत होती!

आह्मीं गुहेमध्यें त्या स्त्रीजवळ जाऊन तिला मोठ्या आदरानें मुजरा केला, व तिजकरितां आणलेला नजराणा तिच्यापुढें ठेविल्यानंतर, दिलनवाज ही तिला उद्देशून पुढीलप्रमाणें बोलली, 'हे अपूर्व सामर्थ्यवान् व उदार स्त्रिये, तुझी लोकोत्तर कीर्ति ऐकून मी तुझें साहाय्य मागावयास आलें आहें. तूं सर्वसाक्षी व सर्वज्ञ आहेस, तेव्हां मला कोणत्या कामीं तुझी मदत पाहिजे हें सांगण्याची गरजच नाहीं.'

[ दिवस चोविसावा. ]

दिलनवाज याप्रमाणें बोलल्यावर बेद्रा ह्मणते, 'हो खरेंच; तुझें मनोगत मीं पूर्वींच जाणलें आहे, तेव्हां तुला बोलण्याचें कांहींएक कारण नाहीं.' असें ह्मणून ती आंत अंधाऱ्या जागेंत गेली, व तेथून दोन कांचेच्या कुंड्या घेऊन आली. त्या तिनें जमिनीवर ठेविल्या, व त्या प्रत्येकींत सोन्याची एकेक आंगठी टाकिली. नंतर तिनें आपलें पुस्तक उघडून त्यांतून कांहीं मंत्र वाचले. हें चाललें असतां त्या कुंड्यांपैकीं एकींतून विस्तवाची ज्वाळा निघाली, व दुसरींतून काळा

कुळकुळीत असा धूर निघाला. तो धूर जसजसा हवेंत चालला, तसतसा त्याचा मोठा लोट होत जाऊन एक फार मोठी भयंकर मेघगर्जना झाल्याबरोबर तो नाहींसा झाला !

नंतर त्या दुसऱ्या कुंडींतील विस्तवही नाहींसा झाला. मग बेद्रा हिनें त्या कुंड्यांतील आंगठ्या बाहेर काढल्या, व एक आंगठी दिलनवाज हिच्या हातांत घालून ह्मणाली, 'बाई, जा तूं आतां. तुझा हेतु परिपूर्ण झाला. इतःपर तूं सदा सर्वदा आनंदांत राहशील. या आंगठीच्या सामर्थ्यानें कोणत्याही स्त्रीचें रूप तुला प्राप्त व्हावें अशी तुला इच्छा झाली कीं, तिच्यासारखी तूं दिसूं लागशील—ती इतकी कीं, तिच्यांत व तुझ्यांत केंसाइतकाही फरक काढण्याची कोणाची प्राज्ञा होणार नाहीं.' नंतर बेद्रा मजकडे वळून ह्मणते, 'आणखी माकबेल, ही दुसरी आंगठी मी तुला देतें. हिचाही गुण दिलनवाज हिला दिलेल्या आंगठीप्रमाणेंच आहे; ह्मणजे, ज्या कोणा पुरुषाचें रूप प्राप्त व्हावें असें तुला वाटेल, त्याच्यासारखा तूं सर्वप्रकारें होशील. त्याच्यांत व तुझ्यांत लेशमात्र फरक राहणार नाहीं.' असें ह्मणून तिनें ती दुसरी आंगठी माझ्या हातांत घातली.

ह्या दोन अमोलिक देणग्यांबद्दल आह्मीं बेद्रा हिचे फार आभार मानले, आणि तिचा निरोप घेऊन निघालों. आमच्या आंगठ्यांच्या गुणाची प्रतीति पाहण्याविषयीं आह्मांला एवढी उतावळी झाली होती कीं, दामास शहरीं पोहोंचण्याइतका सुद्धां आह्मांला धीर निघाला नाहीं; तर आह्मीं तेथच्यातेथें त्या अरण्यांतच त्याबद्दलचा अनुभव पाहण्याचा निश्चय केला. आह्मी आपल्या ओळखीच्या माणसांसारखें होण्याची इच्छा केली तों लागलींच आह्मी सर्वप्रकारें तत्तुल्य होऊन गेलों ! हें पाहून आह्मांस अतिशय आनंद झाला, व आह्मी जलदी करून दामास येथें जाऊन पोहोंचलों. तेव्हां दिलनवाज हिला आपल्या हातांतील आंगठीचा उपयोग केल्यावांचून मुळींच स्वस्थ बसवेना. मग तिनें शहरांतील मोठमोठ्या श्रीमंत, हौशी, व सुंदर पुरुषांशीं रममाण होऊन त्यांजपासून आपली तुंबडी भरून घेण्यासाठीं त्यांच्या बायकांचीं रूपें घेण्याचा क्रम चालविला. मींही

ही त्याचप्रमाणें केव्हां केव्हां गमतीखातर, व केव्हां केव्हां चोऱ्या करण्याकरितां, कधीं या मनुष्याचें, कधीं त्या मनुष्याचें, अशीं निर निराळीं रूपें धारण करण्याचा उपक्रम चालविला.

याप्रमाणें आह्मीं कित्येक दिवस दामास शहरीं मनमुराद चैन व गमती केल्यानंतर, आह्मांस प्रवास करण्याची हुकी आली. तेव्हां आह्मी मिसर देश सोडून कित्येक मोठमोठी शहरें हिंडलों, व येतां येतां यैमण लोकांच्या देशांत आलों. तेथील हकीकत आह्मांस अशी कळली कीं, तेथला राजा कांहीं दिवसांपूर्वीं मरण पावला असून त्यास एकुलती एक कन्या आहे; व तीच हल्लीं राज्यावर असून राज्याचा कारभार, वजीर अली बिन हयात हा चालवीत आहे. परंतु माजी रायाचा भाऊ मुआफक याच्या पक्षाच्या कांहीं लोकांच्या मनांत त्यास राज्यावर बसवावयाचें होतें, पण तो मोंगल लोकांबरोबर एकदां लढाईस गेला तेव्हांपासून त्याचा ठिकाण नसल्यामुळें, तो मरण पावला असा सर्वांचा समज झाला आहे. हें ऐकून आह्मांला वाटलें कीं, या ठिकाणीं आपल्याला चांगली शिकार साधणार आहे. दिलनवाज मला ह्मणाली, 'तूं आतां मुआफक हो ह्मणजे झालें; मग हें सारें राज्य आपलेंच आहे असें समज.'

मला ही गोष्ट फार पसंत पडली. मग मीं युक्तिप्रयुक्तीनें, जींत मुआफक पडला ह्मणून वार्ता होती, ती लढाई केव्हां, कशी झाली, वगैरे वर्तमान समजून घेतलें. नंतर, राज्यांत जे कित्येक मुआफक याचे जिवलग स्नेही अमीर उमराव होते, त्यांची मीं माहिती करून घेतली. इतकें झाल्यावर, आपणांला मुआफक ह्मणून प्रकट होण्यास आतां कांहीं हरकत नाहीं असें वाटून त्यासारखा बनण्याची मीं इच्छा केली; व शेवटीं परदेशांतून आल्याचें ढोंग करून त्या अमीरउमरावांच्या भेटी घेतल्या. मला पाहून त्यांस पराकाष्ठेचा आनंद झाला, व मी राज्यावर बसण्याचा आपला हेतु त्यांस समजावितांच त्यांनीं मला कायावाचामनेंकरून सर्वप्रकारें सहाय्य करण्याचें कबूल केलें, व ते तत्काळ त्या उद्योगास लागले. त्यांनीं बहुतेक सर्व लोकांचीं मनें मजकडे वळवून माझ्या नांवानें बंडाचा झेंडा उभारिला.

याप्रमाणें मला सर्व प्रकारें अनुकूलता झाल्यामुळें वजीर अली यांचें कांहींएक न चालून नैमण लोकांनीं मला आपला राजा ह्मणून प्रसिद्ध केलें, व मजशीं प्रजाधर्मानें वागण्याविषयीं रीतीप्रमाणें शपथा घे-तल्या. मीं राज्यपदारूढ झाल्याबरोबर प्रथमतः माजी राज्याची कन्या हीस कैद करून आपल्या महत्त्वाकांक्षेस बळी देण्याचा निश्चय केला. परंतु अली यानें मोठी हुशारी करून राजकन्येस राज्याबाहेर पळविलें, व अशा प्रकारें तिचा जीव वांचविला. तेव्हां मी इकडे अर्थातच अगदीं निर्वैर होऊन राज्याचा उपभोग स्वतंत्रपणें घेऊं लागलों. ज्यांनीं मला साहाय्य केलें होतें, त्या सर्वांस मीं राज्यांतील मोठमोठीं कामें सांगून दुसऱ्या अनेक प्रकारांनीं त्यांची बढती केली. सारांश, मी खरा राज्याचा मालक असतों तर मला आपल्या अधि-काराचा जसा उपयोग करावयास पाहिजे होता तसाच मीं केला. दिलनवाज हिनें एका तरुण व सुंदर स्त्रीचें रूप धारण करून ती माझी राणी होऊन बसली. तिजविषयीं मीं अशी बतावणी केली कीं, मी मोंगल लोकांबरोबर लढतांना पराभव पावून पळून गेलों असतां एका राजाच्या आश्रयास जाऊन राहिलों, व त्यानें माझी विपन्न दशा पाहून माझें सांत्वन करण्यासाठीं आपल्या कन्येशीं माझें लग्न करून दिलें; तीच ही माझी राणी होय. दिलनवाज हिला मीं राजवाड्यांत एक मोठा भव्य व अत्यंत सुंदर असा महाल नेमून देऊन तिच्या शुश्रूषेकरितां कित्येक दासी दिल्या. त्यांपैकीं जिच्या जिच्याकडे जें जें काम होतें तें तें तिनें उत्तम प्रकारें बजा-वून दिलनवाज हिला फार खुष ठेविलें व सुख दिलें. महाराज, याप्रमाणें आमचे दिवस मोठ्या सुखांत चालले असतां आपल्या दर-बारांतून वकीलमंडळ येऊन त्या वकिलांनीं मला सांगितलें कीं, 'तुह्मी वास्तविक राज्याचे मालक नसून कपटानें व अन्यायानें राज्य बळकावून बसलां आहां; तर तें तुह्मी, राज्याची खरी मालकीण जी माजी राजाची कन्या तिच्या स्वाधीन ताबडतोब करा, नाहींपेक्षां लढाईस तयार व्हा.' तेव्हां मी मनांत तर घाबरून गेलों, पण बा-ह्याकारीं तसें न दाखवितां वकिलांस जबाब दिला कीं, 'आह्मी तुमच्या

धन्याचें ह्मणणें ऐकत नाहीं; त्याला वाटेल तें त्यानें करावें.' हा जबाब घेऊन आपलेकडील वकील निघून गेल्यावर मी व दिलनवाज मिळून या गोष्टीचा विचार केला; तेव्हां आमच्या लक्षांत आलें कीं, आपल्या पुढें आमचा टिकाव लागणार नाहीं. त्यावरून आह्मीं निरुपायास्तव राज्य सोडून देण्याचा निश्चय केला; परंतु याबद्दल आपला व राजकन्येचा सूड घेण्याचा बेत आह्मीं केला व तो येणें-प्रमाणें अमलांत आणिला.

[ दिवस पंचविसावा. ]

मीं कांहीं दिवस आजारी असल्याचें ढोंग केलें. नंतर मी मरण पावलों असें लोकांस भासविण्याकरितां मी प्रेतरूप बनलों. मग मला लोकांनीं समारंभानें मूठमाती दिल्यावर, दिलनवाज ही रात्रीं त्या ठिकाणीं आली, व तिनें माझें थडगें उघडलें. नंतर आह्मीं दोघें आपलीं मूळचीं रूपें धारण करून तेथून निघालों. येतां येतां आह्मी आपल्या राजधानीस आलों. तों नैमण लोकांच्या राज्याची खरी मालकीण ह्मणजे आपली राणी, इजकडे त्या लोकांनीं आपणांपैकीं कांहीं थोर व संभावित लोक पाठविले होते, ते आह्मीं पाहिले. त्या लोकांनीं येऊन जेव्हां आपणांस कळविलें कीं, 'आपल्या राणीचा चुलता मरण पावला असून सर्व नैमण लोक तिचा अधिकार कबूल करण्यास व तिची एकनिष्ठपणें सेवा करण्यास तयार आहेत,' तेव्हां आपण पूर्वी मजवर पाठविण्याकरितां जें सैन्य तयार केलें होतें तें परत बोलाविलें, आणि आपल्या राणीच्या ऐवजीं वजीर अली यास नैमण लोकांवर राज्य करण्यास पाठविण्याचा निश्चय केला.

मग इकडे दिलनवाज व मी अशीं एके दिवशीं आपल्या वाड्यांत शिरलों. तिनें आपल्या राणीच्या एका तरुण दासीचें रूप घेतलें होतें व मी आपला एक खोजा बनलों होतों. या आमच्या रूपांनीं आह्मी आपल्या वाड्यांत शिरलों तेव्हां आपण पलंगावर झोंपीं गेला असून आपली राणी कांहीं अंतरावर कुराण वाचीत बसली होती, त्यामुळें आह्मांस आपला बेत सिद्धीस नेण्याची उत्तम संधि सांपडली. दिलनवाज ही राणीचें रूप घेऊन आपल्या शेजारीं

येऊन निजली व आपली राणी वाचन आटोपून पलंगाकडे येत असतां मी भयंकर पिशाचाचें रूप घेऊन तिच्या दृष्टीस पडलों. तेव्हां ती भिऊन ओरडली, आणि मी अदृश्य झालों. यानंतर, महाराज, पुढें कसकसा प्रकार घडला तो आपणांला सर्व माहीतच आहे. आतां फक्त आज मीं आपलें रूप कां धारण केलें होतें, एवढें सांगण्याचें राहिलें तें सांगतों. आज सकाळीं आपण बाहेर गेलां असतां मी किल्ल्यामध्यें आलों, आणि आपल्या एका खोजाचें रूप घेऊन दिलनवाज ही महालांत निजली होती तेथें गेलों. तेव्हां ती मला ह्मणाली 'माकबेल, आपला पोषाख उतर आणि राजाचें रूप घेऊन माझ्याशीं रममाण हो.' तिनें सांगितल्याप्रमाणें मी करून तिच्या शेजारीं जाऊन निजलों, इतक्यांत आपण मागील जिन्यानें येऊन महालाचें दार उघडून आंत आलां. आपण आल्याबरोबर मजवर तरवारीचा वार करूं लागलां, पण मी तो बहुतेक चुकवून आपल्या हातून निसटलों. तथापि माझ्या पापाचा घडा पुरता भरल्यामुळें मला आतां शिक्षा झालीच पाहिजे असें परमेश्वरास वाटून, त्यानें मला आपल्या स्वाधीन केलें; आणि महाराज, मी स्वतःही कबूल करतों कीं, मला या वेळीं मरणाखेरीज दुसरी शिक्षाच योग्य नाहीं! यास्तव माझा हा सर्व वृत्तांत ऐकून जर आपणांला वाटत असेल कीं, आपण मला जें अभय दिलें तें अयोग्य केलें, तर आपण खुशाल आपला शब्द परत घ्यावा, व मला मरणच योग्य आहे असें स्वतः ह्मणणारा जो मी, त्या माझें शिर याच क्षणीं आपल्या तरवारीनें धडापासून मोकळें करावें. मी कांहींएक त्याबद्दल ह्मणणार नाहीं.

तिबेटचा राजा ह्मणतो, 'हें तर खरेंच कीं, तुझ्या दुष्ट कृत्यांची भागीदारीण ती चेटकी जशी माझ्या हातून प्राणास मुकली त्याप्रमाणें तुलाही, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें माझ्या हातून मरण प्राप्त होणें हें अगदीं योग्य आहे. तुह्मासारखे दुष्ट प्राणी जिवंत ठेवणें ह्मणजे पृथ्वीवर पापाचे डोंगर वाढूं देणें होय. तरी पण, ज्याअर्थीं माझा शब्द तुझ्याशीं गुंतला आहे, त्याअर्थीं मी तुला जीवदान देतों. मात्र जिच्या योगानें तूं असलीं नीच कृत्यें केलींस ती आंगठी मी

तुजजवळून घेतल्यावांचून राहणार नाहीं; ह्मणजे इत:पर मनुष्यमात्रास तुजपासून इजा होण्यास मार्ग न राहून अशा खलडपणांत तुला आपले बाकीचे दिवस घालवावे लागतील, हीच त्यांतल्या त्यांत तुला आणखी आयतीच शिक्षा होईल.'

## तिबेटचा तरुण राजा व नैमण लोकांच्या राजाची कन्या यांची गोष्ट. (पुढें चालू.)

हें तिबेटच्या राजाचें बोलणें संपत आहे तोंच चीनचा पातशाह त्याजकडे दौड करीत आलेला त्याच्या दृष्टीस पडला त्याच्या पोषाखावरून तो कोणी थोर मनुष्य असावा अशी राजानें सहजच कल्पना केली. रझवानशाह येऊन पोहोंचतांच घोड्यावरून खालीं उतरला, व राजास सलाम करून ह्मणतो, 'महाराज, मी आपल्याला फार आनंदकारक बातमी सांगण्यास आलों आहें. आपली साध्वी राणी, नैमण लोकांच्या राज्याची मालकीण, ही अद्यापि जिवंत आहे. तुह्मीं तिचा अपमान करून तिला हद्दपार केलें, व त्यामुळें तिला मोठमोठीं संकटें भोगावीं लागलीं, तथापि तिच्या जिवास कांहीं एक इजा झाली नसून ती सुखरूप आहे, व आजच्या आजच ती तुमच्या दृष्टीस पडण्यासारखी आहे.' हें ऐकून तिबेटच्या राजास इतका हर्ष झाला कीं, आपण जें काय ऐकतों तें स्वप्न तर नाहींना? असें त्यांस भासलें. मग आनंदाश्रु ढाळून ह्मणतो, 'देवा, म्यां दुष्टानें तिचा विनाकारण छळ करून तिला विलक्षण दुःख भोगावयास लाविलें असतां तूं तिला जिवंत व सुखरूप ठेविलीस, ही तुझी केवढी तरी अगाध करणी! व मजवर हा तुझा केवढा तरी प्रसाद होय!' मग पातशाहास ह्मणतो, 'महाराज, आपण मला जी ही बातमी सांगितली, तीवरून माझ्या येथें जो कांहीं या गोष्टीसंबंधानें अलौकिक प्रकार घडून आला, तो आपणांला सर्व विदित असावा असें मला वाटतें. तर आपणांला माझी अशी विनंति आहे कीं, आपण कोण, कोठचे, वगैरे हकीकत मला कृपा करून सांगावी.' पातशाह ह्मणतो, 'मी एक आपला मुशाफर आहें एवढें तूर्त तुह्मांला सांगतों; मग पुढें योग्य वेळीं मी तुह्मांला आ-

पलें नांव गांव सांगेन. आपल्या राणीची व माझी केवळ सहज-गतीनें गांठ पडून तिनें मला आपली सर्व हकीकत सांगितली. तसेंच आज सकाळीं किल्ल्यांत जो काय प्रकार घडला तोही अली व-जीर ह्यानें मला सांगितला. अली हा सांप्रत आपल्या राणीच्या ज-वळ असून त्या दोघांची व आपली भेट आतां लौकरच करितों.' हें ऐकून तिबेटच्या राजाचा आनंद त्रिभुवनांत माईना. आपल्या प्रिय पत्नीस भेटण्याची त्याला पराकाष्ठेची उतावळी होऊन त्यानें त्या दुष्ट माकबेलच्या हातून चटकन् ती आंगठी घेतली व त्यास तेथेंच सोडून देऊन तो लागलाच घोड्यावर बसला, आणि चीनच्या पातशाहाबरोबर, राणी व वजीर यांजकडे यावयास निघाला.

[ दिवस सव्विसावा. ]

चीनचा पातशाह व तिबेटचा राजा हे दोघे, ज्या ठिकाणीं व-जीर अली बिन हयात हा व तिबेटची राणी हीं बसलीं होतीं, तेथें लौकरच येऊन पोंहचले.

तिबेटच्या राजानें घोड्यावरून उतरतांच एकदम आपल्या राणीस कवटाळून धरिलें. त्याला प्रेमाचें अतिशय भरतें येऊन तो ह्मणतो, 'प्रिये, तुझी म्यां निष्ठुरानें अति दुर्दशा केली असतां मजविषयीं तुझें प्रेम कमी व्हावें हें साहजिक आहे. पण प्रिये, माझ्या हातून जरी एवढा घोर अपराध घडला हें खरें आहे, तरी मीं तो समजून उमजून केला नाहीं, व त्या योगानें तुझ्या शत्रूचा सूड घेण्यास मला संधि सांपडली, ह्या गोष्टी लक्षांत आणून तूं मला क्षमा कर-शील अशी मी आशा करतों.' राणी ह्मणते, 'महाराज आपण या संबंधानें मनाला कांहींएक खेद वाटूं देऊं नये; कां कीं, एक तर, होऊन गेलेल्या गोष्टी फिरून येत नाहींत, व दुसरें असें कीं आपल्या हातून गैरसमजानें चूक झाली असून त्या चेटकीचें तरी एवढें सा-मर्थ्य कीं तिच्यांत व माझ्यांत यत्किंचितही फरक आपणांला दिस-ण्यास मार्ग नव्हता. तेव्हां आपणाला तरी मी दोष कसा देऊं?' राजा ह्मणतो, 'छे छे! तसें तर नाहींच माझा अपराध मुळींच, क्षम्य नाहीं असें मला तर वाटतें; कारण, त्या दुष्ट चेटकीच्यांत

व तुझ्यांत जरी मला पूर्ण साम्य दिसलें, तरी, तुझ्या मनाचे धर्म व तुझें चातुर्य हीं मी पूर्णपणें जाणत असून त्यांचा तिच्या ठायीं मुळींच अभाव होता, यावरून मीं तुला ओळखावयाला पाहिजे होतें यांत कांहीं संशय नाहीं.' असो; याप्रमाणें त्या उभयतांच्या भेटी झाल्यावर त्यांना जो आनंदातिशय झाला त्याचा त्यांनीं पूर्ण अनुभव घेतल्यानंतर राणीनें राजास विचारलें, 'ती स्त्री आपली खरोखरीची बायको नव्हे हें पुढें आपल्याला कशावरून समजलें?' त्यावरून, किल्ल्यावर सकाळीं घडलेली गोष्ट राजानें तिला इत्थंभूत सांगितली. मग शेवटीं तो ह्मणतो—तिनें क्षमेसाठीं मजपुढें हात जोडले असतां त्यांवर मीं रागाच्या आवेशांत वार केला. तेव्हां ज्या तिच्या हातांत आंगठी होती तो हात तुटून पडल्याबरोबर तिचें तारुण्य व सौंदर्य नाहींसें होऊन ती अगदीं जरुखड ह्मातारी अशी निव्वळ राक्षसीच मला दिसूं लागली. नंतर आपला सर्व अपराध कबूल करून ती मला ह्मणाली, 'ज्याच्या योगानें तुला मोहनी पडली होती त्या मंतरलेल्या आंगठीसह माझा हात तुटून पडला, त्यामुळें माझें खरें स्वरूप तुह्मांला दिसलें. असो; पण महाराज, आतां आपण कृपा करून माझा जीव घेऊं नका.' मीं तीस ह्मटलें, 'अगे दुष्टे, इतःपर तूं जिवंत राहण्याची आशा सोडून दे. तुझा अपराध क्षमा करण्यास मुळींच योग्य नाहीं. तूं जर मला एकट्यालाच त्रास दिला असतास, तर कदाचित् तुझी मला दया आली असती. पण माझ्या प्रियेचा व माझा तूं वियोग केलास, व त्या बिचाऱ्या निरपराध स्त्रीस वनवास भोगावयास लावलेंस,—इतकेंच नव्हे, तर तिला आपलें दुःख असह्य होऊन बहुधा तिनें प्राणत्यागही केला असावा असें मला खचीत वाटतें,—त्याअर्थीं, तुझा जीव घेतल्यावांचून मी कदापि सोडणार नाहीं.' असें ह्मणून तत्काळ मीं तरवारीनें त्या रंडकीचा शिरच्छेद केला. यानंतर, ज्या नीच जादुगारानें राजाचें स्वतःचें रूप धारण केलें होतें, तो किल्ल्यावरून पळून गेला असतां त्याला त्यानें गांठून त्याच्या जवळची आंगठी हिसकावून घेतल्यावर त्याचें मंत्रसामर्थ्य नाहींसें होऊन तो कसा

दिसूं लागला, तसेंच, त्यानें व दिलनवाज हिनें आपल्या आंगठ्यांच्या प्रभावानें कांहीं दिवस नैमण लोकांवर राज्य केल्याची जी हकीकत त्याच्या तोंडून राजानें ऐकिली होती, तो सर्व प्रकार त्यानें राणीस सांगितला.

ही सर्व हकीकत राणी व वजीर अली यांनीं फार लक्षपूर्वक ऐकिली. ती ऐकून त्यांस पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. नंतर तिबेटचा राजा चीनच्या पातशाहाकडे वळून ह्मणतो, 'अहो मुशाफर साहेब, आह्मी या प्रसंगीं जें अनुपम सौख्य भोगीत आहों त्यास बहुत अंशीं तुह्मी कारण आहां; तर तुमचे उपकार कोणत्या प्रकारें फेडूं तें मला सांगा. तुह्मी मनांत कांहींएक संकोच न धरतां, जें काय वाटेल तें मागा, मी तें तुह्मांस मोठ्या आनंदानें देईन.' चीनचा पातशाह त्यास उत्तर करणार, इतक्यांत तिबेटची राणी त्यास थांबवून आपल्या पतीस ह्मणते, 'महाराज, ज्यांशीं आपण बोलतां ते हे थोर गृहस्थ कोण आहेत हें आपणांला ठाऊक नाहींसें दिसतें. हे चीनच्या अवाढव्य राज्याचे खुद्द मालक आहेत.' हें ऐकून तिबेटच्या राजास मोठा संकोच वाटला, व तो पातशाहास ह्मणतो, 'महाराज, आपली थोर पदवी मला माहीत नसल्यामुळें मजकडून आपला अपमान झाला याबद्दल मला क्षमा असावी.' पातशाहानें त्यास ह्मटलें, 'छे छे! तुह्मी तसें कांहीं मनांत आणूं नका. तुमची कांहींएक चूक नाहीं.' इतकें बोलणें झाल्यावर ते दोघे मोठ्या प्रेमानें एकमेकांस कडकडून भेटले. नंतर हीं सर्व माणसें तिबेटच्या राजाच्या राजधानीस गेलीं. तेथें गेल्यावर पूर्वसंकेताप्रमाणें वजीर अली बिन हयात यास तिबेटच्या राजानें नैमण लोकांवर राज्य करावयास पाठविलें, व याप्रमाणें तिकडील व्यवस्था लागली; आणि तिबेटचा राजा व राणी यांचें पूर्वीपेक्षांही एकमेकांवर अधिक प्रेम बसून तीं आपल्या राज्याचा निर्विघ्नपणें उपभोग घेऊं लागलीं. तसेंच कांहीं दिवस तेथें पाहुणचार घेतल्यानंतर चीनचा पातशाह आपल्या राजधानीस निघून गेला.

## रझवानशाह पातशाह आणि शेहरिस्तानी राजकन्या यांची गोष्ट. (पुढें चालू.)

चिनचा पातशाह परत सुखरूप आपल्या राजधानीस येऊन पोहोंचला. त्यानें आजपर्यंतच्या प्रवासांत घडलेली सर्व हकीकत आपल्या वजिरास सांगितली. तींपैकीं मुख्य भाग जो तिबेटचा राजा व राणी ह्यांच्या संबंधाचा होता तो ऐकून वजिरास महदाश्चर्य वाटलें. त्यावरून, जादुगारांच्या संगतीनें कसकसे वाईट परिणाम होतात हें त्याच्या विशेष लक्षांत येऊन तो पुनः आपल्या धन्यास ह्मणतो, 'महाराज, आपणांस माझी फिरून एकवार विनंति आहे कीं, त्या यक्षिणीचा आपण नाद सोडून दिला असतां फार बरें होईल. कारण, खरें पुसाल तर मला असें वाटतें कीं, आतां आपण जी हकीकत सांगितली तींतील दुष्ट चेटकी जी दिलनवाज, तिजप्रमाणें शेहरिस्तानी हीही लबाड चेटकी असावी. पातशाहाच्या मनावर वजिराच्या ह्या बोलण्याचा बराच परिणाम होऊन त्याचाही या वेळेपासून त्या यक्षिणीविषयीं तसाच ग्रह झाला, व त्यानें तिचा नाद बहुतेक सोडून दिला.

एके दिवशीं सकाळीं पातशाहाच्या दरबारांत प्रधान, अमीर उमराव वगैरे सर्व मंडळी जमली असतां नेहमींप्रमाणें पातशाहाची स्वारी दरबारांत यावयाची ती न आल्यामुळें, त्या गोष्टीच्या कारणाचा शोध करितां असें समजलें कीं, आदले दिवशीं रात्रीं तो महलांत जाऊन निजला, तेव्हांपासून कोणाच्याही दृष्टीस पडला नाहीं. तेव्हां जिकडे तिकडे सांडणीस्वार त्याच्या शोधार्थ ताबडतोब रवाना झाले. याप्रमाणें त्याचा पुष्कळ शोध केला, पण कोठेंही तलास लागेना. अशाप्रकारें पुष्कळ दिवस गेल्यावर सर्व लोकांची त्याविषयीं निराशा झाली, व त्यांना पराकाष्ठेचें दुःख झालें. त्यानिमित्त दरबारांतील सर्व लोकांनीं त्या देशाच्या रिवाजाप्रमाणें आपल्या तोंडास पिंवळा रंग लाविला, व सिंहासनापुढें गुलाबाचीं फुलें पसरून ते दररोज शोक करूं लागले.

परंतु वजीर हा एवढ्यानेंच स्वस्थ राहिला नाहीं. पातशाहाच्या ठायीं

त्याचें पराकाष्ठेचें प्रेम असल्यामुळें तो नाहींसा झाल्याबद्दल त्याला अमर्याद दुःख झालें. तो मनांत ह्मणाला, 'माझ्या धन्याचें काय झालें असेल कोण जाणे! तो का पुनः प्रवास करावयास गेला, का एखाद्या चेटकीनें त्यास पुनः पळवून नेलें, का तो आपल्याच खुषीनें आह्मांस सोडून गेला, नकळे! छे, पण ही शेवटची गोष्ट तर त्याचे ह्यातून कदापि होणार नाहीं; कां कीं, त्याच्या ठायीं आमची जी भक्ति आहे ती तो पूर्णपणें जाणत आहे; यामुळें आह्मांला बुद्ध्या तो दुःखार्णवांत पाडणार नाहीं हें खचीत. तर एकंदरीनें माझी मनोदेवता असें सांगते कीं, त्याला आह्मांपासून हरण करण्याचें कृत्य कोणा दुष्ट चेटकीचेंच असावें.'

याप्रमाणें वजीर व दरबारचे बाकीचे लोक पातशाहाच्या वियोगजन्य दुःखांत अगदीं बुडून गेले होते; पण तो स्वतः ह्मणाल तर, शेहरिस्तान बेटामध्यें खुशाल मौजा मारीत होता. त्याला त्या ठिकाणीं राजकन्या शेहरिस्तानी, ह्मणजे जी सांप्रत त्या देशाची राणी झाली होती, तिनें मंत्रसामर्थ्यानें तेथें नेलें होतें. तिनें राज्यभार शिरावर घेतल्यावर कांहीं दिवसपर्यंत आपलें सर्व लक्ष राज्यसंबंधी व्यवस्था करण्याकडे लाविलें होतें. ती व्यवस्था लागल्यावर तिचें मन स्वस्थ झालें. तेव्हां चीनच्या पातशाहाच्या ठायीं आपलें प्रेम अद्यापि जशाचें तसेंच असून त्याचीही तशीच आपणावर आसक्ति असेल असें जाणून, त्यास आपण पूर्वी दिलेलें वचन पुरें केलें पाहिजे असा तिनें मनांत निश्चय केला. मग तिनें एका यक्षास गुप्तरूपानें त्याजकडे पाठवून त्याला आपल्या महलांत आणविलें. त्याची व तिची भेट होतांच तो तिला ह्मणतो, 'हे परमथोर राजकन्ये, मला अलीकडे असें वाटायला लागलें होतें कीं, तूं मला विसरून गेलीस; व यामुळें, तुझें समागमसौख्य आपल्याला कसचें प्राप्त होतें, असें समजून मी मनांत दुःख करीत होतों.' ती ह्मणते, 'महाराज, बहुत काळ वियोग झाला असतां त्याचा परिणाम तुह्मां मानवांवर जसा होतो तसा आह्मां यक्षांवर होत नाहीं. आमचें प्रेम जें एकदां बसतें तें अशा कारणानें कदापि नाहींसें होत नाहीं.'

पातशाह ह्मणतो, 'मी जरी मानव आहें तरी माझेंही तुजवरचें प्रेम कमी झालें आहे असें तूं बिलकूल समजूं नको. खरोखर काय सांगूं, तुझ्या वियोगांत जे माझे दिवस गेले, ते केवळ युगाप्रमाणें मला भासले; व चातक जसे मेघांची वाट पाहतात, तसे माझे नेत्र तुझ्या दर्शनाची मोठ्या उत्कंठेनें मार्गप्रतीक्षा करीत होते.' यक्षीण ह्मणते, 'तुह्मी ह्मणतां त्या संबंधानें माझी अगोदरच खात्री झाली आहे, व ह्मणून तुह्मांस मीं दिलेलें वचन आज पुरें करण्याचा निश्चय केला आहे. सारांश, आज तुमचा व माझा जन्माचा संबंध घडेल असें करण्याचा माझा विचार आहे'

[ दिवस सत्तावीसावा. ]

चीनच्या पातशाहानें यक्षांच्या राणीचे आभार मानले, व 'जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुजवर मी निरंतर प्रेम करीन' अशी शपथ वाहिली. यानंतर राणीनें राजवाड्यासमोर उत्कृष्ट प्रकारचा मोठा भव्य मंडप घालून त्यांत दरबार भरविण्याचा हुकूम केला, व त्या दरबारास राज्यांतील सर्व अमीर उमराव व इतर लोक यांस बोलाविलें. दरबार भरल्यावर सर्व लोकांस उद्देशून ती ह्मणाली, 'लहान थोर सर्व यक्षांनो, मी जें काय आतां बोलतें तें लक्षपूर्वक ऐका. माझ्या परमपूज्य पित्याच्या मरणानंतर तुह्मीं मला राज्याची मालकीण असें कबूल करून ज्याअर्थी सर्व राज्याचा कारभार माझ्या हातीं दिला, व मजशीं प्रजाधर्मानें व इमानानें वागण्याविषयीं शपथ घेतली, त्याअर्थीं मी जो हुकूम करीन तो तुह्मांस मान्य असला पाहिजे. माझा हुकूम असा आहे कीं, चीन नामक मोठ्या देशाचे पराक्रमी पातशाह रझवानशाह यांशीं मी लौकरच विवाह करणार आहें, यास्तव तुह्मीं सर्वांनीं त्यांस आपले धनी असें समजून त्याप्रमाणें त्यांस मान दिला पाहिजे.' राणीनें याप्रमाणें बोलून, हा पातशाह कोणता तो सर्व लोकांस दाखविला. त्याला पाहून, राणीनें आपणांस योग्य वराची योजना केली अशी सर्वांची खात्री झाली; व तिची फार वाहवा करून त्यांनीं पातशाहाच्या नांवाचा जयजयकार केला, आणि पातशाह हा जरी मानव असल्या-

मुळें यक्षांपेक्षां त्याची योग्यता खरोखरच कमी होती, तरी राणीला ते फार मानीत असल्यामुळें व तिला तो आवडला असल्यामुळें त्यांनीं त्यास राज्याधिकाराचीं वस्त्रें देण्याविषयीं यत्किंचितूही अंदेशा घेतली नाहीं.

याप्रमाणें पातशाहास राज्याभिषेक झाल्यावर यक्षांच्या राणीशीं त्याच्या विवाहाची तयारी सुरू झाली. त्यापूर्वी राणीनें पातशाहापासून एक गोष्ट कबूल करून घेतली. ती अशी. ती त्यास ह्मणाली, 'महाराज, पण माझी एक अट आहे ती आतां मी आपणांला सांगतें; ती आपण कबूल केली पाहिजे. कारण कीं, त्यापासून आपणां उभयतांचें कल्याण आहे. ही अट आपण नुसती कबूल करून उपयोग नाहीं, तर ती नेहमीं पाळण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे; कां कीं, आपण दुर्लक्ष करून तीप्रमाणें वागण्यांत अंतर केलें असतां आपल्या उभयतांच्याही जन्माचें मातेरें होणार आहे.' पातशाह ह्मणतो, 'प्रिये, तुझी काय अट आहे ती लौकर सांग, मला फार वेळ संशयांत ठेवूं नको. तुला काय बोलावयाचें असेल तें तूं फक्त बोलण्याचा अवकाश आहे. मी तें तत्क्षणीं कबूल करीन.' राणी ह्मणते, 'मी जें काय तुमच्यापासून कबूल करून घेणार आहें, तें तुह्मांला फार जड जाणार आहे, कारण, आह्मी यक्ष व तुह्मी मानव; तुमच्या व आमच्या मनाचे धर्म निरनिराळे; आमचे कायदे व रीतिभाती ह्या तुमच्याहून भिन्न; तेव्हां मी जें काय तुह्मांला सांगणार तें तुह्मी कबूल केल्यावर तुह्मांला तें गोड वाटो अगर कडू वाटो, न्यायाचें वाटो अगर अन्यायाचें वाटो, सदयपणाचें वाटो अगर निर्दयपणाचें वाटो, त्याकडे कांहींएक लक्ष न देतां कबूल केल्याप्रमाणें तुह्मीं वागलां नाहीं, तर तत्क्षणीं तुमची व माझी फाटाफूट होऊन आपण उभयतांही दुःखसागरांत पडूं.'

पातशाह ह्मणतो, 'प्रिये, तुझी अशी अट तरी कसली आहे, कीं ती मजकडून पाळली जाणार नाहीं? मला वाटतें, मनुष्यजातीविषयीं तुह्मां यक्षांचा एकंदरींत चांगला ग्रह नसावा, अथवा तुह्मांला आमच्या इमानीपणाबद्दल संशय फार असावा. तें कसेंही असो, पण मी

तुला वाटेल तशी शपथ वाहून सांगतों कीं, मी सर्वदा तुझ्या अंकित राहीन. फार काय, पण तूं इतकेंच पाणी प्या ह्मटलेंस तर त्याहून ज्यास्त पिणार नाहीं! याहून आणखी तें काय सांगूं?' राणी ह्मणते, 'असें असलें ह्मणजे ठीक आहे. मग माझें कांहीं ह्मणणें नाहीं. माझी अट काय ती एवढीच आहे कीं, तुह्मांला न अवडणारी अशी एकादी गोष्ट जर मीं तुमच्या समक्ष केली, तर तुह्मीं मला तिच्या-बद्दल दोष देऊं नये, किंवा रागें भरूं नये.' पातशाह ह्मणतो, प्राणप्रिये, एवढेंच ना! यांत काय आहे? मी तुझ्या कोणत्याही कृतीला दोष देईन असें तूं स्वप्नींही मनांत आणूं नको. उलट मी अशी तुला शपथ वाहून सांगतों कीं, तुझी प्रत्येक कृति मी पसंत करीत जाईन; व जशी तुजवर माझी अंत:करणापासून प्रीति आहे, तसेंच बोलण्याचालण्यांतही तुजशीं माझें अत्यंत प्रेमळ वर्तन राहील. आतां याउपर तुझा जर मजवर भरंवसा नसेल तर मी आपल्याला हतभाग्य समजेन!' यक्षीण ह्मणते, 'पुरे आतां; याहून ज्यास्त खात्री ती काय करावयाची आहे? तुमच्या शपथेवर माझा भरंवसा आहे. आतां मी ह्मणजे एकादी भलतीच गोष्ट तुह्मांला कबूल करावयाला लावीन असें तुह्मी समजूं नका; कारण, कोणतीही अयोग्य गोष्ट करणें हें यक्षांच्या जातीस मुळींच माहीत नाहीं. तथापि नुकतेंच मीं तुह्मांला सांगितलें आहे कीं, तुमच्या आमच्या चालीरीति व मनाचे धर्म निरनिराळे असल्यामुळें माझी एकादी कृति योग्य असून ती तुह्मांस अयोग्य दिसण्याचा संभव आहे; तेव्हां तसें झालें ह्मणजे तुह्मी मला कांहीं एक न ह्मणतां इतकेंच मनांत समजा कीं, हिला असें करण्याचें योग्य कारण असलें पाहिजे.' पातशाहानें फिरून एकवार तिला पूर्वीप्रमाणें वचन दिल्यावर मग त्या उभयतांच्या विवाहाखेरीज दुसरें कांहीं एक राहिलें नाहीं.

लग्नाचे दिवशीं राणीनें पातशाहास एका सोन्याच्या सिंहासनावर बसविलें, व नंतर आपण त्याच्या शेजारीं जाऊन बसली. मग दरबारचे अमीरउमराव त्यांच्यासमोर आपापल्या दरजाप्रमाणें रांगेनें बसले;

व राणीच्या सर्व दासी सिंहासनाच्या दोहों बाजूंस उभ्या राहिल्या. नंतर त्या लोकांच्या चालीप्रमाणें अमीरउमरावांनीं जे कांहीं विधि करावयाचे ते केले, व पातशाहास नजरनजराणे देऊन मुजरे केले. पुढें त्या विवाहानिमित्त त्यांनीं राजधानींत मोठा उत्सव केला. याप्रमाणें विवाह झाल्यावर पातशाह आनंदसागरांत केवळ निमग्न होऊन गेला, व राणीच्या मर्जीप्रमाणें सदोदित वागून, जेणेंकरून आपल्याठायीं तिची प्रीति वृद्धिंगत होईल असें करूं लागला. अशा प्रकारें सुखांत व चैनींत त्याचा काळ चालला असतां कित्येक दिवस त्याला चीनदेशाची आठवण देखील झाली नाहीं.

या उभयतांच्या लग्नास एक वर्ष पुरें होत आहे इतक्या काळांत राणी गरोदर राहून नियमित काळ पुरा झाल्यावर सूर्यासारखा तेजस्वी पुत्र तिला झाला. तेव्हां राज्यांतील सर्व लोकांनीं फिरून कित्येक दिवस मोठा उत्सव केला; व पातशाहानें, अशा देवांगनेसारख्या स्त्रीपासून आपणांस पुत्रप्राप्ति झाली या परमेश्वराच्या थोर प्रसादाबद्दल त्याचे अनंत उपकार मानले. ही पुत्रप्राप्तीची बातमी त्याला कळली त्या वेळीं तो अरण्यांत शिकारीस गेला होता. तेव्हां बातमी कळल्याबरोबर तो मोठ्या त्वरेनें राजधानीस निघून आला, व लागलाच पुत्रमुख पाहण्यासाठीं राणीच्या महालांत गेला. त्या वेळीं राणीही एका मोठ्या पेटलेल्या शेगडीशेजारीं त्या मुलास घेऊन बसली होती. पातशाहानें राणीपासून त्या मुलास घेऊन त्याचें हळूच चुंबन केलें, व तिजपाशीं त्यास परत दिलें. तेव्हां काय चमत्कार सांगावा! त्यास तिनें लागलीच त्या पेटलेल्या शेगडींत टाकिलें! व यापेक्षां विशेष सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, तत्क्षणीं तो विस्तव व तें मूल हीं अदृश्य झालीं!

[ दिवस अठ्ठाविसावा. ]

हा विलक्षण प्रकार पाहून पातशाह मनांत फार दुःखी झाला. पण राणीस पूर्वीं त्यानें वचन दिलें होतें, यास्तव आपल्याला कितीही दुःख झालें तरी त्याचा तिजपाशीं तोंडावाटें उच्चार करतां कामा नये असें जाणून त्याला स्वस्थ राहणें भाग पडलें. तो आपल्या म-

ह्मालांत गेला, आणि खिन्न होऊन आपल्याशींच ह्मणतो, 'मी खरोखर मोठा दुर्दैवी नव्हे काय? देवानें मला सोन्यासारखा पुत्र दिला, आणि त्याची आई त्याला स्वतः विस्तवांत टाकते ! असें असून तिच्या या कृत्याबद्दल तिला दोष न देतां मला उगीच बसणें भाग पडलें आहे ! अरेरे ! तिला आई तरी कसें ह्मणावें ! कां कीं, आईच्या हातून स्वतःच्या मुलाच्या संबंधानें असलें निर्दयपणाचें कृत्य कधींही होणार नाहीं;—हो, पण मला हें बोलतां कामा नये !—कारण, कदाचित् तिला तें समजलें तर तिची तब्यत जाईल, व मग भलताच अनर्थ होईल ! याकरितां हें जरी खरोखर तिचें अत्यंत क्रूरपणाचें कृत्य दिसत आहे, तरी तें तसें वस्तुतः नाहीं असें मानून व कृतीनें दाखवून मला ह्मटलें पाहिजे कीं, तिनें जें काय केलें तें योग्य कारणावांचून केलें नसेल.'

याप्रमाणें, पुत्राच्या मरणाबद्दल राणीस दोष देण्याविषयीं जरी पातशाहाचे मनांत फार आलें होतें, तरी त्याला निरुपाय होऊन स्वस्थ बसणें भाग पडलें. असो; पुढें आणखी एक वर्षानें राणीस एक कन्या झाली. ती तर रूपानें व तेजानें पुत्रापेक्षांही अधिक होती. पूर्वी पुत्राच्या जन्माच्या वेळेस ज्याप्रमाणें सर्व यक्षांनीं मोठा उत्सव केला, त्याप्रमाणेंच ह्या वेळींही केला. पातशाहाला तर त्या मुलीविषयीं इतका आनंद झाला कीं, तिला कितीही पाहिलें तरी त्याच्या नेत्रांची तृप्तीच होईना. सारांश, त्या मुलीनें त्यास पुत्रवियोगदुःखाचा पूर्ण विसर पाडिला. परंतु त्या बिचाऱ्या पातशाहाच्या कपाळीं हें सौख्य फार दिवस भोगण्याचें नव्हतें; कारण, मुलीला जन्मून थोडे दिवस झाले नाहींत तोंच राजवाड्यांत एक रानटी कुत्री आली, ती राणीच्या दृष्टीस पडतांच तिनें तिला हांक मारून ह्मटलें, 'ये ग इकडे. ती पाळण्यांत मुलगी आहे तिला घेऊन जा.' असें ह्मणतांच ती कुत्री पाळण्यापाशीं गेली, आणि त्या मुलीला तोंडांत धरून ती चालती झाली !

या गोष्टीमुळें तर पातशाहाच्या दुःखास पारावार नाहींसा झाला. मग जरी त्यानें, कसाही प्रसंग आला तरी राणीस त्यासंबंधानें बो-

लावयाचें नाहीं असें वचन दिलें होतें तरी, त्याला या वेळीं आपल्या मनाचें आकळून अगदीं करवेना. तो राणीस या कृत्याबद्दल अगदीं टाकून बोलण्याच्या विचारांत होता, परंतु त्याच्या तोंडाबाहेर शब्द निघण्यापूर्वीं त्यानें पुरता विचार करून बोलण्याचा प्रसंग टाळला. तथापि त्याला तेथें राहवेना, सबब तो आपल्या महालात अत्यंत दुःखी होत्साता निघून गेला. मग तो मनांत ह्मणतो, 'ह्या चांडाळणीस आपल्या प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याची अशी दशा करणें कसें बरें भावते? अशी सृष्टीविरुद्ध कृत्यें करण्यांत जर ह्या यक्षांना आनंद वाटत असेल, तर मी खचीत ह्मणतों कीं, आह्मां मानवांपेक्षां ते अधिक योग्यतेचे तर नाहींतच, तर उलटे फार दुष्ट व नीच आहेत. यांच्या रीतिभातींपेक्षां आमच्या रीतीभाती फारच चांगल्या यांत संशय नाहीं. राणी मला ह्मणाली होतीं कीं, यक्षांच्या हातून अयोग्य अशी गोष्ट कदापि घडावयाची नाहीं. यास्तव एकादे वेळीं माझें कृत्य जरी तुह्मांस वाईट वाटलें, तरी हिला असें करण्यास योग्य कारण असेल असें समजून तुह्मीं समाधान मानलें पाहिजे. पण आतां वास्तविक पाहतां हीं तिचीं कृत्यें अगदीं अयोग्य नाहींत काय? हँ, बरोबर आहे; आतां या गोष्टीचें कारण माझ्या लक्षांत आलें. मला खास वाटतें, यक्षांच्या कायद्यांत असें असावें कीं, जेव्हां त्यांच्यापैकीं कोणी मानवांशीं लग्न करील, तेव्हां त्या जोडप्यापासून जी संतति होईल ती जिवंत ठेवावयाची नाहीं; आणि ह्मणूनच राणीनें दोन वेळां असें निर्दयपणाचें व सृष्टिविरुद्ध कृत्य केलें असावें. अगे निर्दये, तुला वाटतें काय, कीं तुझ्या अशा वर्तनानें मी जन्मभर तुझा दास बनून राहीन? छी छी! तुजवर जरी माझें कितीही प्रेम असलें, तरी तुमच्या अशा ह्या क्रूर चाली मला कदापि सहन करवणार नाहींत.'

पातशाहास याप्रमाणें जरी मोठें दुःख होऊन राणीविषयीं त्याचा अत्यंत प्रतिकूल ग्रह झाला, तरी एवढ्या प्रसंगीं निदान तिला दुखवावयाचें नाहीं, मग पुढें काय होईल तें होवो, असें शेवटीं मनांत ह्मणून तो तिला कांहींएक बोलला नाहीं. पण या वेळेपासून शेह-

रिस्तान हा देश त्याला अगदीं उदासवाणा भासूं लागला. त्याला तेथें मुळींच चैन पडेनासें झालें. सबब, त्यानें स्वदेशास ह्मणजे चीन देशास जाण्याचा निश्चय केला. एके दिवशीं तो राणीस ह्मणतो, 'प्रिये, मला आपला देश सोडून फार दिवस झाले, यास्तव माझे प्रजेस माझ्या वियोगाचें फार दुःख होऊन मी कधीं येईन ह्मणून रात्रंदिवस ती मार्गप्रतीक्षा करीत राहिली असेल; याकरितां मला तेथें परत जाण्याची परवानगी दे.' राणी ह्मणते, ठीक आहे, मजकडून कांहीं हरकत नाहीं. तुह्मांला आपल्या प्रजेस भेटून तिचें सांत्वन केलें पाहिजे; व खेरीज, राज्यकारणसंबंधानेंही पाहिले असतां तुह्मांला तेथें जाऊन सर्व स्थिति आपल्या नजरेनें पाहणें हें अगदीं अगत्याचें आहे; कारण, माझ्या समजण्यांत असें आलें आहे कीं, मोंगल लोक हे तुमच्या राज्यावर स्वारी करण्याकरितां मोठें सैन्य तयार करीत आहेत; तर त्यांच्या निवारणाची तजवीज तुह्मांला जरूर केली पाहिजे. तुमचे लोक जरी मोठे शूर आहेत, तरी तुह्मी स्वतः त्यांजवर देखरेख करावयास असलां ह्मणजे त्यांच्या शौर्याचा अधिक उपयोग होईल. तर तुम्ही आतां जा. मीही तुह्मांस तेथें येऊन भेटल्याखेरीज राहणार नाहीं.' असें ह्मणून राणीनें एका यक्षास बोलाविलें, व पातशाहाला चीन देशास ताबडतोब नेऊन पोंचविण्यास सांगितलें. त्या हुकुमाप्रमाणें त्यानें केलें, व निमिषार्धांत पातशाह चीन देशांतील आपल्या वाड्यांत जाऊन पोहोंचला!

पातशाहाचा विश्वासू वजीर यास आपला धनी सुखरूप आला असें पाहून फारच आनंद झाला. त्यानें त्याजपुढें साष्टांग नमस्कार घालून ह्मटलें, 'महाराज मीं, देवाला आज इतके दिवस नवस करतां करतां शेवटीं तो आज मला पावला, व हे पाय माझ्या दृष्टीस पडले. आपल्या पश्चात् मीं आपल्या राज्याचा कारभार चालविला, व देवाच्या दयेनें आज आपण आलां आहां, तर तो फिरून हातीं घेऊन मला मोकळें करावें हाच माझा अर्ज आहे.' पातशाहानें वजिरास शेहरिस्तान येथें घडलेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्याला पराकाष्ठेचें नवल वाटलें.

मग थोडक्याच दिवसांनीं मोंगल लोक हे मोठें सैन्य घेऊन चीन देशावर चाल करून आले. त्यांना जयाविषयीं मोठी खात्री असून आतां चीनचें राज्य लौकरच आपल्या ताब्यांत येईल अशी आशा उत्पन्न झाली होती. पातशाहास ते येतात अशी बातमी कळल्याबरोबर त्यानें त्यांस लढाई देण्याची आपलेकडून कडेकोट तयारी केली. मोंगलांनीं एका मोठ्या मैदानांत सर्व प्रकारच्या भरपूर सामग्रीसह तळ दिला होता. पातशाहही बेतबात पाहून त्यांच्यापासून कांहीं अंतरावर डेरे देऊन जाऊन राहिला; व मागून त्याच्या सैन्यांत सर्व प्रकारची सामग्री ह्मणजे धान्य, फळफळावळ व मद्याचीं पिंपें वगैरे विपुल येऊं लागली. हे सर्व जिन्नस उंटांवर व खेंचरांवर भरले असून ते वेली या नांवाच्या प्रधानाच्या देखरेखीखालीं येत होते. सर्व सामग्री तळावर दाखल होतांच राणी शेहरिस्तानी ही तेथें एकाएकीं प्राप्त झाली. तिनें बरोबरच्या यक्षांकडून धान्यांचीं पोतीं फोडविलीं, फळें वगैरे चोहोंकडे रानोमाळ फेंकून देवविलीं, व मद्याच्या पिपांस भोंकें पाडून तेंही सर्व वाहवून टाकिलें, आणि अशा प्रकारें सर्व सामग्रीचा नाश करून टाकिला !

[ दिवस एकुणतिसावा ]

याप्रमाणें सर्व सामग्रीचा नाश झालेला पाहून वेली प्रधानास मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां यक्षाची राणी त्यास ह्मणते, 'जा, पातशाहाला जाऊन सांग कीं, हें सर्व कृत्य तुमच्या बायकोचें आहे.' तेव्हां त्या प्रधानानें पातशाहाच्या डेऱ्यांत जाऊन सर्व वृत्तांत त्यास सांगितला, आणि ह्मणाला, 'आतां सैन्यांतील लोकांस व जनावरांस खाण्यापिण्यास कांहींएक राहिलें नाहीं.' हें ऐकून पातशाहास फार राग आला. तो ह्मणाला, 'मुलांस तिनें ठार मारिलें ह्याही गोष्टी एकपरी असोत; पण सांप्रतच्या ह्या तिच्या कृत्यास ह्मणावें तरी काय? ' याप्रमाणें तो रागाच्या झटक्यांत असतां राणी तितक्यांत तेथें आली. तेव्हां तो तिला ह्मणतो, 'प्रिये, ह्या वेळेपर्यंत मीं मौन धरलें, पण आतां मला बोलल्यावांचून राहवत नाहीं. खरोखर माझा शांतपणा तुझ्या कसोटीस न उतरावा असें तूं एकंदरीनें केलेंस.

पहा, प्रथमतः तूं माझा मुलगा विस्तवांत टाकलास, नंतर मुलीला कुत्रीच्या तोंडीं दिलीस. इतकें तूं केलेंस तरी मीं आपला राग आवरून धरला, व सर्व दुःख गिळून गेलों; पण हल्लींचें तुझें कृत्य हें खरोखर माझ्या जिवास व वैभवास धोका आणणारें आहे, हें कोणीही सांगेल. तेव्हां मला यापुढें बोलल्यावांचून राहवत नाहीं. अगे कृतघ्न स्त्रिये, तुजवर मी प्राणापेक्षांही आधिक प्रेम करीत असतां त्याचे उपकार तूं असे फेडलेस काय? हें माझें लक्षावधि सैन्य आतां अन्नावांचून मरणार, व यापासून पुढें काय परिणाम व्हावयाचा तो उघड दिसतच आहे! मला खचीत वाटतें कीं, मीं लढाई दिल्यावांचून आयतेंच शत्रूच्या स्वाधीन व्हावें असें तुझ्या मनांत आहे; तर हें असलें कृत्य कोण सहन करील बरें?'

राणी ह्मणते, 'तुह्मीं आतांपर्यंत जसें केलें त्याचप्रमाणें ह्या वेळेस-ही आपल्या मनाचें आकलन केलें असतें तर फार बरें झालें असतें. पण ज्याअर्थी तुमच्या तोंडांतून शब्द बाहेर निघून चुकले, व झाल्या गोष्टीस आतां उपाय राहिला नाहीं, त्याअर्थीं तिचा परिणाम जो होईल तो तुह्मांस भोगला पाहिजे. खरोखर विधात्यानें ज्या गोष्टी घडणार ह्मणून लिहून ठेविलें, त्या न घडण्याविषयीं मीं किती प्रयत्न केला तरी त्यापासून काय होणार? त्या घडल्याच पाहिजेत. अरे मूर्ख, उद्धट मनुष्या! तुला मीं इतकें परोपरी सांगितलें असतां तुला बोलल्यावांचून कसें राहवलें नाहीं? ज्यांत मीं मुलास टाकून दिलें तो विस्तव होता असें तुला दिसलें, पण तो खरोखर विस्तव होता काय? आणि विस्तवांत मी मुलाला टाकीन असें तुला वाटतें काय? तो मुळींच विस्तव नसून निरुपद्रवी, शहणा परोपकारी असा नाग होता. मुलास शिक्षण देऊन लहानाचा मोठा करण्याकरितां मीं त्यास त्याच्या स्वाधीन केलें. तसेंच जी कुत्री ह्मणून तुझ्या दृष्टीस पडली ती कुत्री नसून यक्षीण होती; व यक्षांच्या राजकन्येस ज्या प्रकारचें शिक्षण योग्य आहे, त्या प्रकारचें शिक्षण मुलीस देऊन तिला वाढविण्याविर्तवि-ण्यासाठीं मीं त्या यक्षिणीच्या स्वाधीन केलें. आणि माझ्या इच्छेप्रमाणें तो नाग व ती यक्षीण आपापलीं कामें उत्तम रीतीनें बजावीत आहेत, हें

आतांच पाहिजे तर तुझ्या दृष्टीस पडेल.' असें ह्मणून तिनें बरोबरच्या यक्षांस सांगितलें कीं, ' जा रे, माझ्या मुलास व मुलीस ह्या क्षणीं येथें घेऊन या.' तिच्या तोंडांतून हे शब्द निघतांच राजपुत्र व त्याची बहीण हीं पातशाहाच्या डेऱ्यांत प्राप्त झालीं. मात्र तीं पातशाहाखेरीज दुसऱ्या कोणाच्या दृष्टीस पडलीं नाहींत.

आपल्या धान्यादि सामुग्रीचा नाश झालेला पाहून पातशाहास जरी पराकाष्ठेचें वाईट वाटलें होतें, तरी आपलीं मुलें सुखरूप आपल्या दृष्टीस पडल्यावर त्याला इतका आनंद झाला कीं, झालेल्या नाशाची सर्व गोष्ट तो विसरून गेला. त्यानें त्या उभयतां मुलांस इतक्या प्रेमानें पोटाशीं धरलें कीं, त्याची कल्पना, ज्यांस संतति झाली आहे त्यांखेरीज कोणासही होणार नाहीं ! याप्रमाणें पातशाह सौख्यसागरांत निमग्न झाला असतां राणी पुढें बोलूं लागली. ती ह्मणाली, 'आतां तुमची सर्व सामुग्री मीं कां खराब करून टाकिली, याचें कारण सांगतें. मोंगल लोकांच्या राजाचे मनांत तुमचा जीव घेऊन चीनचें राज्य आपल्या ताब्यांत घ्यावें असें आहे. याकरितां त्यानें वेली या प्रधानास लांचलुचपत देऊन आपलेंसें केलें आहे. या हरामखोर मनुष्यानें त्या राजापासून एक लक्ष मोहरा घेऊन तुह्मांस व तुमच्या सर्व सैन्यास विषप्रयोग करून ठार मारण्याचें कबूल केलें आहे. तुह्मीं स्वारीस लागणाऱ्या सर्व सामुग्रीची व्यवस्था त्याजकडे दिली असल्यामुळें, त्यानें प्रत्येक पदार्थांत अशा प्रकारचें एक जलाल विष घातलें आहे कीं, तो पदार्थ मनुष्याच्या पोटांत गेल्याबरोबर त्याला पाणी पिण्याचीही सवड न सांपडतां तात्काळ त्या योगानें त्याचा जीव जावा. तर पहा कीं, जर त्या सर्व सामुग्रीची मीं नासधूस करून टाकिली नसती, तर केवढा अनर्थ गुदरला असता बरें ! ही गोष्ट तुह्मांला कदाचित् खरी वाटणार नाहीं; पण मीं ती तुमच्या प्रत्ययास आणून दिली ह्मणजे झालें ना ? आणा त्या प्रधानाला आतांच्या आतां समोर, आणि थोडीबहुत दारू एखाद्या पिपांत राहिली असेल तींतून एक पेलाभर त्याला द्या, मग त्याचा परिणाम काय होतो तो पहा.'

हें ऐकून पातशाहाचें मन फार अस्वस्थ झालें. त्यानें वेली यास ताबडतोब आपल्या समोर बोलावून आणविलें. व एक मद्याचा पेला त्यास प्यावयास देवविला तेव्हां त्याचें पाप त्याच्या लक्षांत येऊन त्याचें तोंड खाडकन् उतरलें, आणि आतां आपल्या जिवावर येऊन बेतणार तें टळण्यासाठीं तो ह्मणतो, 'मला ह्या वेळेस मद्याची अगदीं इच्छा नाहीं. इच्छा होईल तेव्हां मी पिईन.' तेव्हां पातशाहास फारच संताप आला. तो त्यास ह्मणाला, 'तूं जर आतांच्या आतां या पेल्यांतलें मद्य न पिशील तर मी तांबडतोड तुझें डोकें उडवीन.' हें ऐकून निरुपायास्तव तो प्रधान तें मद्य पिऊन गेला. शेवटचा थेंब त्याच्या पोटांत जातांच एकदम तो सर्वांसमक्ष तेथच्या तेथें गतप्राण होऊन पडला!

मग राणी पातशाहास ह्मणते, 'आतां तर तुह्मांला त्या प्रधानाच्या विश्वासघातकीपणाविषयीं शंका राहिली नाहीं ना ? व यावरून, यक्ष जें काय करितात तें योग्य कारणांवांचून करीत नाहींत अशी तुमची अजून तरी खात्री झाली कीं नाहीं ?' पातशाह मोठा संकोच पावून हळूच ह्मणतो, 'हो खरेंच, प्रिये, मीं शपथेप्रमाणें तुझी आज्ञा पाळली नाहीं हा मजकडून मोठा प्रमाद घडला, यांत अगदीं संदेह नाहीं. तथापि माझी भीति अद्यापि नाहींशी झाली नाहीं; कां तर माझें सैन्य विषानें मरणार होतें तें टळलें खरें, पण आतां तें उपाशी मरणार याची वाट काय ? राणी ह्मणते, 'तुह्मांला त्याची काळजी नको. उद्या सकाळीं तुह्मांला हवी तितकी सामग्री आयतीच मिळेल. कारण आता पुढें कसें काय होणार तें मी तुह्मांला सांगतें. आज रात्रीं तुमचे व मोंगल लोकांचें मोठें युद्ध होऊन तुमच्या शत्रूचा पूर्ण पराजय होईल, नंतर त्यांची सर्व सामुग्री आयतीच तुमच्या हातीं लागेल, व तुम्ही जयजयकार करीत आपल्या राजधानीस परत जाल.

राणी बोलली त्याप्रमाणेंच सर्व प्रकार हुबेहुब घडून आला. मध्यरात्र होतांच राणीही आपल्या बरोबरच्या यक्षासह चीनच्या पातशाहाच्या सैन्यावर मुख्य झाली, आणि तिनें एकदम मोंगलावर हल्ला केला. असा अकस्मात् हल्ला आल्यामुळें त्या सैन्यांत सर्व अव्य-

वस्था झाली, व थोडीशी लढाई करून तें पाठ फिरवून पळूं लागलें. तेव्हां यक्षांच्या व चीनच्या पातशाहाच्या सैन्यानें मोंगलांचा पाठलाग करून त्यांची अशी कत्तल उडविली कीं, तींतून त्यांचा राजा, जो स्वतःच आपल्या सैन्याचा अधिपति होता, तोच तेवढा मोठ्या शर्तीनें वांचला.

उजाडल्यावर पाहतात तों सर्व रणभूमि प्रेतांनीं भरून गेलेली दृष्टीस पडली. त्यांत आपलेकडील लोक फारच थोडे पडले असें पाहून चीनच्या पातशाहाला, आपल्याला प्राप्त झालेल्या जयाविषयीं विशेषच आनंद झाला. त्याच्या सैन्यास शत्रूची धान्यादि सामुग्री व युद्धोपयोगी सामान हींही आयतीच पुष्कळ सांपडली.

नंतर राणी पातशाहास ह्मणते, 'महाराज, पहा कसा चमत्कार झाला तो! लढाईचा लौकरच शेवट होऊन तुमचा शत्रु पादाक्रांत झाला. आतां तुह्मी आलां तसे आपल्या राजधानीस जा, व सुखानें राज्य करा. मात्र आतां यापुढें तुमचा माझा समागम होणें नाहीं; कां कीं, तुह्मीं आपण होऊन आपल्या पायांवर धोंडा पाडून घेतला. तुह्मीं मला दिलेलें वचन पाळलें नाहीं, त्याअर्थीं त्याचा परिणाम तुह्मांस सोसला पाहिजे. आतां फिरून मी कधींही तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं.' हें ऐकून पातशाहास पराकाष्ठेचें दुःख झालें. तो ह्मणतो, 'हाय हाय! मी हें काय ऐकत आहें! प्राणप्रिये, तुला देवाची शपथ आहे, तूं हा मनांत आणलेला विचार रहित कर, मजकडून खरोखर चूक झाली हें मी कबूल करतों, व तिजबद्दल एकदां सोडून दहादां तुजपाशीं क्षमा मागतों. मी वाटेल तशी शपथ वाहून सांगतों कीं, इतःपर मला कोणत्याही प्रकारचा दोष देण्याचा तुला प्रसंग येईल असें मी कांहींएक करणार नाहीं. तुला वाटेल तें तूं करीत जा; मी ह्मणून तुला त्याबद्दल चकार शब्दही बोलणार नाहीं.' राणी ह्मणते, 'या तुमच्या बोलण्याचा कांहीं एक उपयोग नाहीं. आतां आमच्या कायद्याप्रमाणें तुमचा माझा वियोग झालाच पाहिजे. तुह्मांस क्षमा करण्याचें माझ्या हातीं असतें, तर मीं मोठ्या आनंदानें ती केली असती. पण यक्षांचे कायदे कधींही

आजपर्यंत मोडले गेले नाहींत, व यापुढेंही ते मोडण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं. याकरितां वाटेल त्या रीतीनें तुह्मांला माझा वियोग सोसून आपल्या मनाचें सांत्वन केलें पाहिजे.' असें बोलत असतां तिचा कंठ दाटून आला, व ती रडूं लागली. मग ह्मणते, 'येतें तर मी आतां. तुम्ही मला व आपल्या मुलांनाही इतःपर मुकला. तीं फिरून आतां कधींही तुमच्या दृष्टीस पडणार नाहींत.' असें बोलून ती आपला पुत्र व कन्या यांसह अदृश्य झाली.

[दिवस[1] तिसावा.]

चीनच्या पातशाहास आपली अत्यंत प्रियपत्नी व दोन्ही मुलें यांचा एकसमयावच्छेदेंकरून वियोग झाल्यामुळें इतकें कांहीं पराकाष्ठेचें दुःख झालें कीं, त्याचें शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे! तो जरी लढाईंत पराभव पावून मोंगलाच्या हातीं लागता तरी त्याबद्दलही त्याला एवढें दुःख झालें नसतें! त्यानें आपलें डोकें फोडून घेतलें, सर्वांगावर धूळ टाकली, व अशींच त्या दुःखाच्या आवेशांत अनेक कृत्यें केलीं. नंतर आपल्या सैन्यासह तो राजधानीकडे यावयास निघाला. वाड्यांत येऊन पोहोंचतांच तो वजिरास ह्मणतो, 'अहो, मला आतां हें राज्य नको. तुह्मांला योग्य दिसेल त्याप्रमाणें तुह्मी याची व्यवस्था करा. कारण माझी जिवलग पत्नी व मुलें यांस मी आपल्या मूर्खपणानें अंतरल्यामुळें माझें आतां संसारांत चित्त लागत नाहीं. याकरितां मी त्यांचाच शोक करण्यांत बाकी राहिलेलें आयुष्य घालविणार. मी आतां तुह्मांखेरीज दुसऱ्या कोणाचीही भेट घेणार नाहीं. तुमचीही भेट घेईन ती अशा अटीवर कीं, तुह्मी कांहींही झालें तरी, राज्यप्रकरणीं गोष्टी काढून मला त्रास देऊं नये. तुह्मी फक्त माझी प्रियपत्नी व मुलें यांविषयीं वाटेल तेवढें बोलत जा; कां कीं, केवळ त्यांच्याच ध्यासांत आयुष्य घालविण्याचा माझा संकल्प झालेला आहे.'

---

१. गोष्ट चालली असतां मधून मधून दिवसांचे विभाग केल्यानें रसाचा विच्छेद होतो, यास्तव यापुढें अमुक अमुक दिवस असें घालण्याचें सोडून एकसारख्या गोष्टी लिहिल्या आहेत.

याप्रमाणें पातशाह आपल्या महालांत नेहमीं आंतून दार लावून घेऊन दुःख करीत बसत असे. त्यास भेटावयास वजीर दररोज येत असे. तेव्हां त्याची राणी आणि मुलें यांच्या वियोगाबद्दल नेहमीं वजीर त्याजपाशीं गोष्टी बोलत असतां मनांत ह्मणत असे कीं, कालेंकरून पातशाहाचें दुःख कमी होईल; परंतु तसें न होतां उलट त्याला तें ज्यास्त ज्यास्तच होऊं लागलें. याप्रमाणें पातशाह हा सदोदित दुःखानें झुरत उदासवाणा असा दहा वर्षेपर्यंत राहिला. शेवटीं ती कष्टमय स्थिति असह्य होऊन तो दुखण्यास पडला, व अगदीं मरणोन्मुख झाला. तेव्हां एकाएकीं राणी त्याच्या महालांत प्राप्त होऊन पुढीलप्रमाणें त्यास बोलली. ती ह्मणाली, 'महाराज, आपल्या दुःखाचें निवारण करावें, व आपला जीव आपल्या देहास सोडून जाऊं पहात आहे तो जाऊं नये याकरितां मी आलें आहें. आपण आपला शब्द मोडला याबद्दल आमच्या कायद्याप्रमाणें दहा वर्षें मी आपणांपासून दूर रहावें ही आपणांस शिक्षा भोगावयाला पाहिजे होती, ती आपण भोगिली. पण एवढ्या अवधींत आपण माझ्याशीं बेइमानीपणा केला असता तर मीं आपलें तोंड पाहिलें नसतें. इतःपर तुमची माझी भेट होणार नाहीं असें मीं ह्मटलें होतें, त्याचें कारण मला वाटलें होतें कीं, मानवांच्या हातून एवढी निर्धाराची गोष्ट कदापि व्हावयाची नाहीं, व माझा लौकरच आपणांला विसर पडेल. पण माझा हा अनुमास चुकीचा ठरला, याबद्दल मी ईश्वराचे आभार मानतें. आतां केवळ मीच आपल्याकडे आलें आहें असें नाहीं, तर आपलीं दोन्ही मुलेंही इतक्यांत आपल्या दृष्टीस पडतील.'

राणीच्या तोंडांतून हे शब्द निघताहेत तोंच राजपुत्र व राजकन्या हीं उभयतां राजमहालांत प्रविष्ट झालीं. पातशाहाचें जसें स्वस्त्रीच्या ठायीं अत्यंत प्रेम होतें, तसेंच पण संततीचे विषयींही वात्सल्य त्याच्या ठायीं अलौकिक होतें. असो, पुढें लौकरच पातशाहाची तब्येत चांगली दुरुस्त होऊन तीं सर्व माणसें मोठ्या सुखानें व आनंदानें राहिलीं. शेवटीं पातशाह व राणी हीं सृष्टिक्रमाप्रमाणें इहलोक सोडून गेल्यावर त्यांचा पुत्र चीनचा पातशाह झाला व राजकन्या ही आ-

पल्या आईच्यामागें शेहरिस्तानची राणी झाली. तिनें महाप्रख्यात पैगंबर सुलेमान यास वरिलें.

---

काश्मीरची राजकन्या फरुखनाज हिच्या दाईनें याप्रमाणें वरील गोष्ट संपविली, तेव्हां तिच्या कांहीं दासींनीं गोष्टींतील यक्षादिकांचीं विलक्षण कृत्यें व मंत्रतंत्रांचे चमत्कार यासंबंधानें, ती अबुल कासीम याच्या गोष्टीपेक्षांही ज्यास्त पसंत केली. दुसऱ्या कित्येक जणींनीं 'अबुल कासीम याचीच गोष्ट चीनच्या पातशाहाच्या गोष्टीपेक्षां आपणांला ज्यास्त आवडली' असें बोलून दाखविलें. नंतर राजकन्या ह्मणते, 'खरोखर पुसाल तर मी चीनच्या पातशाहासच दोष देतें. कारण, यक्ष हे योग्य कारणावांचून कोणतीही गोष्ट करावयाचे नाहींत असें त्यास पूर्वीं राणीनें बजावून ठेविलें असतांही त्यानें तीस शेवटीं बोलावयास सोडलें नाहीं. यावरून पुरुष हे आपलें वचन पाळणारे नाहींत हें सिद्ध होतें.' तेव्हां दाई ह्मणते, 'बाईसाहेब, तुमची मर्जी असेल तर कोलूफ व दिलारा यांची गोष्ट मी तुह्मांला सांगतें; ह्मणजे पुरुष हे जीव गेला तरी आपलें वचन मोडीत नाहींत याचें तुह्मांस प्रत्यंतर येईल.' राजकन्या ह्मणते, 'फार उत्तम आहे. मलाच केवळ तुझ्या गोष्टी आवडतात असें नाहीं, तर त्यांपासून माझ्या दासींनाही करमणूक होतेसें दिसतें. तर चालीव आपली गोष्ट. आह्मी मन लावून ती ऐकण्यास तयार आहों.' त्यावरून दाई पुढील गोष्ट सांगूं लागली.—

## दामास शहरच्या व्यापाऱ्याचा मुलगा कोलूफ व दिलारा या नांवाची सुंदर स्त्री यांची गोष्ट.

दामास नामक शहरीं अबदल्ला या नांवाचा एक धनाढ्य व्यापारी राहत असे. त्यानें ह्मातारपणापर्यंत जगांतील बहुतेक देशांत प्रवास केला होता, व शेंकडों प्रकारचीं संकटें भोगून आणि साहसें करून पुष्कळ द्रव्य संपादन केलें होतें. परंतु त्याला संतति नव्हती, यामुळें तो फार दुःखी असे. तेव्हां धर्मकृत्यांत आपण पैसा खर्च केला असतां देवाची आपणावर कृपा होऊन देव आपणाला संतान

देईल असें समजून तो फकिरांस वगैरे पुष्कळ खैरात करीत असे. तसेंच त्यानें धर्मार्थ दवाखाने, धर्मशाळा व मशिदीही अनेक बांधिल्या; परंतु त्याला संतान ह्मणून होईना, व शेवटीं त्यासंबंधानें त्याची अगदीं निराशा झाली.

त्या शहरांत एके दिवशीं हिंदुस्तानांतला एक प्रसिद्ध हकीम आला. त्याचा लौकिक ऐकून अबदल्ला यानें त्यास आपल्या येथें बोलाविलें. तो आल्यावर त्याचा त्यानें मोठा सत्कार केला. नंतर इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर अबदल्ला त्यास ह्मणतो, 'हकीमसाहेब, मला आज कित्येक दिवसांपासून संतान व्हावें अशी इच्छा झालेली आहे; पण ती तृप्त होत नाहीं.' हकीम ह्मणतो, 'महाराज, ह्या गोष्टी ईश्वराधीन आहेत; तथापि त्या प्राप्त करून घेण्याकरितां मनुष्यानें आपली होईल तितकी अक्कल खर्च करावी; ती करण्यास त्यास मनाई नाहीं.' अबदल्ला ह्मणतो, 'हकीमसाहेब, मी काय करूं तें तुह्मीं मला सांगण्याचा मात्र अवकाश आहे, मी तें तत्काळ केल्यावांचून राहणार नाहीं.' हकीम ह्मणतो, 'प्रथम तुह्मी एक चांगली तरुण, सशक्त अशी दासी विकत घ्या. तिचा चेहरा सुरेख असून तिचे गाल गोंडस असावेत, तिचा नितंब स्थूल असावा, तिचा आवाज मधुर असावा, तिच्या बोलण्यांत खुमारी असावी, आणि इतकेंही असून तिची तुह्मांवर व तुमची तिच्यावर अंतःकरणापासून प्रीति असावी. खेरीज तिच्याशीं तुमचा समागम होण्यापूर्वीं तुह्मी चाळीस दिवस कामधंदा सोडून ख्यालीखुशालींत राहिलें पाहिजेः—ह्मणजे चांगलीं चांगलीं पक्वान्नें आणि उत्तम प्रकारचें मद्य पिऊन आनंदांत नेहमीं असलें पाहिजे; व खेरीज ब्रह्मचर्यही पाळलें पाहिजे. असें केलें असतां तुह्मांस हजार हिश्शांनीं मुलगा होईल असें मी तर ह्मणतों.'

हकिमानें सांगितल्याप्रमाणें लागलीच अबदल्ला यानें एक दासी विकत घेतली, आणि चाळीस दिवसपर्यंत तो त्याच्या सांगण्याप्रमाणें वागला. तेव्हां ती स्त्री गरोदर राहिली, आणि तिजपासून अबदल्ला यास पुत्र झाला. त्या पुत्राचें नांव कोल्फ असें त्यानें ठेविलें. पुत्रो-

सवानिमित्त त्यानें आपल्या इष्टमित्रांस एक बडा खाना दिला, व गरीबगुरिबांस पुष्कळ दानधर्म केला.

अबदल्ला यानें मुलाच्या शिक्षणाविषयीं मोठी काळजी घेतली. तोही मोठा बुद्धिमान् असून आपल्या शिक्षकांच्या मर्जीस फार उतरला. त्यास तुर्की, यहुदी, ग्रीक, फारशी, आरबी व हिंदुस्तानी इतक्या भाषा चांगल्या लिहितां वाचतां येऊं लागल्या; तसेंच त्याला कुराणही चांगलें वाचतां येऊं लागलें, इतकेंच नाहीं, तर त्याचा अर्थ सांगतां येऊं लागला व त्यांत जे कित्येक गूढ कोटिक्रम आहेत तेही समजूं लागले; त्याचप्रमाणें आरबस्थान, इराण वगैरे देशांचे इतिहासही त्यास अवगत झाले; आणि नीतिमीमांसा, तत्त्वमीमांसा, ज्योतिषशास्त्र, हेंही तो पढला. इतक्या विषयांत त्याला प्रवीणता आली तेव्हां तो सारा अठरा वर्षांचा होता. असें असतां इतक्या लहान वयांत कवित्व व वादनकला हेंही खेरीज त्यानें चांगलीं संपादन केलीं. शिवाय तो शरीरानें चांगला सदृढ असून पट्टा खेळण्यांत व तिरंदाजी करण्यांतही फार वस्ताद झाला.

अशा सर्वगुणसंपन्न मुलाविषयीं बापास पराकाष्ठेचा आनंद होणें हें साहजिकच आहे. अबदल्ला हा त्यास आपल्या प्राणापलीकडे मानीत असे; एक क्षणभरही त्यास आपल्या दृष्टीआड होऊं देत नसे. पुढें तो कांहीं वर्षांनीं वृद्धापकाळामुळें मरणोन्मुख झाला असतां त्यानें मुलास आपल्याजवळ बोलावून चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या नंतर तो लौकरच मरण पावला. तेव्हां कोल्फ हा त्याचें उत्तर कार्य यथास्थित करून त्याच्या अपार द्रव्याचा उपभोग घेऊं लागला. परंतु त्याच्या बापानें जो पैसा मोठ्या मेहनतीनें व काटकसरीनें जमविला होता, तो त्याच्या हातांत एकदम कांहीं एक आयासावांचून आला असल्यामुळें, त्याला त्याची किंमत न कळून त्यानें समवयस्क असे कित्येक लोक आपले जिवलग स्नेही केले, व त्यांसह रात्रंदिवस तो तरुण व सुंदर अशा स्त्रियांच्या समागमांत मजा मारीत राहिला. दररोज भोजनास निरनिराळ्या प्रकारचीं उत्तम पक्वान्नें व उंची दारू असल्यावाचून त्याचें चालत

नसे; तसेंच गाणेंबजावणें वगैरे ख्यालीखुशालीच्या गोष्टींखेरीज त्याचें कोणत्याही गोष्टीकडे लक्ष लागत नसे. कोल्फ याजपाशीं अपार द्रव्य असल्यामुळें याप्रमाणें कित्येक वर्षेंपर्यंत त्याला राजशाई थाटानें राहतां आलें. तथापि उधळेपणा हा कुबेरालाही भीक लावणारा असल्यामुळें बिचाऱ्या कोल्फाची काय कथा ? होतां होतां त्याच्या जवळचा सर्व पैसा नाहींसा झाला, व शेवटीं त्याला आपलें घरदारही विकण्याची पाळी आली.

इतकें झालें तेव्हा कोल्फ याचे डोळे उघडले. पण "बैल गेला आणि झोंपा केला" अशी जी ह्मण आहे त्या ह्मणीप्रमाणें आतां त्याच्या पश्चात्तापाचा कांहीं एक उपयोग नव्हता. शेवटीं तो आपल्या स्थितीस त्रासून, ज्या तरुण मित्राच्या संगतींत त्यानें आपल्या द्रव्याची राखरांगोळी केली होती, त्याजकडे जाऊन, त्यानें आपली दैन्यावस्था त्यास सांगितली. तो त्यास ह्मणाला, मित्रहो, तुह्मीं माझी चलती पाहिली आहे, व हल्लीं मला विपत्ति प्राप्त झाली आहे हीही तुह्मी पाहतां. मजजवळ जें होतें नव्हतें तें सर्व मीं व तुह्मीं मिळून खर्चून टाकिलें, व त्यामुळें मला आतां दीनदशा प्राप्त झाली आहे. माझी भरभराट असतां तुह्मीं मला शेंकडों वेळां ह्मटलें होतें कीं, प्रसंग पडला असतां आह्मी तुला साहाय्य करूं; तर ती गोष्ट तुमच्या लक्षांत असेलच. मी खचीत समजतों कीं, माझी ही दशा पाहून तुम्हांस दुःख झाल्यावांचून राहिलें नसेल; व तुम्ही सर्वजण मला हातभार लावून या संकटांतून पार पाडल्याशिवाय कदापि राहणार नाहीं.' याप्रमाणें बिचाऱ्या कोल्फानें आपल्या मित्राची कृतज्ञता जागृत करून आपणास मदत करण्याविषयीं त्यांना प्रेरणा होईल असा आपल्याकडून यत्न केला; पण त्यांच्यापैकीं कोणीही कृतज्ञतेस मुळींच ओळखीत नव्हता ! अर्थातच कोल्फ याच्या बोलण्याचा बिलकूल उपयोग झाला नाहीं. त्याचे कांहीं मित्र ह्मणाले 'आम्हांला तुझी ही निकृष्ठावस्था पाहून पराकाष्ठेचें दुःख झालें आहे व ईश्वर करो आणि तुझें हें संकट दूर होवो असें आम्ही मनापासून इच्छितों.' कांहीं याहीपेक्षां वस्ताद होते त्यांनीं नुसता असा कोरडा

आशीर्वादही न देतां त्याच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष देखील दिलें नाहीं, तर त्याचा उलटा धिक्कार केला!' तेव्हां कोल्फ त्यांस ह्मणतो, 'अरे नराधमांनो, तुमचा हा निर्लज्जपणा व निर्दयपणा पाहून माझ्या काळजाला केवळ घरे पडून गेले! आणि खरोखर यांत तुह्मांला तरी काय बोल? कां कीं, वास्तविक माझाच हा सर्व मूर्खपणा मला भोंवत आहे! मी तुमची किंमत न ओळखतां तुमच्या वरकांती भाषणास व स्नेहास भुलून तुह्मांला अगदीं जिवलग मित्र समजलों, ही मजकडूनच मोठी चूक झाली!'

अशा प्रकारें कोल्फ यास दुहेरी पश्चात्ताप होऊन त्यानें दामास शहराहून परागंदा होण्याचा निश्चय केला; कारण तो मनांत ह्मणाला, 'जेथें आपण राजाप्रमाणें चैन मारली, त्या ठिकाणीं अर्धपोटीं, किंबहुना उपाशीं, दिवस काढणें यासारखी शरमेची कोणतीही गोष्ट नाहीं!' मग लागलाच तो काराकोरम नामक देशास निघाला. त्या देशावर त्या वेळीं काबुलखान या नांवाचा राजा राज्य करीत होता. तेथें पोहोंचल्यावर त्यानें एका धर्मशाळेंत बिऱ्हाड ठेविलें, व जवळ पैसे होते त्या बेतानें जितका उंची पोषाख घेतां आला तितका घेतला. नंतर कित्येक दिवसपर्यंत तो शहरच्या मोठमोठ्या रस्त्यांत, बाजारांत व बागांत फिरला, आणि तेथें जें जें पाहण्यासारखें होतें तें सर्व त्यानें लक्षपूर्वक पाहिलें. रात्र झाली ह्मणजे नियमानें तो आपला धर्मशाळेंत येऊन निजत असे.

याप्रमाणें कित्येक दिवस त्याचा क्रम चालला असतां एके दिवशीं अशी वार्ता त्याच्या कानीं आली कीं, जवळचे दोन राजे, ज्यांकडून येथील राजाला दरवर्षीं खंडणीबद्दल मोठी रक्कम मिळत असे, त्यांनीं यास खंडणी देण्याचें नाकबूल केलें; व दोघांनीं एकजूट करून, काबुलखान हा लढाईस येईल तर त्याशीं भिडण्याची तयारी असावी ह्मणून पुष्कळ सैन्य सज्ज करून ठेविलें आहे. यावरून कोल्फ तसाच राजाकडे गेला, आणि 'मला आपल्या पदरीं ठेवावें' ह्मणून त्यानें राजास विनंति केली. राजा आपल्या शत्रूंवर जाण्याची तयारी करीतच होता, यास्तव त्यानें कोल्फ याच्या विनंतीवरून

त्यास सैन्यांत एक जागा दिली. नंतर कोलूफ हा राजाच्या सैन्या-बरोबर लढाईस गेला असतां त्यानें आपल्या शौर्यानें व चातुर्यानें आपल्या बरोबरच्या लोकांस आश्चर्यचकित करून सोडलें, व आपल्या वरिष्ठांची वाहवा मिळविली; आणि राजाचा ज्येष्ठ पुत्र मिरझाखान लढाईवर मुख्य होता त्याची कृपा संपादन केली. एवढ्यानेंच कोलूफ याचा कीर्ति मिळविण्याचा मार्ग खुंटला असें नाहीं. काबुल-खानाच्या या दोघां शत्रूंची रग जिरली खरी, तथापि इतर जे राजे त्यास करभार देत होते, त्यांनीं या उदाहरणावरून स्वस्थ रहावें तें न राहतां काबुलखानाशीं आणखी लढाई सुरू केली. तेव्हां काबु-लखानास त्यांचा समाचार घेणें भाग पडलें. त्यानें त्यांस लौकरच पादाक्रांत करून तह करावयास लाविलें. याप्रमाणें कोलूफ यास अनेक लढायांत आपलें शौर्य दाखविण्याची संधि येऊन तो इतका प्रसिद्धीस आला कीं, त्यास मिरझाखान यानें आपल्या स्वतःच्या हाताखालीं मागून घेतलें. तेव्हां कोलूफ व मिरझाखान यांचा फारच स्नेह जमला, व कोलूफ याच्या आंगच्या लोकोत्तर गुणांच्या योगानें तो मिरझाखान याचा "जीवश्च कंठश्च" मित्र झाला.

पुढें कांहीं दिवसांनीं काबुलखान हा मरण पावला. तेव्हां त्याचा पुत्र मिरझाखान हा त्याच्या गादीवर बसला. त्यानें कोलूफ यास मोठमोठीं कामें सांगून योग्यतेस चढविलें. याप्रमाणें कोलूफ याची स्थिति एकाएकीं बदलून तो पहिल्यापेक्षांही श्रीमंत झाल्यावर मनांत ह्मणतो, 'मनुष्यास संसारांत जीं सुखदुःखें होतात, त्यांचा सर्व संकेत ईश्वरानें अगोदरच ठरविलेला असतो असें दिसतें. पहा, मी दामास येथें बापाच्या मागें प्रथमच मौजा मारायाला लागलों तेव्हां मला विपत्ति प्राप्त होईल असें माझ्या ध्यानीं मनीं तरी होतें काय? बरें, मी त्यानंतर काराकोरम येथें आल्यावर, हल्लीं आहे ही स्थिति आपणाला प्राप्त होईल असें मला स्वप्नांत तरी वाटलें होतें काय? तस्मात् या जन्मांत आपल्याला जें काय सुखदुःख प्राप्त व्हावयाचें तें झालेंच पाहिजे; तें टाळूं ह्मटल्यास टाळतां येणार नाहीं. तर नेहमीं असलेल्या स्थितींत होईल तितकें आनंदानें रहावें हेंच बरें.'

याप्रमाणें कोल्फ हा पुढें काय होणार याची बिलकुल फिकीर न करितां प्राप्त झालेल्या सुस्थितींत सुखानें कालक्रमणा करूं लागला. एके दिवशीं तो राजवाड्यांतून घराकडे चालला असतां वाटेंत त्याला एक वृद्ध स्त्री भेटली. तिच्या तोंडावर हिंदुस्तानांतल्या उंची मलमलीचा बुरखा असून त्याजवर निरनिराळ्या रंगांची वेल-बुट्टी काढलेली होती, व कांठास जरीची उत्कृष्ट फीत होती. तिच्या गळ्यांत मोत्यांचा एक मोठा कंठा होता, व हातांत काठी असून बरोबर पांच दासी होत्या. त्या दासींनींही तोंडावरून बुरखे घेतलेले होते.

कोल्फ हा त्या म्हाताऱ्या स्त्रीजवळ जाऊन तिला ह्मणाला, 'ह्या दासी विकावयाच्या आहेत काय?' तिनें उत्तर केलें, 'होय.' यावरून त्यानें त्या दासींच्या तोंडावरचे बुरखे एकीकडे करून पाहिलें तों त्या सर्वही तरुण आणि सुंदर आहेत असें त्यास दिसून आलें. तथापि त्यांच्यापैकीं एक जी होती तिचा चेहरा इतरांच्याहून विशेष मोहक होता. तिजकडे बोट करून कोल्फ ह्मणाला, 'बाई, ही मला आवडली. ही मला विकत द्या.' ती स्त्री ह्मणते, 'नाहीं नाहीं, बाबा, तुह्मी थोर व श्रीमंत गृहस्थ दिसतां, यासाठीं तुह्मीं ही घ्यावी असें मला वाटत नाहीं. इच्याहूनही सुरेख अशा तुर्कस्तान, ग्रीस, आयोनिया, इथिओपिया, चीन, आर्मेनिया व जार्जिया वगैरे देशांतील खुबसुरत अशा शेंकडों दासी माझ्या येथें आहेत, त्यांपैकीं एखादी तुह्मीं घ्यावी असें मला वाटतें. चला तुह्मी माझ्या बरोबर; त्या तुह्मांला मी दाखवितें. त्यांतून तुह्मांला कोणती पसंत पडेल ती घ्या.' असें ह्मणून ती घराकडे चालली, व तिच्यामागें कोल्फ हा चालला.

ती वृद्ध स्त्री एका मशिदीजवळ आल्यावर त्यास ह्मणते, 'अहो, जरा तुह्मी येथें थांबा. मी उभ्या उभ्या जवळून जाऊन येतें.' तिला यावयास सुमारें एक तास लागला. तेव्हां कोल्फ हा उभा राहून फारच कंटाळला. शेवटीं एकदाची ती आली. तिच्याबरोबर एक मोलकरीण होती, व त्या मोलकरणीच्या काखोटीस एक बोचकें होतें

त्या बोचक्र्यांत स्त्रियांनीं घालण्याचा एक झगा व बुरखा होता. तो झगा त्या म्हातारीनें कोलूफ याच्या अंगांत घातला, व त्याला तोंडावरून बुरखा घ्यावयास दिला. नंतर ती त्यास म्हणते, 'अहो बाबा, आम्ही खानदानीचीं व प्रतिष्ठित माणसें असल्यामुळें एखाद्या परक्या गृहस्थास घरीं घेऊन जाणें हें आम्हांस गैर आहे; याकरितां मीं तुमचा वेष असा बदलला आहे.' कोलूफ म्हणाला, बाई कांहीं चिंता नाहीं. हेंचसें काय, पण आणखी कांहीं दुसरें तुम्हीं सांगितलें तरी तें करण्यास मी तयार आहें.' हें ऐकून ती बाई खुष झालीशी दिसली. मग ती त्यास आपल्याबरोबर अशा एका ठिकाणीं घेऊन गेली कीं, तें त्यानें यापूर्वीं कधींच पाहिलें नव्हतें. तें ठिकाण म्हणजे सामान्य होतें असें नाहीं. ती राजवाड्यासारखी मोठी भव्य व सुशोभित इमारत होती. त्या वाड्याच्या पुढील चौकास हिरव्या रंगाच्या संगमरवरी चिऱ्यांची फरसबंदी होती, ती ओलांडून कोलुफासह ती वृद्ध स्त्री एका फार मोठ्या प्रशस्त अशा महालांत गेली. त्याच्या मध्यभागीं एक पाचेचा हौद पाण्यानें भरलेला होता, त्यांत लहान लहान सुरेख असें शेंकडों हंस मौजेनें क्रीडा करीत होते. त्या हौदाच्या सभोंवतीं सोन्याच्या तारांच्या दुहेरी ताट्या असून त्या ताट्यांत तशाच तारांचीं पिंजऱ्यासारखीं मोठी नामी अशीं पक्षी राहण्यासारखीं घरें केलेलीं होतीं. त्या घरांत निरानिराळ्या जातींचे हजारों पक्षी होते, त्यांची चमत्कारिक व मनोरंजक अशी किलबिल चाललेली होती.

महालांतील हौद, त्यांतील हंस, व सभोंवतालचे दुसरे पक्षी, आणि तेथें असलेल्या दुसऱ्या शेंकडों प्रेक्षणीय वस्तु पाहण्याकडे कोलूफ याचें मन वेधलें असतां एक तरुण व सुंदर स्त्री तेथें आली. ती हास्यवदन करून कोलुफाच्याजवळ गेली, व तिनें त्यास मोठ्या आदबीनें मुजरा केला कोलुफ यानें तिचा मुजरा घेतल्यावर तिनें त्याचा हात धरला, व ज्यावर किनखापीं चादरीच्या गाद्या व लोडें होतीं अशा तेथल्या एका कोचावर बसण्याविषयीं त्यास विनंति केली. त्याप्रमाणें तो बसल्यावर तिनें आपल्या हातांतील उत्कृष्ट मल-

मलीच्या रुमालानें त्याचें तोंड पुसलें, व इतके प्रेमयुक्त नेत्रकटाक्ष त्यावर फेंकले कीं, त्या योगानें त्याचें अंतःकरण तिजवर अत्यंत प्रसन्न झालें इतकेंच नाहीं, तर तो अगदीं वेडावून गेल्यासारखा झाला !

ही स्त्री विकावयाच्या दासींपैकींच एक असावी असें वाटून तिला विकत घ्यावी असा कोल्फ आपल्या मनांत निश्चय करतो आहे इतक्यांत, तिच्याहूनही सुरेख अशी दुसरी एक तरुण स्त्री तेथें आली. तिचे कुरळे केंस तिच्या गौरवर्ण अशा बाहूंवर जे पडले होते, त्यांच्या योगानें तिच्या रूपाची बहार कांहीं विलक्षण दिसत होती. ती गजगतीनें व प्रफुल्लित आणि आनंदित मुद्रेनें कोल्फ याजवळ आली, आणि त्याच्या हाताचें तिनें मोठ्या प्रेमानें चुंबन केलें. नंतर त्याजपुढें सोन्याचें तस्त ठेऊन त्याचे पाय धुण्याविषयीं तिनें आपली इच्छा दर्शविली. तिला तसें करूं न देतां उलटा तो तिच्या रूपास पराकाष्ठेचा मोहित होऊन उठून उभा राहिला, व त्या प्रेमभरांत तिला आलिंगण देऊन तिचा स्वीकार करण्याचा निश्चय करणार, इतक्यांत या दोन स्त्रियांहूनही फारच रूपवती अशा एकीपेक्षां एक वरचढ वीस स्त्रिया तेथें आल्या. त्यांच्या रूपास पाहून तर कोल्फाचें देहभानच नाहींसें झालें, व तो जागच्या जागींच स्तब्ध बसला. त्या वीसजणींत अत्यंत सुंदर अशी एक स्त्री होती, तिचा पोशाख त्या सर्वांच्या पोशाखापेक्षां फारच मोलाचा व सुरेख होता; आणि ती त्यांची धनीण असावी असें दिसत होतें. ही जणूं काय चंद्र असून हिच्या भोंवतीं ह्या चांदण्या आहेत असा कोल्फ यांस भास झाला, आणि ह्या लावण्यवतीच्या दर्शनानें तर त्याची जी स्थिति झाली तिचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे !

कोल्फ हा मदनबाणांनीं विव्हळ व मूर्च्छित झालेला पाहून त्या स्त्रियांनीं त्यास वारा वगैरे घालून सावध केलें. नंतर विशेषतः जिचें अलौकिक रूप पाहून त्याची अशी स्थिति झाली होती ती स्त्री त्यास उद्देशून ह्मणते, 'मजवर लंपट होऊन माझ्या प्रेमपाशांत सांपडलेल्या थोर पुरुषा, तुला अभिवंदन असो !' तें ऐकून कोल्फयानें तिजपुढें जमिनीवर डोकें टेंकलें, आणि दुःखाचा मोठा सु-

स्कारा टाकला. तेव्हां त्या स्त्रियांनीं त्याला उठवून कोचावर बसविलें. इतक्यांत एका दासीनें रत्नखचित सोन्याच्या पेल्यांत उत्तम प्रकारचें सरबत आणून त्या अनुपम सुंदरीच्या हातीं दिला. नंतर त्याचा एक घोंट घेऊन तो पेला कोलुफाच्या हातीं दिला. नंतर ती त्याच्या शेजारीं बसली, व तोंडांतून शब्दही निघत नाहीं अशी त्याची स्थिति पाहून ती त्यास ह्मणते, ‘अहो, तुमच्या अंतःकरणास इतका त्रास कशानें झाला बरें? तुह्मी असें काय करतां? हें दुःख व औदासीन्य टाकून द्या. मला वाटतें, आमच्या संगतीनें तुह्मांस त्रास झाला कीं काय कोण जाणे!’ कोलूफ ह्मणतो, ‘हे सुंदरी, अशा शब्दांनीं माझ्या दुःखी अंतःकरणास आणखी डागूं नको. तुझ्यासारख्या अलौकिक रूपवती स्त्रीच्या दर्शनानें कोणाही मनुष्याचें हृदय विदारून जाईल यांत कांहीं संशय नाहीं; व मी खरोखर सांगतों कीं, माझीही पण तशीच स्थिति झाली आहे. माझी अशी त्रेधा उडून गेली आहे कीं, तसा प्रकार यापूर्वीं कधींच झालेला मला आठवत नाहीं!’ ती स्त्री ह्मणते, ‘महाराज तुह्मी अंमळ स्वस्थ व्हा. आतां आपण सर्वजण उपहार करूं; व त्यावेळीं आह्मी तुह्मांस करमणूक करूं, त्यायोगानें तुमचें चित्त थाऱ्यावर येईल अशी आह्मांस खात्री आहे.’

याप्रमाणें बोलून त्या स्त्रीनें कोलूफ यास हातीं धरून दुसऱ्या एका महालांत नेलें. त्या ठिकाणीं फराळाची तयारी झालेली होती. फराळास नाना प्रकारची उंची मिठाई चिनी तबकांत भरलेली असून देशोदेशींची उंची व उत्कृष्ट प्रकारची शेंकडों तऱ्हेचीं फळफळावळ होती. कोलूफ व त्या स्त्रिया या सर्वांचा फराळ झाल्यावर दासींनीं त्यास हात धुण्याकरितां सोन्याच्या भांड्यांत पाणी आणून दिलें, व त्यानें हात धुतल्यावर गुलाबी रंगाच्या रेशमी रुमालानें त्यांनीं ते पुसले. नंतर तीं सर्वजण उठून तिसऱ्या एका महालांत गेलीं. त्या ठिकाणीं उत्कृष्ट प्रकारच्या जुन्या मद्याचीं कित्येक पिपें होतीं, व गुलाब आणि दुसऱ्या सुंदर फुलझाडांच्या कुंड्या सभोंवार ठेवलेल्या असून मध्यंतरीं स्फटिकाप्रमाणें स्वच्छ अशा

पाण्याचा हौद होता. त्यांत एक कारंजें उडत होतें, त्या कारंजाच्या फवाऱ्यांनीं त्या फुलझाडांस टवटवी व मद्याच्या पिपांस थंडावा राहत असे. असो; तीं सर्वजण त्या ठिकाणीं खुर्च्यांवर बसल्यानंतर त्या स्त्रियांनीं कोल्फ यास मद्य प्यावयास दिलें, व आपणही प्याल्या. याप्रमाणें घटकाभर मद्याचा रंग उडून सर्वांचा दिल खुष झाल्यावर फिरून तीं पहिल्या महालांत आलीं.

मग त्या स्त्रियांपैकीं कांहींजणीं गाऊं लागल्या, कांहीं वाद्यें वाजवूं लागल्या व कांहीं नृत्य करूं लागल्या. त्यांचें गाणेंबजावणें व नृत्य पाहून कोल्फ यास पराकाष्ठेचा आनंद झाला. पण त्या स्त्रियांपैकीं ज्या स्त्रीचें रूप पाहून तो वेडावून गेला होता तिनें जी बहार करून दिली, तीपुढें इतरांचें कसब कांहींच नाहीं असें त्यास दिसून आलें. त्या चतुर व गुणवती स्त्रीनें एक उत्कृष्ट चीज ह्मटली. नंतर तिनें सारंगी घेतली, व दुसऱ्या रागांत आणखी एक फारनामी चीज ह्मटली. याप्रमाणें चोवीस प्रकारच्या निरनिराळ्या चालींवर तिनें गाऊन आपल्या कौशल्याची पराकाष्ठा केली. त्या योगानें कोल्फ याच्या मनाची स्थिति अशी कांहीं विलक्षण झाली, व त्याला आनंदाची एवढी उकळी आली कीं, त्याला आपल्या मनांत आलेले विचार व्यक्त केल्यावांचून राहवेना. तो त्या स्त्रीस ह्मणतो, 'हृदयंगमे! तुझी अनुपम कृति पाहून तुला काय ह्मणावें आणि कशाची उपमा द्यावी हें मला कांहीं सुचत नाहीं! माझी वाचा अगदीं खुंटल्यासारखी झाली आहे, याकरितां मला आपलें प्रेम व आनंद प्रदर्शित करण्यासाठीं तुझ्या सुंदर व गौरवर्ण हाताचें चुंबन घेण्यास व तुझ्या पायांवर लोटांगण घालण्यास परवानगी दे.' याप्रमाणें बोलून त्या अत्यंत लंपट झालेल्या पुरुषानें प्रेमभरांत त्या स्त्रीच्या हाताचें चुंबन केलें. पण त्या सुंदरीस ही त्याची सलगी न आवडून तिनें धिक्कारयुक्त मुद्रेनें आपला हात मागें हिसकावून घेतला आणि ह्मणाली, 'अरे गृहस्था, तूं कोणीही ऐस, पण असला अविचारीपणा करून अमर्यादेचें काम करूं नको. मी थोर कुलांतली स्त्री असून पुरुषाचा वाराही अद्याप मला माहीत नाहीं. तूं माझ्या प्राप्तीची

इच्छा करीत आहेस, पण ती तुझी इच्छा सफळ होणार नाहीं. जाऊं दे मला आतां; इतःपर मी तुझ्या दृष्टीस मुळींच पडणार नाहीं.' असें ह्मणून ती स्त्री उठून चालती झाली, व तिजबरोबर बाकीच्याही उठून निघून गेल्या.

जिला आपण प्राणांहूनही अधिक मानली अशा त्या प्रियतमेचा आपणावर राग झालेला पाहून कोल्रफ हा अत्यंत खिन्न होत्साता उगीच वेड्यासारखा त्या महालांत एकटा बसला असतां, ज्या म्हातार्‍या स्त्रीनें त्यास या ठिकाणीं आणलें होतें ती तेथें आली, आणि त्यास ह्मणाली, 'अरे गृहस्था, हें तूं काय केलेंस? तूं अंमळ धीर धरावयाचा होतास, व मर्यादेबाहेर जावयाचें नव्हतेंस. मीं प्रथमतः उगीच तुला सहज सांगितलें कीं, माझ्या येथें नानादेशच्या दासी विकावयाकरितां ठेविलेल्या आहेत, तरी पण तूं येथला हा सर्व थाटमाट पाहून, व तुझें ज्या प्रकारें स्वागत झालें तो प्रकार लक्षांत आणून, मनांत उमजावयाला पाहिजे होतेंस कीं, हें कांहीं खचीत दासींचा विक्रय करण्याचें घर नव्हे. अरे बाबा, जिची तब्यत तूं आपल्या अविचाराचे वर्तनानें घालविलीस ती कांहीं सामान्य स्त्री नाहीं. ती येथल्या एका उमरावाची कन्या आहे. तिच्याशीं तुला चांगलें सभ्यपणानें वागावयास पाहिजे होतें.'

हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून तर त्या रागावलेल्या स्त्रीविषयीं कोलुफाचा आषक अधिक वाढला व आपण भलतेंच वर्तन करून तिला घुस्सा आणल्याबद्दल त्याला अतिशय वाईट वाटलें. तो खिन्न वदन करून खालीं मान घालून बसला; आणि पुनः ती आपल्या कसूची दृष्टीस पडते, असें मनांत आणून दुःख करीत राहिला. इतक्यांत ती निघून गेलली स्त्री आपल्या बरोबरच्या इतर स्त्रियांसह पुनः तेथें आली. त्या सर्वांनीं आपले पहिले पोषाख बदलले असून हल्लीं जे घातले होते ते पहिल्याहीपेक्षां ज्यास्त सुरेख, ठाकठिकीचे, व मौल्यवान् होते कोलुफाची खिन्न व दुःखी मुद्रा पाहून ती स्त्री खदखदां हंसूं लागली. मग त्यास ह्मणते, 'मला वाटतें तुह्मांस मघाच्या गोष्टीचा फार पश्चात्ताप झाला आहे. तर मी एकवार तुह्मांस

क्षमा करतें; पण माझी एवढीच भट आहे कीं, तुह्मीं इतःपर चांगलें मर्यादेनें वागलें पाहिजे, व तुह्मी कोण, कोठले, वगैरे मला सांगितलें पाहिजे.'

कोलूफ यास कोणीकडून त्या स्त्रीची मर्जी जाऊं नये येवढेंच पाहिजे होतें, सबब त्यानें लागलीच तिची गोष्ट कबूल करून ह्मटलें, 'माझें नांव कोलूफ असून मी येथील राजाच्या अत्यंत कृपेंतला मनुष्य आहें.' ती ह्मणते, 'असें काय? तर मग प्रत्यक्ष नाहीं तरी नांवानें तुह्मांला आज मी पुष्कळ दिवस ओळखीत आहें, व लोकांत तुमची मोठी चहा आहे हेंहीं मला माहीत आहे. तुमची एकदा भेट व्हावी अशी इच्छा होती ती आज सहजगत्या पूर्ण झाली हें पाहून मला मोठा आनंद झाला आहे.' मग आपल्या सोचातिणींस उद्देशून ती ह्मणते, 'या ग तर आतां, आपण पुनः आपलें गाणेंबजावणें सुरू करूं, आणि आपल्या या थोर पाहुण्यांस होईल तितकी करमणूक करूं.' हें ऐकून त्या स्त्रियांनीं पुनः पूर्वींप्रमाणें आपलें काम सुरू केलें. व रात्र होईपर्यंत ती गंमत एकसारखी चालली. रात्र झाली तेव्हां दासींनीं जिकडे तिकडे मेणबत्त्या लावून चकचकाट केला. नंतर रात्रीच्या भोजनाची तयारी चालली असतां कोलूफ यानें प्यारी मानलेली ती स्त्री खेरीज करून बाकी स्त्रिया तेथून गेल्या, व तिचा आणि त्याचा संवाद सुरू झाला. तिनें कोलूफ यास राजा मिरझाखान याच्या संबंधानें शेंकडों प्रश्न केले. त्यांत तिनें एक प्रश्न असा केला कीं, 'काय हो, त्याच्या जनानखान्यांत कांहीं अत्यंत लावण्यवती स्त्रिया आहेत कीं नाहींत?' कोलूफ यानें उत्तर केलें, 'होय; तशा प्रकारची एक आहे खरी. तिचें नांव गुलें-दम असें असून तिजवर राजाची बहाल मर्जी आहे. ती तरुण अ-सून रूपानें तर केवळ अप्सराच आहे; आणि तुह्मी माझ्या दृष्टीस पडलां नव्हतां तोंपर्यंत, तसली माशुक स्त्री जगांत दुसरी नसेल असें मी मनांत ह्मणत होतों. पण आतां मी खचीत सांगतों कीं, तुमच्याशीं तिची तुलना केली असतां ती फार फिकी पडणार आहे.' हें ऐकून ती स्त्री फार खुष झाली. ती राजाचा सरदार बा-

यरुख या नांवाचा होता त्याची कन्या असून तिचें नांव दिलारा असें होतें. बायरुख हा त्या वेळीं काराकोरम येथें नव्हता. कारण तार्तरीचा राजा उसबेकखान हा नुकताच गादीवर बसला होता, त्यास आपला संतोष प्रदर्शित करण्याकरितां मिरझाखान यानें त्यास त्या राजाच्या दरबारीं पाठविलें होतें. असो. तेव्हां बाप घरीं नसल्यामुळें दिलारा ही कधीं कधीं करमणुकीकरितां कांहीं मिषानें असले तरुण लोक आपल्या घरीं आणवीत असे. तिचा हेतु करमणुकीखेरीज खरोखरच दुसरा कांहींएक नव्हता; कारण त्या तरुणापैकीं एखाद्यानें आनंदाच्या भरांत आपलें भान विसरून जाऊन जर कांहीं अमर्यादेची वर्तणूक केली, तर ती याप्रमाणें त्याची चांगली कानउघाडणी करून त्यास पश्चात्ताप करावयास लावीत असे.

राजाच्या प्रियकरणीपेक्षांही कोलूफ यानें आपली सौंदर्याविषयीं तारीफ केलेली ऐकून दिलारा हीस मोठा आनंद झाला, व त्या योगानें तिला स्वतःविषयीं ज्यास्त अभिमान वाटूं लागला. सर्व माणसें रात्रीं भोजनास बसलीं असतां दिलारा हिनें शेंकडों प्रकारचे विनोद केले, व आपल्या समयसूचक भाषणानें कोलूफ याचें तनमनधन आपल्या स्वाधीन करून घेतलें. कोलूफ यानेंही समयास उचित असें मधून मधून थोडें भाषण केलें व त्या योगानें त्या सर्वांच्या आनंदास आणखी भर पडली. त्या स्त्रीच्या दर्शनानें व मोहक हावभावांनीं त्याच्या मनास जो उल्हास वाटला, तो त्यानें अनेक प्रकारांनीं व्यक्त करून दाखविला. मग त्याची परत जाण्याची जेव्हां वेळ झाली, तेव्हां तो तीस ह्मणाला, ‘मी जरी तुझ्या समागमांत शंभर वर्षे राहिलों तरी तेवढा काळ मला केवळ एका क्षणासारखा भासणार आहे. पण यद्यपि तुझ्या सहवासापासून व संभाषणापासून मला कितीही आनंद झाला असला तथापि तुला विश्रांति मिळण्यासाठीं तरी मला येथून गेलेंच पाहिजे. तुझी परवानगी असल्यास उद्यां मी पुनः येथें येईन.’ तिनें उत्तर केलें, ‘फार चांगली गोष्ट आहे. तुह्मी आजच्या प्रमाणेंच उद्यां संध्याकाळीं मशीदीजवळ येण्याची तजवीज ठेवा, ह्मणजे तुह्मांला येथें घेऊन येण्याची व्यवस्था होईल.’ असें ह्मणून तिनें दा-

सीकडून एक लहानसा झोळणा आणविला. तो तिनें स्वतः शिव-लेला असून त्याजवर रेशीम व कलाबतू याचा कशीदा काढलेला होता, व त्याजमध्यें बहुमोल हिरेमाणकें भरलेलीं होतीं. तो झोळणा कोलुफाकडे करून दिलारा ह्मणाली, 'अहो, तुह्मांस पुनः मला भेटण्याची इच्छा असेल तर कृपा करून माझ्या लहानशा नजराण्याचा स्वीकार करा.' कोलूफ यानें संकोचानें पण आनंदानें तो झोळणा तिच्या हातून घेऊन त्याबद्दल तिचे आभार मानले, आणि दिवाणखान्यांतून निघून गेला. तो खालीं चौकांत उतरतो तों, जिनें त्यास येथें आणिलें होतें ती वृद्ध स्त्री त्यास तेथें भेटली. तिनें त्यास दरवाजा उघडून दिला, व राजवाड्याची वाट दाखविली.

कोलूफ हा राजवाड्यांत येतांच आपल्या महालांत जाऊन निजला. त्याला त्या रात्रीं झोंप ह्मणून कसली ती आली नाहीं. त्या वेळेपर्यंत जें काय त्यानें पाहिलें होतें त्याविषयींचे सर्व विचार एकसारखे त्याच्या मनांत घोळत होते. सकाळीं उठतांक्षणींच तो राजाला मुजरा करावयाला गेला. आदले दिवशीं तो राजास भेटला नसल्यामुळें त्याजबद्दल राजाला काळजी लागली होती. मग तो आलेला पाहून राजा त्यास ह्मणतो, 'काय, कोलूफजी, काल आपली स्वारी कोणीकडे दडून बसली होती?' कोलूफ ह्मणतो, 'महाराज, क्षमा असावी. कालच्या सर्व दिवसाचा वृत्तांत ऐकला ह्मणजे मी आपल्याला काल भेटलों नाहीं याबद्दल आपल्याला आश्चर्य वाटणार नाहीं.' नंतर कोलूफ यानें झालेली सर्व हकीकत विस्तारपूर्वक त्यास सांगितली.

ती ऐकून मिरझाखान ह्मणतो, 'काय! ती स्त्री खरोखरच इतकी सुंदर आहे? मला वाटतें ती वास्तविक इतकी सुंदर नसावी; मात्र तुह्मी तिची ओतप्रोत स्तुति करून आपल्या भाषणानें तिचें सौन्दर्य माझ्या मनांत खूपच भरविलें यांत संशय नाहीं.' हें ऐकून कोलूफ ह्मणतो, 'छे छे! महाराज, तसें मुळींच नाहीं. मी आपल्या गळ्याशपथ सांगतों, तिचें जें मीं वर्णन केलें तें खरोखर कांहींच नसून त्यापेक्षांही ती सुंदर आहे. महाराज, चीन देशांतला प्रख्यात चि-

तारी मानी हा प्रत्यक्ष जरी तिची तसबीर काढण्याचा यत्न करील, तरी त्यालाही पण तिचें सौंदर्य बरोबर वठवितां येणार नाहीं !' राजा ह्मणतो, 'बस् बस्; आतां याहून तें काय ज्यास्त सांगावयाचें राहिलें आहे ! पण कोलूफ, असें ज्या अर्थी तूं सांगतोस, त्या अर्थीं ती स्त्री डोळ्यांनीं एकदां पहावी अशी मला इच्छा झाली आहे; व तुला संध्याकाळीं तिनें आज बोलाविलें आहे, तर मीही तुझ्या बरोबर येतों, ह्मणजे सहजींच तें काम होईल.'

हें राजाचें भाषण ऐकून कोलूफ यास मोठी पंचाईत पडली. तो मनांत ह्मणाला, 'तिजवर माझी पराकाष्ठेची प्रीति बसली आहे, आणि राजाच्याही मनाची तशी स्थिति झाली तर मजवर त्या गोष्टीचा भयंकर परिणाम होणार आहे. मग अंमळसा विचार करून तो ह्मणतो, 'महाराज, आपण माझ्याबरोबर यावें हें साजेल कसें? आपण कोण ह्मणून मी तिला सांगूं?' राजा ह्मणतो, 'अं:, त्यांत काय आहे? मी तुझा गुलाम या वेषानें तुजबरोबर येईन, ह्मणजे झालें. मग मला वाड्यांत येण्यास तर प्रत्यवाय नाहींच; आतां, तूं व ती जेथें असाल तेथें तुमच्यासमक्ष जरी मला येतां आलें नाहीं, तरी मी दूर असेन तेथूनच तिला पाहीन ह्मणजे झालें.' हें ऐकून कोलूफ हा निरुत्तर झाला. मग संध्याकाळ होतांच राजानें गुलामाचा पोषाख घातला, व कोलूफ व तो असे मशीदीपाशीं आले. ते येऊन फार वेळ झाला नाहीं तोंच पूर्वीं सांगितलेली ती वृद्ध स्त्री तेथें आली. तिनें कोलूफ यास तत्काळ ओळखिलें, आणि ह्मणाली, 'अहो, तुह्मी बरोबर वेळेला आलां, हें ठीक झालें; पण हा गुलाम तुह्मी कशाला बरोबर आणला? याचें कांहीं तेथें कारण नाहीं. याला तुह्मी माघारा लावून द्या.'

त्या स्त्रीचें हें भाषण ऐकून राजाला फार वाईट वाटलें. मग कोलूफ तीस ह्मणतो; 'बाई, कसेंही असो, पण या गुलामाला मजबरोबर येण्याची तेवढी परवानगी द्याच; कारण हा मोठा चतुर, समयसूचक आणि गमती स्वभावाचा आहे. तसेंच हा गुलाम आहे खरा, पण मोठा गुणवान आहे. हा सहज चालतां चालतां कवनें करितो व

गाण्यांत तर मोठा पटाईत आहे. मला खात्री आहे कीं, त्याच्या येण्यानें कोणीही नाखुष होणार नाहीं.' हें ऐकून ती म्हातारी म्हणाली, 'बरें तर, घेऊन चला याला.' मग तीं तिघें त्या वाड्याकडे चाललीं, जाण्यापूर्वीं आदले दिवसाप्रमाणेंच त्या बाईनें कोलूफ यास स्त्रीचा पेहराव दिला, व राजासही दासीचा पेहराव दिला. तीं वाड्यांत पोहोंचलीं तों रात्र झाली होती. चौक ओलांडून तीं दिवाणखान्यांत गेलीं, तों तेथें जिकडेतिकडे सुगंधीं मेणबत्त्या लाविल्या होत्या, त्यांच्या योगानें चहूंकडे चकचकाट झालेला असून सुवास सुटलेला होता.

दिलारा हिनें कोलूफ यास म्हटलें, 'अहो, तुम्हीं हा गुलाम कशाला बरोबर आणला?' कोलूफ म्हणतो, 'बाईसाहेब, तुम्हांला करमणूक करण्याकरितां मीं यास आणलें आहे. ह्याचा स्वभाव मोठा विनोदी असून हा काव्य करतो, व वादनकलेंत तर मोठा निष्णात आहे; तेव्हां याच्या कृतीपासून आपणांला आनंद होईल अशी मला उमेद आहे.' दिलारा आश्चर्ययुक्त मुद्रेनें म्हणते, 'हँ, असें काय? तर मग तुम्हीं याला आणलें हें फार चांगलें केलें.' मग ती त्या वेषधारी गुलामास उद्देशून म्हणते, 'पण ए गड्या, ऐकलेंस का? या ठिकाणीं फार सभ्यतेनें आणि नम्रपणानें वागलें पाहिजे. तसें तुजकडून न झालें तर तुला पस्तावा करावा लागेल.' राजानें (वेषधारी गुलामानें) लवून डोकें हालविलें आणि दिलारा हीस 'तुम्ही म्हणतां तें मला पूर्णपणें मान्य आहे' असें दर्शविलें. नंतर राजानें घेतलेल्या वेषास अनुरूप असें वर्तन चालविलें. त्यानें शेंकडों गमती केल्या, गाण्याच्या लकेऱ्या मारल्या, व सर्वांस पोट दुखेपर्यंत हंसवून सोडलें. तेव्हां दिलारा ही त्याजवर फार खुष होऊन कोलूफ यास म्हणते, 'अहो साहेब, खरोखर, तुम्हीं हा गमत्या माणूस येथें आणला हे मजवर मोठे उपकार केले. ह्यानें हा वेळपर्यंत इतकी कांहीं बहार करून दिली कीं, इतका पुष्कळ वेळ निघून गेला तरी मला घटका अर्धी घटकाच गेलीसें वाटत आहे! पण गडे, हा किंनै गुलाम असून याच्या अंगीं अलौकिक गुण आहेत हें उघड दिसत आहे; आणि याच्यांत कांहीं थोरपणाचें व प्रेमाचेंही चिन्ह मला दिसून येत आहे. मला

खरोखर तो मनापासून आवडलेला आहे, तर आज रात्रीं याला मा मद्य पिण्याचे वेळीं पेले भरून सर्वांना देण्याचें काम सांगणार.' कोलूफ ह्मणतो, बाईसाहेब, आपली याजवर येवढी मर्जी बसली त्या अर्थी हा मोठा दैववान् आहे यांत संशय नाहीं; व तुह्मांला तो आवडला आहे त्याअर्थी माझा त्याजवर हक्क नाहीं. या वेळेपासून तो तुमचाच झाला.' मग तो राजाकडे वळून ह्मणतो, अरे, समजलास ना? आतां मी तुझा धनी नाहीं. एव्हांपासून तूं या बाईसाहेबांचा बंदा आहेस.' हें ऐकून राजा दिलारा हिच्याजवळ आला, आणि तिच्या हाताचें चुंबन करून ह्मणाला, 'बाईसाहेब, या वेळेपासून मी या चरणांचा दास झालों आहें. माझ्या हातून आपली सेवा घडावी अशी माझी फार इच्छा असून मी ती सेवा फार मनापासून करीन.'

दिलारा हिनें राजाचा गुलाम ह्मणून स्वीकार केला, आणि ती कोलुफास ह्मणाली, 'हा तरुण मनुष्य या वेळेपासून माझा ह्मणून मी समजतें; परंतु तो माझा ह्मणून मी तुमच्या जवळच ठेवणार, याबद्दल तुमची हरकत नसावी. तुमच्यापाशीं तो नेहमीं असत जाईल; व तुह्मी जेव्हां जेव्हां येथें याल, तेव्हां तेव्हां प्रत्येक वेळीं तो तुह्मांबरोबर येत जाईल. मी त्याला आपल्या घरीं ठेवीत नाहीं याचें कारण इतकेंच कीं, तो तुमचा ह्मणून सर्व लोकांत प्रसिद्धि झालेली आहे, तेव्हां तुमचा गुलाम माझ्या येथें काय ह्मणून? अशी सहजच लोकांत चर्चा सुरू होईल; व ती होऊं न देण्याविषयीं मला जपलें पाहिजे.' ह्या संबंधाच्या व दुसऱ्या इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर कोलूफ व दिलारा हीं उभयतां भोजनास बसलीं; व राजा हा गुलाम ह्मणून त्यांच्या शुश्रूषेकरितां उभा राहिला. त्यानें बराच वेळपर्यंत शेकडों प्रकारच्या मजा करून सोडल्यावर दिलारा ही त्याजवर फारच खुष झाली, व कोलूफ यास ह्मणाली, 'हा खरोखरच मोठा नामी माणूस आहे; किती नामी म्हणून सांगावा! याला तुमच्या बरोबर भोजनास बसूं द्या ना परता!' कोलूफ ह्मणतो, 'पण त्याला मी आपल्या पंक्तीस कधींही घेत नाहीं.' दिलारा ह्मणते, 'जाऊं द्या हो, त्यांत कांहीं मर्यादेचें मोठें उल्लंघन होतें असें मला

वाटत नाहीं. त्याला बसूं द्या आपल्या शेजारीं जेवायला, म्हणजे आपल्यावर तो ज्यास्त खुष होईल.' दिलारा हिचा मनापासून इतका आग्रह पाहून कोलूफ राजास म्हणतो, 'बैस रे बुवा तर मग; बाई-साहेबांची तशी मर्जी आहे, मग तुझें तरी काय जातें?'

त्या वेषधारी गुलामाला तेंच पाहिजे होतें. तेव्हां तो कशाला आढेवेढे घेतो? तो लागलाच कोलूफ व दिलारा ह्यांच्यामध्यें भोजनास बसला. त्यांचें भोजन झाल्यावर मद्य आलें. तेव्हां दिलारा हिनें कांठोकांठ पेला भरून स्वत: राजाच्या हातीं दिला, आणि म्हणाली, 'माझें आरोग्य चिंतून हा टाक पिऊन.' राजानें तो पेला घेतला, व दिलारा हिनें तो ज्या हातानें दिला होता त्याचें परमादरानें चुंबन करून तो झोंकून दिला. नंतर तीं तिघेंही एक एक दोन दोन पेले मद्य प्याल्यावर, दिलारा हिनें प्रथमत: स्वत:च विनोद करण्यास सुरुवात केली. तिनें एक सोन्याचा पेला भरून कोलूफ यास म्हटलें, 'अहो, साहेब, अत्यंत सुंदर अशी राजाची प्रियकरीण जी गुलेंदम, कीं जी-वर तुम्ही फार फिदा आहां, तिला आरोग्य चिंतून मी हें मद्य प्राशन करितें.' हें ऐकून कोलूफ याचें तोंड खाड्कन् उतरून गेलें व तो अगदीं गोंधळून गेला. मग दिलारा हीस म्हणतो, 'बाईसाहेब, हा काळपर्यंत तर माझ्या परम पूज्य धन्याच्या प्रियकरणीविषयीं माझें मन अत्यंत पवित्र आहे; व पुढचें कोणी काय सांगावें हें जरी खरें, तरी तिजविषयीं माझ्या मनांत पापाची वासना परमेश्वर उत्पन्न न करो अशी माझी अंत:करणापासून इच्छा आहे.' दिलारा किंचित् हंसून म्हणते, 'हँ हँ, तुम्ही आतां आपल्याला सांवरून घेऊं पाहतां नाहीं काय? मला पक्कें आठवतें कीं, काल तुम्ही गुलेंदम हिच्या-संबंधानें बोलत असतां तिचें इतकें वर्णन केलें कीं, तुमची तिजवर आसक्ति आहे असें मला दिसून आलें. असो; पण हें मला काय वाटलें तें मी म्हटलें; तथापि तुम्ही मोकळें मन करून सांगा पाहूं, कीं तुम्हांला ती आवडत नाहीं, व आपण हल्लीं जशी घटकाभर करमणूक करीत आहों तशी तुम्ही तिच्याशीं कधींही केली नाहीं म्हणून?' या थट्टेचा परिणाम कोलूफ याच्या पुरता लक्ष्यांत

आला व त्याला फार दुःख झालें. मग अत्यंत विनयपूर्वक व खेद-युक्त मुद्रेनें तो दिलारा हीस ह्मणतो, 'बाईसाहेब, आतां हा विनोद पुरे. मी शपथ वाहून सांगतों कीं, गुलेंदम हिच्याशीं एकांतीं कधींही माझें भाषण झालें नाहीं.'

कोलूफ हा असा पेंचांत पडलेला पाहून दिलारा हीस खूबच गंमत वाटली, व ती खदखदां हंसूं लागली; आणि तिनें आपलें वि-नोदी भाषण तसेंच पुढें चालविलें. ती कोलूफ यास ह्मणते, 'अहो, तें असूं द्या, पण तुह्मी कांहींएक न चोरतां आपला सर्व इतिहास एकदा आह्मांला सांगा पाहूं?' मग त्या वेषधारी गुलामाकडे पाहून ह्म-णते, अरे, 'तुझ्या धनीसाहेबांचा मजवर भरंवसा नाहीं असें वाटतें. तूं तरी माझ्याकरितां त्यांना सांग कीं, माझ्याशीं कांहीं आडपडदा ठेव-ण्याचें कारण नाहीं.' तेव्हां राजा कोलूफ यास ह्मणतो, 'सरकार, ह्या बा-ईसाहेब येवढ्या आस्थेनें आपणांला विचारतात तर आपण आपल्या प्रेमाच्या गोष्टी यांस सांगाच. कांहीं मागें पुढें पाहूं नका.' गुलेंदम हिचें मन तुह्मीं कोठपर्यंत वळविलें आहे, व राजाच्या नकळत तुमचीं कोठें व कशीं खलबतें चालतात, तें सर्व तुह्मी यांना सांगा.' मग दिलारा हिजकडे वळून तो ह्मणतो, 'बाईसाहेब, आपल्याला जशी यांची गुजगोष्ट ऐकण्याची उत्कट इच्छा झाली आहे तशीच मलाही झाली आहे; कारण, कोणाचेंही गुपित कधीं फोडूं नये अशी जरी माझी मनापासून इच्छा आहे, तरी मला बहुत दिवसांपासून अंदेशा आलेला आहे कीं, त्या स्त्रीशीं यांचा कांहीं तरी चोरटा व्यवहार चालत अ-सून यांनीं तो आजपर्यंत मोठ्या शिताफीनें गुप्त ठेविला आहे.'

कोलूफ यास राजाच्या बोलण्याचें कांहींच वाटलें नाहीं. परंतु दिलारा हिनें जी आपली उगीच थट्टा केली, तिचा राजाच्या मना-वर वाईट परिणाम झाला, येवढें मात्र त्यास स्पष्ट दिसून आलें. असो; नंतर त्या तिघांनीं पुन्हा आणखी मद्य पिण्यास सुरवात केली मग तीं सर्वजण त्याच्या अगदीं भरांत आलीं असतां, राजा हा, आपण कोणाची बतावणी करण्याचें पतकरलें आहे हें विसरून जाऊन, दिलारा हीस ह्मणतो, 'हे सुंदरी, मला एखादी चांगली चीज

ह्मणून दाखीव; कारण, गायनकलेंत तूं फार कुशल आहेस असें मीं ऐकलें आहे. त्यानें जरी बोलण्यांत येवढी सलगी केली, तरी दिलारा हिची मर्जी खपा न होतां ती उलटी ज्यास्तच हंसायाला लागली. मग राजास ह्मणते, 'हो हो. मी मोठ्या खुषीनें तुला चीज ह्मणून दाखवितें. तुझ्यासारख्याला चीज म्हणून दाखविणें ह्मणजे काय मोठी गोष्ट आहे ? तुझ्याकरितां मी वाटेल ती गोष्ट करण्यास तयार आहे!' असें ह्मणून लागलाच तिनें वीणा लावून आणवून एक उत्कृष्ट चीज ह्मटली. नंतर तिनें तबला आणविला, व दुसरी एक तशीच चीज ह्मटली.

राजानें आजपर्यंत उत्तमप्रकारचें गाणें बजावणें पुष्कळ ऐकिलें होतें, पण इतकें सुंदर व तालसुराला बरोबर असें गाणें त्यानें कधींच ऐकिलें नसल्यामुळें, तो आनंदसागरांत अगदीं निमग्न होऊन गेला, व आपण गुलाम ह्मणून येथें आलों आहों याचा त्यास अगदींच विसर पडून जाऊन, तो दिलारा हीस म्हणतो, 'हे प्रियसखी मी खरेंच सांगतों, तुजकरितां माझे पंचप्राण अगदीं व्याकुळ होत आहेत. तुझें वर्णन कोलूफ यानें आपल्याकडून पुष्कळ मजपाशीं केलें, पण वास्तविक तें त्याला बरोबर करतांच आलें नाहीं असें मीं म्हणतों.' कोलूफ यानें, हा अगदीं आतां दिवाणा झाला असें पाहून त्याला सावध करण्याकरितां खूण केली, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं, त्यानें कोलूफ याजकडे बिलकुल लक्ष न देतां तसेंच पुढें बोलणें चालविलें. तो म्हणतो, 'मनमोहिनी, माझ्या पदरीं जगद्विख्यात गायक ऐझाक मुसेल हा आहे, पण खरोखर पुसशील तर तुझ्या अर्ध्यानेंही त्याची योग्यता नाहीं!' हें त्याच्या तोंडचें शब्द ऐकून दिलारा हिनें हा राजा आहे असें तत्काळ ओळखिलें, व झट्दिशीं उठून तोंडावरून बुरखा घेतला. नंतर ती हळून आपल्या दासीस म्हणते, 'अगे, आपण अगदींच फसून गेलों, व आतां ह्या गोष्टीचा परिणाम काय होणार याची मला फार भीति येऊन पडली आहे. अगे, कोलूफ याजबरोबर आलेला हा गुलाम नसून गुलामाच्या वेषानें प्रत्यक्ष राजाच आलेला आहे !' याप्रमाणें दासीच्या का-

नांत सांगून ती चट्दिशीं राजकडे आली. परंतु त्याच्या समक्ष बसण्याची तीस लाज वाटून ती मर्यादेनें दूर उभी राहिली. तें पाहून राजा म्हणतो, 'बाईसाहेब, बसाना, उभ्या कां? खरोखर माझें काम उभें राहण्याचें असून मी बसलों आहें, व आपण उभ्या राहिलां हें काय? मी आपला गुलाम नव्हे काय? मला आपल्यासमक्ष बसणें योग्य नव्हतें, आपण मला कृपा करून आज्ञा केली म्हणून मी बसलों.'

हे राजाच्या तोंडचे शब्द ऐकून दिलारा रडूं लागली. ती त्याच्या पायांवर लोटांगण घालून स्फुंदत स्फुंदत ह्मणाली, 'राजाधिराज, आपण कोण हें मीं ओळखिलें, व मला आपण क्षमा करावी असें माझें या पायांपाशीं मागणें आहे, मी तरुण पोर, मला जगाचा अनुभव नाहीं, यामुळें माझ्या हातून चूक झाली.' राजानें तिला उठवून उभी केली व तिचें सांत्वन करून तिला अभय दिलें, आणि तिची सर्व हकीकत विचारून घेतली. नंतर कोलुफासह निघून तो राजवाड्यांत परत आला.

दिलारा ही गुलेंदम हिच्या संबंधानें कोलूफ याशीं जें बोलली, त्यांत त्याची मस्करी करून गंमत करावी येवढाच तिचा हेतु होता. पण त्या मस्करीचा परिणाम भलताच झाला. राजाच्या मनांत बाणून गेलें कीं, कोलूफ व आपली प्रियकरीण यांचा खचीत गुप्त व्यवहार होत असावा, व हें नीच कृत्य तीं दोघें आपल्या डोळ्यांत धूळ घालून आपल्या वाड्यांतच करीत असावींत. आतां वास्तविक पाहतां, या गोष्टींच्या सत्यासत्यतेचा प्रत्यय पाहण्यास त्यास शेंकडों मार्ग होते, त्यापैकीं एखाद्या मार्गाचें अवलंबन करून त्यानें प्रथम आपली खात्री करून घ्यावयाची होती, व नंतर त्या गोष्टीचा ज्यास्त विचार करावयाचा होता. पण मिरझाखान राजा हा मोठा विचक्षण व हलक्या कानाचा पुरुष होता. त्याच्या कानावर एकादी गोष्ट एकदा आली ह्मणजे ती खरीच आहे, असें एकदम त्याच्या मनानें घ्यावें, व पुढें कांहींएक विचार न करितां त्याचा खल करीत बसावें असो, तेव्हां हा जो अंदेशा त्याच्या मनांत आला, त्यासंबं-

वानें त्यानें मुळींच चौकशी न करितां एकदम दुसरे दिवशीं सकाळीं कोलूफ यास हुकूम पाठविला कीं, 'तुला इतःपर राजवाड्याची पायरी चढणें बंद आहे; व तुला आजच्या आज काराकोरम शहर सोडून निघून गेलें पाहिजे.'

कोलूफ हा पक्कें जाणून होता कीं, आपला यत्किंतुही दोष नसतां विनाकारण आपली ही अप्रतिष्ठा झालेली आहे; व राजा जर आपला वाका ऐकून घेईल तर आपण सहज निर्दोषी होऊं. परंतु आपला निरपराधीपणा शाबीत करण्याचा यत्न करण्याकडे लक्ष न देतां दुर्दैवानें कपाळीं आलें होतें तें भोगण्यास मर्दाप्रमाणें तो तयार झाला, व राजाच्या हुकुमाप्रमाणें लागलाच शहर सोडून तार्तरीस जाणाऱ्या एका कारवानाबरोबर निघाला, आणि समरकंद येथें सुखरूप पोहोंचला. निकृष्टस्थिति प्राप्त झाली असतां थोर जे आहेत त्यांचें धैर्य खचत नाहीं असें जें ह्मणतात, त्याप्रमाणें कोलूफ हा या गुदरलेल्या संकटामुळें बिलकुल खिन्न झाला नाहीं; तसेंच, त्याला जन्मांत हें पहिलेंच संकट आलें होतें असेंही कांहीं नव्हतें. तो अशा गोष्टींत पक्का नेरढावून गेला होता. खेरीज, मनुष्य जन्मल्यापासून मरेपर्यंत त्याला ज्या कांहीं गोष्टी भोगावयाच्या असतात त्या कधींही टळावयाच्या नाहींत, या तत्त्वावर त्याचा पक्का भरंवसा होता, यामुळें त्याच्या मनाची समता यत्किंचितही ढळली नाहीं.

याप्रमाणें हा विचारी व थोर मनाचा पुरुष आपल्या नशिबावर हवाला ठेवून समरकंद येथें स्वस्थ राहिला; इतकेंच नाहीं, तर त्याच्याजवळ पैसा होता तोंपर्यंत त्यानें खाण्यापिण्याची व इतर मौजा मारण्याची देखील वाटेल तशी चैन केली. जवळचा पैसा संपून गेल्यावर तो आपलें बिऱ्हाड सोडून एका मशिदींत जाऊन राहिला. तेथील इमामाचें व त्याचें धर्मसंबंधी बाबतींत कित्येक वेळां बोलणें झाल्यावर, हा मोठा ज्ञाता आहे अशी त्याची खात्री होऊन त्यानें त्यास दोन रोट्या व लोटाभर पाणी दररोज मिळण्याची तजवीज केली. याप्रमाणें त्याचा सरासरी निर्वाह होऊं लागून तो चैनीनें नाहीं, तरी आनंदानें काळ घालवूं लागला असतां एके दिवशीं असें

झालें कीं, मुजफर या नांवाचा एक धनाढ्य व्यापारी निमाज पढ-ण्याकरीतां मशिदींत आला. त्यानें कोलूफ यास पाहून ह्मटलें, 'अरे तरुण मनुष्या, तूं कोठून व कोणत्या निमित्तानें या शहरांत आ-लास?' कोलूफ उत्तर करितो, 'मी दामास शहरचा रहिवासी असून कुलीन व श्रीमान् घराण्यांतला आहें. माझ्या मनांत प्रवास कराव-याचें आल्यावरून मी घरून निघून तार्तरी देशांत आलों असतां या शहरानजीक चोरट्यांनीं मजवर हल्ला केला, माझ्या सर्व नोक-रांस ठार मारलें व माझ्याजवळ होतें नव्हतें तेवढें सर्व हिसकावून घेऊन मला तेवढें जिवानिशीं सोडून दिलें.'

मुजफर यास कोलूफ ह्याचें बोलणें खरें वाटून तो त्यास ह्मणाला 'अरे बाबा, असें आहे तर तूं कांहीं काळजी करूं नको. हें पहा कित्येक प्रसंगीं देव मनुष्यावर संकटें आणितो, व त्यांतूनच त्याच्या सुखाचें साधन त्यास प्राप्त करून देतो. तर याप्रमाणें तुलाही सांप्र-त्या विपत्कालीं समाधानास्पद असें कांहीं कदाचित् मिळेल. ऊठ मजबरोबर माझ्या घरीं चल.' कोलूफ हा मुजफर याच्या ह्मणण्य-प्रमाणें त्याजबरोबर निघाला. तो त्याच्या घरीं गेल्यावर त्याचें ऐश्व-त्यास फार मोठें दिसलें. त्याच्या येथलीं शेंकडों चाकरमाणसें श्रीमंती थाटाचें सर्व सामानसुमान, आणि मालाची मोठी थोरली वख-हीं पाहून त्याची खात्री झाली कीं, हा कांहीं सामान्य मनुष्य नाहीं

मुजफर यानें कोलूफ यास प्रथम उत्तम प्रकारचें थोडें सरब-प्यावयास देऊन' नंतर भोजनाची तयारी झाल्याबरोबर आपल्या शे-जारीं भोजनास बसविलें. कोलूफ यास बरेच दिवसांनीं असें सुग्र-अन्न मिळाल्यामुळें तो मोठ्या आनंदानें पोटभर जेवला. जेवण झ-ल्यावर दोघे इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलले, व नंतर मुज-यानें कोलुफास पैशाची कांहीं रक्कम देऊन वाटेस लाविलें.

